# भाषाशास्त्र आणि मराठी भाषा.

## अभिप्राय.

**या पुस्तकाबद्दल, पुणें येथील न्यू पूना कॉलेजमधील मराठी भाषा आणि इतिहास या विषयांचे अध्यापक प्रोफेसर द. वा. पोतदार यांचा अभिप्रायः—**

"प्रोफेसर कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी यांनीं लिहिलेला "भाषाशास्त्र आणि मराठी भाषा " हा ग्रंथ वाचल्यापासून मराठी भाषेच्या सूक्ष्म व चिकित्सक अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांस चांगलीच मदत होईल. अशा एक आटपशीर ग्रंथ मराठाभाषेच्या दृष्टीनें आवश्यक होता आणि रा. कुलकर्णी यांनीं थोडक्यात सर्व विषय सरळपणें प्रतिपादून ही उणीव भरून काढली आहे. हा ग्रंथ शास्त्रीय नसून लौकिक म्हणून लिहिलेला आहे, तथापि ग्रंथकर्त्यांनी जर जागजागीं टीपांतून अधिक माहिती कोठें पाहावी हें सुचविलें असतें तर ग्रंथाची उपयुक्तता वाढली असती. भाषाशास्त्रविषयक सामान्य विवेचन सुमारें १५० पृष्ठांत करून पुढें सुमारें ७५ पृष्ठें मराठी भाषेविषयीं लिहिली आहेत. पुढील आवृत्तीचे वेळेस हें प्रमाण समसमान करणें ग्रंथकर्त्यास अगत्याचें वाटेल अशी आम्हास आशा आहे. हल्लीं देशी भाषाचें अध्ययन वाढत आहे, अशा वेळीं वरिष्ठ अध्ययनक्रमात हा ग्रंथ समाविष्ट करण्यासारखा आहे. पंचिस्तर अभिप्राय मागाहून लिहू तूर्त प्रो. कुलकर्णी व प्रकाशक डॉ० सरदेसाई या दोघांचें अभिनंदन करून त्यांनीं उत्तरोत्तर अशीच भर मराठी साहित्यात टाकावी अशी त्यास विनंति करून पुरें करतों.

चैत्र व. ६, १८४७ पुणें. दत्तो वामन पोतदार."

---

# प्रस्तावना.

१ " भाषाशास्त्र आणि मराठी भाषा " हें पुस्तक आज रोजीं आम्ही मराठी वाचकास सादर करीत आहोंत. शास्त्र म्हटलें म्हणजे त्यांत एखाद्या विषयासंबंधीं नियमबद्धता व त्यावरहुकूम मांडणी, अपवादात्मक स्थळाचा नियमानुसार खुलासा, विषयाचें ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्व, एकदर ज्ञानसमुच्चयांत त्याच्या अध्ययनानें व प्रवृत्तीनें होणारी वाढ व त्या दृष्टीनें त्या विषयाचें महत्त्व—इतक्या गोष्टी येतात. अशा दृष्टीनें भाषेकडे व त्यांतही मराठी भाषेकडे पहाण्याची दृष्टि येऊन काहीं फार दिवस झाले असें म्हणता येणार नाहीं. भाषा हा विषयच रोजच्या व्यवहाराच्या सान्निध्यामुळें किंवा अतिपरिचयामुळें बोलणाऱ्याच्या इतका रोमरोमीं खिळल्यासारखा होतो कीं त्याला शास्त्र-विच्छेद्य समजणें कठीण होतें. बरें, कोणत्याही विषयाचें शास्त्र तयार करावयाचें म्हणजे त्या विषयास आपल्यापासून अगदीं अलग अगर भिन्न समजून त्याप्रमाणें शस्त्रक्रिया करताना केवळ निर्दयतेनें अवयवांचें पृथक्करण करतात, तद्वत् कोणत्याही विषयाचें करावें लागतें. भाषेला तिच्या अतिनिकटवर्तित्वामुळें अलग समजणें कठीण असलें तरी प्रयत्नसाध्य आहे. परंतु शास्त्र सारातांना शास्त्री लोकांना दृष्टि सदैव जागरूक ठेवावी लागते.

२ भाषेकडे या दिशेनें पाहण्याची दृष्टि इतिहासाच्या अध्ययनानें येते. इतिहासाचें अध्ययन सफल म्हणजे जनव्यवहाराची ऐतिहासिक माहिती शब्दांच्या लाखा-खोंचांत दडून बसलेली हुडकून काढावी लागते. आपल्या इकडील पूर्वींच्या लोकांना ऐतिहासिक ज्ञानाची अभिरुचि म्हणा, लालसा म्हणा किंवा जरूरी म्हणा इतकीशी न वाटल्यानें व भाषेचें मुख्य काम म्हणजे व्यवहारसाधन व स्वविचारप्रदर्शन एवढीच समजूत भाषेंत संचित केलेलें ज्ञानभांडार रक्षण करण्याच्या इच्छेच्या मुळाशीं असल्यानें भाषेच्या या क्षेत्राकडे त्यांची दृष्टि गेली नाहीं. पूर्वजांच्या ज्ञानाच्या भांडाराचें रक्षण ज्या प्रकारानें चांगलें होईल त्या दृष्टीनेंच भाषेचें अध्ययन करण्याची प्रवृत्ति पूर्वीं सुरू झाली व त्याच

दृष्टीनें त्यांत सुधारणा होत गेली. व्यवहारसाधन व विचारप्रदर्शन या दोन मुख्यमार्गे भाषेत सुधारणा करणें म्हणजे भाषेच्या अंगोपांगाचा व्याकार करणेंच होय. ऋग्मंडलाच्या प्रत्येक मंडलाचा अशा दृष्टीनेंच व्याकार प्रातिशाख्यांनी केला. व्याकार करण्याची किंवा व्याकरण लिहिण्याची सुरवात प्रातिशाख्यांनी केली.

२ सध्यांच्या काळीं भाषेकडे या दृष्टीनें पाहण्याचें बंद होऊन तिला ऐतिहासिक वळण लागलें आहे. भाषाशास्त्राच्या बाबतीत वरील तऱ्हेच्या विवेचक पद्धतिबरोबरच ऐतिहासिक पद्धतही पहावी लागते मराठी भाषेचा भाषाशास्त्राच्या अखंड अबाधित नियमांनीं उलगडा लागावयाचा म्हणजे ऐतिहासिक दृष्या मराठी भाषेची जीं पूर्वस्वरूपें तीं पहावीं लागतील. तीं ऐतिहासिक पूर्वस्वरूपें म्हणजे संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, पुराणमराठी, वर्तमानकालीन मराठी हीं होत. ही परंपरा पूर्ण अवगत झाल्याशिवाय मराठी भाषा शास्त्राच्या मुळाशी खोलता येणार नाहीं प्रस्तुत पुस्तकात या दृष्टीनेंच प्रयत्न केला आहे. सर्वच भाषा शास्त्राची व्याख्या, महत्त्व, प्रयत्न, सामान्य सिद्धांत, त्यांची जगातील मुख्य भाषांवर चालणारी हुकमत, त्याचप्रमाणें त्यांची वर्गवारी अशी सामान्य चर्चा अगोदर करून नंतर प्रथम आर्य व नंतर इंडो–युरोपियन, इंडो–जर्मन, इंडो–इराणी, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश पुराणमराठी अशा परंपरेनें मराठी भाषेच्या पूर्व स्वरूपाचा विचार केला आहे, शिवाय हा विचार करतांना पाश्चात्य व पौर्वात्य अशा दोन्ही विचारसरणी दाखविल्या आहेत. आपल्या इकडील जुन्या अर्थात भाषाशास्त्रीय विवेचन कोठें दृष्टीस पडतें हें दाखवून त्याचा पाश्चात्य मताशीं व शोधाशीं किंपत मेळ बसतो हे दाखविण्याचा मूळ उद्देश या पुस्तकात पुढें ठेवला आहे यास्कशाकटायनादि निरुक्तकार, पाणिनिपतंजल्यादि वैय्याकरणी, मम्मटादि अलंकारिक, वररुची कात्यायनादि प्राकृत व्याकरणकार, राजवाडे गुणे, वैद्यादि आधुनिक मराठी भाषाशास्त्रकोविद, इत्यादि अधिकारी विद्वानाच्या मताशीं तिकडील जोन्स, मॅक्समुल्लर, बाप्प, ग्रिम्, पिशेल, ओर्टेल, व्हिट्ने, साईस, बुम्हान, डेल्ब्रुक, ब्लुमफील्ड इत्यादि विद्वानांच्या मताची तुलना करून एकवाक्यता करणें हें ध्येय पुढें ठेवून

संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश इत्यादि पूर्व स्वरूपाचा इतिहास दाखवून वर्तमानकालीन मराठी बोलीचा उलगडा करण्याचा या पुस्तकांत प्रयत्न केला आहे. असा उलगडा करतांना प्रमेयें जरी तौलनिक अभ्यासावरून बनलेलीं अशीं घेतलेलीं असलीं तरी आपणास परिचित भाषांशीं–उदाहरणार्थ संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, गुजराथी, हिंदी, व्रज, इंग्रजी इत्यादि आर्य व कानडी ही द्रविड व प्रामुख्यानें मराठीशींच त्या प्रमेयांची सांगड घातली आहे. अर्थात् हा भाषेचा उलगडा आहे. वाङ्मयाचा उलगडा करण्याकडे अगदीं दृष्टि लाविली नाहीं. तो एक अगदीं निराळाच विषय होईल. प्रस्तुत पुस्तकांत एकंदर भाषेच्या स्वरूपाचें आविष्करण, प्रक्रियेचें विवेचन व मराठी भाषेचें ऐतिहासिक विवरण कितपत साधलें आहे हें पाहण्याचें काम वाचकांवरच आम्हीं सोंपवितों व त्याबरोबरच मराठींत भाषाशास्त्रावर पुस्तक नाहीं ही उणीव या सदरील पुस्तकानें अंशतः तरी भरून निघाली कीं नाहीं तेंही पाहण्याची जबाबदारी आम्ही त्यांच्यावरच टाकतों.

४ येथेंच आणखी एका मुद्याचा निर्देश करणें जरूर आहे. तो मराठी भाषेच्या उत्पत्तिकालासंबधीं विषय वादग्रस्त आहे त्याविषयीं शंका नाहीं. गु. राजवाडे ह्यांच्याकडे ज्या वेळेस प्रस्तुत पुस्तक लिहून झाल्यानंतर प्रणाम करण्यास म्हणून गेलें त्या वेळेस अर्थातच त्या मुद्याकडे त्यांचें विशेष लक्ष गेलें त्याच वेळेस कर्मधर्मसंयोगानें श्री दत्तोपंत पोतदार ह्यांचें " अवतार " हें पुस्तक बाहेर पडलें होतें. त्यामध्यें असलेल्या पुराणमराठींतील गद्यवाङ्मयासंबधीं कांहीं आक्षेपार्ह विधानासंबधीं त्यांचा विचार चालला होता. व तीं विधानें खोडून काढणारा पुरावा आपल्या बाडांतून त्यांनीं बाहेर काढून ठेवला होता. माझें पुस्तक हस्तलिखित स्वरूपांत त्यांच्याकडे गेल्यावर त्यांनीं तत्संबधीं प्रकरण वाचून अनभिमत मतें मी प्रतिपादिलेलीं पाहून पुस्तकाच्या इतर भागाबद्दल समाधानयुक्त दोन शब्द बोलूनसुद्धां मला दोष दिला. खरें पाहिलें तर हा वादग्रस्त विषय मी होईल तितका प्रयत्न करून, सर्व उपलब्ध साधनांचा योग्य परामर्श घेऊन लिहिला आहे. प्रयत्नाची कांहीं कसूर केली नाहीं. मी जो मराठीच्या उत्पत्तीचा काल निश्चित केला आहे तो

रा. गुणे, वैद्य यांच्या व इतिहास संशोधक मंडळ पुणें, येथें झालेल्या संशोधनाच्या आधारावर त्याचप्रमाणें राजवाड्यांनीं शोधलेल्या पुराव्याच्या आधारावर केला आहे. परंतु सदरहु कालाबद्दल गु. राजवाडे यांनी नापसंती दर्शविली व कालनिर्णय योग्य होतो कीं नाहीं हें पाहण्यासाठीं त्यांच्या सान्निध्यांत रहाण्यास त्यांनी आज्ञा केली. त्या अवधींत त्यांच्या दप्तरीं असलेल्या वैद्यक, ज्योतिष, पुराणें, धर्म वगैरे विषयावर लिहिलेल्या पोथ्या मला पहाण्यास सांगितल्या. तसेंच अतिशय बहुमोल अशा मानभावी ( महानुभाव ) पंथातील श्री चक्रवर्ति " लीळाचरित्र " नावाच्या अतिशय जुन्या अशा दोन पोथ्यांही मला वाचण्यास सांगितल्या, व वाचून झाल्यानंतर मराठीच्या उत्पत्तिकालाबद्दल माझें प्रतिपादिलेलें मत कायम राहतें कीं त्यांत काय बदल होतो, हें पहाण्यास सांगितलें. तितकें सर्व पाहूनही मी निश्चित केलेला मराठीचा उत्पत्तिकाळ बदलण्याची जरूरी मला दिसेना. गु. राजवाडे सदर वाङ्‌मयभांडाराच्या व आणखी इतर पुराव्याच्या आधारावर उत्पत्तिकाल शालिवाहन शक ४०० पर्यंत मागें नेणार आहेत. तसें त्यांचें मत बनलें आहे. तो त्यांचा प्रयत्न बाहेर आल्यानंतर व त्याची साधक बाधक प्रमाणानें विद्वानांकडून चर्चा होऊन कायमचा निकाल झाल्यानंतर त्याप्रमाणें प्रस्तुत पुस्तकाच्या तत्संबंधीं प्रकरणीं फरक करण्याचें मी त्यांना आश्वासन देतों. तोंपर्यंत आहे तो भाग तसाच राहू देण्याची सप्रणाम व सविनय याचना करतों.

५ भाषाशास्त्राचा अभ्यास करण्यास गुरुवर्य के. डॉ. गुणे यांच्या जवळ आम्ही १९१७ सालीं ते फर्ग्युसन कॉलेजमध्यें प्रोफेसर असताना सुरुवात केली. व्यवसायामुळें पुणें शहर आम्हास लवकरच सोडावें लागल्यामुळें भाषाशास्त्राचा अभ्यासही अर्धांत सुटला, परंतु सुदैवानें संशोधनाचार्य वि. का. राजवाडे यांची गांठ पडली त्यांच्या प्रोत्साहनानें व शास्त्रांतील नियमांच्या शिकवणीनें पुन: अभ्यास बराच जोरात चालला. मराठी भाषेंतील शब्दांची भाषाशास्त्रीय नियमानें व्युत्पत्ति ठरविण्याच्या कामीं त्यांना मदत करण्याची संधी त्यांनीं दिली त्या वेळीं ऐतिहासिक व शास्त्रीय व्युत्पत्ति कायम करितांना जें काहीं विवेचन, ऊहापोह वगैरे झालीं तींच प्रस्तुतच्या पुस्तकाच्या मुळाशीं आहेत. पुढें पुस्तक लिहितांना

गुरुवर्य रा. राजवाडे आणि गुणे ह्यानीं कित्येक प्रकारच्या बहुमोल सूचना केल्या त्याचा अंतर्भाव पुस्तकांत केला आहे.

६ व्याकरण हा विषय जात्या रुक्ष आहे व त्याचा अभ्यास करणाऱ्यावर साहजिकच " वेदाभ्यासजडत्व " येतें. तें नाहींसें करून पुनः बुद्धीस कार्यक्षम करण्याचें कामही कांहीं कमी प्रतीचें नाहीं व हें त्याच विषयांत रत असलेल्या किंवा त्या विषयाची अभिरुचि असलेल्या विद्वान गृहस्थांच्या कृपाकटाक्षानेंच होतें. त्यांच्याकडून एक जरी प्रशंसापर शब्द आला तरी पुढचें प्राशुलम्य फळ असलें तरी तें मिळविण्याचें एखाद्या यामनास प्रोत्साहन येतें.

७ प्रस्तुत पुस्तक झाल्यानंतर हस्तलिखित स्वरूपांत पुष्कळ विद्वानांच्या नजरेखालून जाण्याचा सुयोग आला. डॉ. बेलवलकर, प्रो. अभ्यंकर, प्रो. पोतदार, प्रो. केळकर, प्रो. गाणे, प्रो. मायदेव, सरदार मेहेंदळे, प्रो. ध्रुव, अध्यापक थाउबले, ह्या सर्व विद्वान लोकांनीं या पुस्तकाबद्दल समाधानयुक्त अनुकूल मत प्रदर्शित केलें याबद्दल ग्रंथकर्ता सर्वांचा आभारी आहे. मनुष्य आपलें काम आपणच करीत असतो. पण तेंच करितांना ' हें बरें आहे ' ' हे उत्तम साधलें आहे ' ' असें शास्त्रसंमत आहे ' वगैरे प्रोत्साहनपूर्ण शब्द कानावर आले म्हणजे काम करण्यास हुरूप येऊन धामात गोडी वाटू लागते. आमच्या मित्रमंडळींकडून असेंच प्रोत्साहन मिळत गेलें, म्हणून आमचा उत्साह शेवटपर्यंत कायम टिकला. भाषाशास्त्रासारख्या बिकट विषयावर लिहिण्याचें धाडसही त्यामुळेंच आलें याबद्दल त्यांचेही आभार मानले पाहिजेत शेवटीं पुस्तक लिहीत असतांना कागद, टाक, शाई वगैरे पळविण्याचे प्रयत्न करून माझ्या कामाला ज्यांनीं हातभार लावला त्या माझ्या चिरंजीव दादा, बचू यांचेंही कौतुक करणें जरूर आहे.

८ प्रस्तुत पुस्तकांतील बराच भाग व्याख्यानें व निबंध यांच्या रूपानें अन्यत्र येऊन गेलाच आहे. तोच पुन येऊन, त्यांत थोडीशी भर घालून पूर्वापार सांधा जोडून घेतला आहे. पुस्तक तयार करण्यांत पुढें दिलेल्या पुस्तकांची फार मदत झाली. त्याबद्दल त्या सर्व ग्रंथकर्त्यांचा व्यक्तिशः प्रस्तुत ग्रंथकर्ता ऋणी आहे. ओरिएण्टल बुक सप्लाइंग कंपनीचे चालक

| | | |
|---|---|---|
| 21 | प्राकृत व्याकरण— | वररुचि |
| 22 | देशी नाममाला— | हेमचंद्र |
| 23 | औरंगाबाद उर्दू मासिक. | |
| 24 | रॉयल एशियाटिक सोसायटी मासिक. | |
| 25 | निबंध— | प्रथम प्राच्य परिषद् |
| 26 | मराठी व्याकरण— | तर्खडकर |
| 27 | ,, | जोशी |
| 28 | ,, | नवलकर |
| 29 | ,, | दामले |
| 30 | भाषाशास्त्र— | पावगी |

# अनुक्रमणिका.


पृष्ठ

प्रकरण १ ले भाषाशास्त्र सामान्य विवेचन १–११

व्याख्या. ... ... १

भाषाशास्त्राचा जन्म. ... ४

हिंदुस्थानांत सुरुवात.... ६

संस्कृतमधील प्रयत्न.... ७

प्राकृतमधील प्रयत्न. ... १०

मराठीमधील प्रयत्न. ... १०

प्रकरण २ रें भाषेची उत्पत्ति. ... १२–२३

भाषेची उत्पत्ति–मतें.... १२

भाषा ईश्वराची देणगी कितपत आहे ? ... १३

समाजाची कर्तबगारी.... १५

एकसुरी अवाजाची उत्पत्ति. ... १६

अवाजांत होणारें विविधत्व. ... १७

अनुकार व उद्गार–भाषेच्या वाढीचीं कारणें. ... १९

भाषेच्या वाढीचीं इतर कारणें. ... २१

पृष्ठ

प्रकरण ३ रें वर्णोत्पत्ति. २३–३८

मुखांतील स्नायूंची रचना. ... २४

मूळ स्वर–अ, इ, उ. ... २५

ॐ चें महत्व. ... २५

स्वरांची उत्पत्ति. ... २६

व्यंजनांची उत्पत्ति व त्यांचा क्रम. ... २७

वर्णांचा उच्चार व त्यांचें श्रवण. ... २९

मीमांसकाची प्रवृत्ति. ... ३१

चार प्रकारची वाणी. ... ३२

योगशास्त्रांतील षट्चक्र ३४

जितके उच्चार तितके वर्ण. ... ३६

प्रकरण ४ थें शब्दसिद्धि. ३९–५१

भाषाशास्त्राचा इतर शास्त्रांशीं संबंध. ... ३९

शब्दांच्या जाती. ४०

शब्दांचा एकमेकांशीं संबंध. तात्पर्यार्थ. ... ४२

त्याबद्दल दोन मतें. ... ४३

१ अन्विताभिधान.

२ अभिहितान्वय.

डॉ. न. गो. सरदेसाई यांचे पुस्तकप्रकाशनाबद्दल व जगद्धितेच्छु छापखान्याचे रा. गोंधळेकर यांचे पुस्तकछपाईबद्दल व रा. नारायण नागाजी कुलकर्णी बी. ए. ( भांडारकर इन्स्टिट्यूट ) यांनी प्रुफें तपासल्याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे.

सातारा; चैत्र १८४७.

कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी.

## प्रस्तुत पुस्तक लिहितांना विचारांत घेतलेल्या पुस्तकांची यादी.

*All these books are available at the Oriental Book Agency.*

1 Science of Language Vol. I. II–Max Muller
2 Principles of Comparative philology—Sayce.
3 Lectures on the study of Languages—Oertel.
4 Semantics—Breal
5 Comparative Grammar–Bopp. Vol I, II, III.
6 „ „ of modern Aryan Languages —Beames Vols I, II, III
7 Linguistic Survey of India, some Volumes by Dr. Grierson.
8 Wilson Philological lectures by Dr. Bhandarkar
9 Introduction to Philology—Dr Gune
10 Grammar of Eastern Hindi—Dr Hoernle
11 Languages of southern India—Cowell
12 Philology Primer—Beames
13 Study of Language—Primer—Sweet
14 संस्कृत भाषेचा उलगडा— राजवाडे
15 ज्ञानेश्वरीचें व्याकरण व इतर सर्व निबंध— राजवाडे
16 वैयाकरणभूषण कौंडदेव
17 अष्टाध्यायी पाणिनि— निर्णयसागर
18 मराठी भाषेची उत्पत्ति— विविधज्ञानविस्तार
19 काव्यप्रकाश–दुसरा उल्लास— मम्मट
20 षड्भाषाचन्द्रिका— लक्ष्मीधर के. पी. त्रिवेदी

पृष्ठ

शब्दाच्या मूळ जातीबद्दल मतें ... ४४
शब्दाचे तीन प्रकार. ... ५०
प्रकरण ५ वें प्रत्ययोद्गम. ५१—६७
व्याकरणाचा उपयोग.... ५१
वचनप्रत्यय. ... ५४
लिंगप्रत्यय. ... ५५
विभक्तिप्रत्यय. ... ५६
व्याकरणांतील आठ प्रकारच्या शब्दांची उत्पत्ति. ... ५७
क्रियापदाचीं रूपें. ... ५९
इतर भाषांतील साम्य.... ६१
पहिले धातु कोणचे ? अकर्मक. ... ६२
प्रकरण ६ वें वर्णप्रक्रिया. ६७—८३
वर्णप्रक्रिया शब्दाचा अर्थ. ... ६७
प्रक्रियेचा इतिहास. ... ६९
फरकाचीं कारणें. ६९
(अ) हवामान, (आ) भिन्न सस्कृतीचा सबंध, (इ) श्रम कमी करण्याची प्रवृत्ति, ... ७०
(ई) मेंदूंत होणारी हालचाल. ... ७४
स्वराचे फरक—आगम लोप, गुण, वृद्धि, सप्रसारण, संधि, विपर्यय, दीर्घत्व. ... ७५
व्यंजनप्रक्रिया. ... ८०
भाषेचें स्थिरत्व—दोन उदाहरणें. ... ८१
प्रकरण ७ वें शब्द—अर्थ प्रक्रिया. ८३—१०४
शब्दाचें व अर्थाचें साहचर्य व महत्त्व. ... ८३
शब्दाचे तीन प्रकार.... ८५
पतंजलीचें शब्दावरचें व्याख्यान ... ८६
संकेत व त्याची जरूरी ८७
शब्दाच्या वृत्ति-अभिधा ८९
लक्षणेची व्याप्ति— ... ९०
लक्षणा—पंथाच्या शब्दावरून ऐतिहासिक शब्दावरून, सजीवनिर्जीव गुणविपर्ययावरून ... ९१
व्यंजना व इतर शक्ति.... ९३
अश्लीलपरिहार. ... ९४
ग्राम्यशब्दपरिहार. ... ९५
अर्थसंकोच, अर्थवाढ, त्याचीं कारणें. ... ९६
नानार्थ—श्लेषार्थ—त्यानें होणारा गैरसमज. ... ९७
शब्दांची वाढ-शास्त्रीय शोधानें. ... ९८

पृष्ठ
प्रकरण ८ वें भाषा आणि पोटभाषा. १०४–११४
उत्पन्न होण्याचीं कारणें. १०४
पोटभाषाची कामगिरी. १०८
पाटभार्षांच स्थान. १०८
वर्गाच्या भाषा, गणभाषा ११०
त्यानीं व्यापला जाणाऱ्या प्रदेशाचा अदाज. ... ११२
प्रकरण ९ वें भाषेचे प्रकार. ११४–१२७
शब्द–प्रत्ययाचें नातें. ११४
अप्रत्ययी भाषा, आद्य-आर्य, चिनी. ... ११६
सामासिक भाषा–दोहोंत फरक. ... ११८
आद्यभाषेविषयीं मतभेद. ११९
प्रत्ययी भाषा. ... १२१
आगमप्रधान आणि उपसर्जनी भाषा. .. १२२
पाश्चात्यानीं केलेलें भाषाचें वर्गीकरण. १२३
आदेशप्रधान. ... १२६
भाषेचा चागुलपणा.... १२६
प्रकरण १० वें भाषेच्या जाती. १२७–१५३
मूळ भाषेचें नाव-आर्य-भाषा, आर्यभार्षेतील मुख्य बाबी. ... १२७
पृष्ठ
सेमिटिक, टयूरेनियन. १३४
हिंदुस्थानातील भाषा–त्यानीं व्यापलेला प्रदेश १३६
हिंदीभाषा आणि तिचें महत्त्व–सर्वमान्य बोली, हिंदीचे दोन वर्ग. ... १४०
इतर भाषा–बगाली, गुजराथी, मराठी इत्यादि, १४२
द्रविडी लोक–त्याची सस्कृति, त्याच्या भाषा कानडी, तामील, तेलगु, मल्याळी.... १४७
प्रकरण ११ वें मराठीची पूर्व-पीठिका. १५४–१९०
सस्कृतचें स्वरूप–भेद, ब्राह्मण–भाषा, .. १५५
नामाचे प्रत्यय, त्यातील सार्वनामिक अवशेष, १५९
क्रियापदाचे गण-त्याचीं चिन्हें. ... १६१
काळाचे प्रत्यय–त्याची उत्पत्ति. ... १६२
सस्कृत बोली होती किंवा नाहीं ... १६४
प्राकृत भाषाच्या सामान्य खुणा–प्राकृताचा काळ. १६९
अपभ्रंश प्राकृताचा लोप, त्याला प्रमाण. ... १७४

पृष्ठ

मराठीचा उदय, त्याला प्रमाण, शिलालेखवाङ्मय १८१
बोली उत्पन्न होण्याचीं कारणें—राज्यक्रांति व धर्मक्रांति. ... १८८

प्रकरण १२ वें मराठीवर इतर भाषांचा झालेला परिणाम. १९१–२०१
संस्कृत. ... १९१
इतर आर्यभाषा—गुजराथी, हिंदी, व्रज, इंग्लिश, फ्रेंच इत्यादि. ... १९५
कानडी. ... १९६
फारसी—फारसीनें व्याकरणांत केलेली ढवळाढवळ. ... १९८

प्रकरण १३ वें मराठीचें व्याकरण. २०२–२२३
स्वार्थे प्रत्यय. ... २०२
विभक्ति प्रत्यय—अपभ्रंश व संस्कृत प्रत्ययांशीं त्यांचा संबंध. ... २०५
शब्दयोगी अव्ययें. ... २०९
सामान्यरूपाची उपपत्ति ५ प्रकार. ... २१०
काळाचे प्रत्यय व त्यांचा अपभ्रंश ह्या भाषेंतील प्रत्ययांशीं संबंध. ... २१३
वर्तमान, आज्ञार्थ, भविष्य. ... २१४
इतर काळ—भविष्याबद्दलचें मत ( परस्मैपद व आत्मनेपद यांचा अवशेष ) ... २१६
प्रयोगाची उत्पत्ति. ... २२२

परिशिष्टें २२४–२४४
स्वरव्यंजनप्रक्रियेचीं उदाहरणें... २२४–२३३
विषयसूचि ... २३४–२४२
वर्णप्रक्रियेचे नियम २४३–२४४

# भाषाशास्त्र आणि मराठीभाषा.

## प्रकरण १ लें.

### सामान्य विवेचन—व्याख्या.

**भाषाशास्त्र व्याख्या**—भाषाशास्त्र म्हणजे भाषेसंबंधीं शास्त्र. त्यामध्यें भाषेचा शास्त्रीय विचार किंवा शास्त्रीय अभ्यास येतो. भाषेच्या पुष्कळ गोष्टींचा प्रामुख्यानें अभ्यास करावा लागतो. भाषेचे मुख्य घटक म्हणजे शब्द आणि त्याचा अर्थ—हें होत. ह्या दोहोंच्या सान्निध्यानें, त्यांच्या संबंधानें भाषेमध्यें नानाप्रकारचे विलक्षण चमत्कार उत्पन्न होतात. त्या सर्व चमत्कारांची शास्त्रीय मांडणी करून व नियमशुद्ध उपपत्ति लावून जे सिद्धांत उकललेले नसतील ते उकलण्याचा प्रयत्न करणें ह्याकडे भाषाशास्त्राचा रोख असतो. निरनिराळे आवाज कसे उत्पन्न होतात, त्यांचा शब्दाशीं संबंध कसा येतो, एखाद्या वस्तूचा फार वापर झाला म्हणजे ती जशी कमी कमी होत जाते तसे भाषेत शब्दाचे अवयव नेहेमींच्या बोलण्याच्या वापरामुळें कमी कमी कसे होत जातात, शब्दांना अर्थ कसा प्राप्त होतो, व त्या अर्थांत फेरबदल कसा होतो, आज जो अर्थ आहे तो नाहींसा कसा होतो व त्याची जागा दुसरा एखादा विरोधी अर्थ कसा पटकावितो व ह्या सर्वांचा भाषेच्या एकंदर सामान्य स्वरूपावर काय परिणाम होतो इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें देणें भाषाशास्त्राचा विषय आहे. भाषेमध्यें होणाऱ्या फरकाचीं कारणें, एका मुख्य भाषेपासून निरनिराळ्या पोटभाषा उत्पन्न होणें, नामें, क्रियापदें किंवा व्याकरणांतील आठ प्रकारच्या शब्दांचीं अनुक्रमें उत्पत्ति, प्रत्ययोद्भव इत्यादींचीं कारणें भाषाशास्त्र सांगतें. एवढेंच नव्हे तर समाजशास्त्रांतील अतिशय गूढ सिद्धांत भाषाशास्त्राच्या साहाय्यानें सोडविता येतात. समाजाची अतिशय प्राचीनकाळची स्थिति भाषेंतील शब्दांवरून अजमाविता येते. त्यावरून त्यांच्या चाली रीति समजतात. एका

विशिष्ट समाजाचा दुसऱ्या समाजाशीं किती संबंध आला व एकमेकांचें मिश्रण किती झालें, दोघांच्या संस्कृतीचा दर्जा काय होता, दोघांत कोणाची संस्कृती चढली, कोणाची किंवा नामोहरम झाली या विषयींचीं अनुमानें भाषाशास्त्राच्या जोरावर काढतां येतात. या अनुमानांत इतिहासाचा उपयोग होतो हें खरें आहे, पण भाषाशास्त्र हें इतिहासापेक्षांही श्रेष्ठ ठरतें. पूर्वकालीन वस्तुस्थिति इतिहासावरून नक्की कळते. पण जेथें इतिहासाचाही प्रवेश होत नाहीं, ज्या काळामधल्या इतिहास केवळ पुस्तकी लेखांतच नव्हे तर शिलालेख, ताम्रपट, किंवा नाणीं यामध्येंही सांपडत नाहीं, त्या काळांतील माहिती नेहमीं व्यवहारांत असलेल्या भाषेंतील शब्दांवरून अनुमानें बांधून काढतां येते. इतिहासाची प्रगति जेथें कुंठित होते तेथून भाषाशास्त्राच्या प्रगतीस सुरवात होते आणि मागें जात जात ती कोठवर जाईल त्याला मर्यादा नाहीं.

इतकी भाषाशास्त्राची व्याप्ति मोठी आहे. मनुष्य जसा उत्पन्न झाला तसा त्याबरोबर त्याची भाषाही उत्पन्न झाली, व तिचा प्रवाह आजपर्यंत अप्रतिहत गतीनें सारखा चालला आहे, व त्यामध्यें आपणास नाना चमत्कार दृष्टीस पडतात. हे चमत्कार जर नसते तर भाषाशास्त्राच्या अध्ययनामध्यें इतकें स्वारस्य नसतें. सर्व समाजांत जर एकच भाषा असती आणि इतर कलाप्रमाणें जर तीही शिकली गेली असती तर इतकी चाहीं गोडी त्यांत आली नसती. पण सुदैवानें तसें कांहीं नाहीं. सर्वांची सर्व काळीं एकच बोली असणें हें अस्वाभाविक आहे. निसर्गच त्याच्या आड येतो. भाषेचा कायमचा लोप आहे व तो अनादिही आहे. परंतु प्रवाह चालता चालता भाषामध्यें निरनिराळ्या अडचणींमुळें ज्या नानाप्रकारच्या नागमोडी झाल्या आहेत, कित्येक ठिकाणीं जे डोह पडले आहेत त्या सर्वांचा तलास लावून त्यांचा पौर्वापर्यसंबंध सांगणें याला जे प्रयत्न लागतात तेच भाषाशास्त्रांतील मुख्य प्रयत्न होत व त्यामुळेंच भाषाशास्त्राच्या अभ्यासांत स्वारस्य उतरलें आहे.

एकाद्या राष्ट्राची भाषा म्हणजे त्या राष्ट्राचें जीवन चरित्रच होय. भाषेमध्यें वाङ्मय येतें. भाषेचा अभ्यास म्हणजे वाङ्मयाचा अभ्यास खरा, परंतु तो रसिकत्वाच्या दृष्टीनें केलेला नव्हे. भाषाशास्त्र काव्यांतील

प्रसाद, कवीची प्रतिमा, पदलालित्य, अर्थगांभीर्य वगैरे अंतःकरणाला पटणाऱ्या गोष्टीकडे फारसें लक्ष्य देणार नाही. भाषेस तें स्वरूप कसें प्राप्त झालें, प्राप्त होण्यास कोणकोणत्या स्थितींतून जावें लागलें, अमक्या शब्दाचा मूळ अर्थ काय ? तो बदलला कसा ? त्याला कारणें काय झालीं ? इत्यादि गोष्टींकडे त्याचें लक्ष्य वेधतें. समोरच्या वृक्षाकडे पाहणाऱ्या प्रत्येक मनुष्याचा दृष्टिकोण सारखा कसा असणार ? कवि त्याच्याकडे एका दृष्टीनें पाहील व एक तत्व बाहेर काढील; वनस्पतिशास्त्रज्ञ त्याच वृक्षाकडे अगदीं दुसऱ्या दृष्टीनें पाहील आणि पहिल्यापेक्षां अगदीं निराळेंच तत्व काढील. वनस्पतिशास्त्रज्ञाची वनस्पतीकडे पाहण्याची दृष्टि आणि भाषाशास्त्रवेत्त्याची भाषेकडे पाहण्याची दृष्टि एकच म्हणजे खुलासाप्रेरित असते. वाङ्मयासारखे इतर पुष्कळ विषय भाषेमध्यें येतात. भाषेंत कलाकौशल्याचा इतिहास येणार, भाषेमध्यें राष्ट्राच्या धर्माचा इतिहास येणार. दुसरे आणखी कांहीं विषय भाषेच्या खोल खांचांमध्यें सांपडतील. ह्या सर्व विषयांचें एकवटलेलें स्वरूप भाषेंत अंतर्भूत होतें.

बराच कालपर्यंत भाषाशास्त्राचा अभ्यास एक, एका विशिष्ट भाषेपुरताच केला जात असे व तो करतांना त्या भाषेपुरताच मुख्यत्वेंकरून एक दोन बाबींकडेच रोंख असे. त्या म्हणजे एक स्वरप्रक्रिया आणि शब्दाची रूपप्रक्रिया. अर्थात होणाऱ्या प्रक्रियेकडे सुद्धां कोणी लक्ष देत नसत. वर सांगितलेल्या दोन मुद्यांच्या अनुषंगानें येणाऱ्या कांहीं साध्या इतर बाबींचाही विचार करावा लागत असे. पण त्या भाषेच्या टापूच्या बाहेर मजल जात नसे. अजून भाषाभाषांचा तुलनात्मक विचार करण्याचा प्रघात सुरू झाला नव्हता. तुलनात्मक अभ्यासाचा उपक्रम सुरू करण्याचें श्रेय सर्वांशीं संस्कृत भाषेकडे आहे. गेल्या शतकांत कांहीं युरोपीय पंडितांनीं त्या भाषेचा अभ्यास केला आणि संस्कृतवाङ्मयरूपी उदधींतून मंथन करून विविध प्रकारचीं मनोरम रत्नें शोधून काढलीं आणि त्या रत्नांच्या तेजानें तिकडील लोकांस दिपवून आणि भारून टाकलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, हिंदुस्थान आणि हिंदु लोक ह्यांच्याबद्दल ज्या कांहीं 'रेड-इंडियनी' कल्पना त्यांनीं ठरवून टाकल्या होत्या त्यांना चांगलाच

हरताळ फासला गेला. संस्कृताध्ययनातील शोधांमुळें नवे नवे सिद्धांत बाहेर येऊं लागले. पृथ्वीच्या पाठीवर नाना जातींचे लोक आहेत. त्यांच्या राहणींमध्यें, त्यांच्या अंगावरच्या कातडीच्या रंगामध्यें, व त्यांच्या धार्मिक व सामाजिक समजुतींत इतकें कांहीं जमीनअस्मानाचें अंतर आहे कीं ह्या विविधतापूर्ण अठरा पगडजाती एकाच जातीपासून उत्पन्न झाल्या आहेत व एक दुसऱ्याचे सख्खे चुलत चुलत का होईना पण नातेवाईक आहे असें विधान करणाऱ्या मनुष्यास, तौलनिक अभ्यासातील शोध बाहेर येण्याच्या अगोदरच्या काळांत, वेड्याच्या कोटींत घालण्यांत आलें असतें. परंतु भाषेच्या तुलनात्मक अभ्यासानें विरोधाभासात्मक विधानें सिद्ध केलीं आहेत, आणि हिंदुलोक आणि इंग्लिश लोक किंवा जर्मन किंवा पारशी किंवा लिथूनियन हे सर्व मूळच्या एकाच बर्फाच्छादित आर्टिक प्रदेशांत एकेकाळीं रहात असलेल्या 'आर्य' नांवाच्या वंशापासून निघाले आहेत, व म्हणून हे सर्व वर्ण एकमेकांशीं नात्यानें संबद्ध आहेत. पृथ्वीच्या मूळ टोळींत चालू असलेल्या भाषेपासून निघालेल्या सर्व भाषांच्या सामुदायिक अध्ययनानें मूळवसतिस्थान, मूळभाषा आणि मूळवंश ह्यांबद्दलची कल्पना बांधतां येते. हा सर्व भाषाशास्त्राच्या अभ्यासाचा उपकार आहे.

इतर अनेक शास्त्रांप्रमाणें भाषाशास्त्र हेंही एक नवीन शास्त्र आहे. शास्त्र या नात्यानें त्याचा जितका अधिकार तितका भाषाशास्त्राचाही आहे. त्या शास्त्रांनीं माणसाचा, माणूस ह्या नात्यानें जो दर्जा वाढविला आहे तसा किंवा त्याच्यापेक्षांही ज्यास्त भाषाशास्त्रानें वाढविला आहे. इतर शास्त्रें काय करतात ? शास्त्राचा मूळ उद्देश एकत्व प्रस्थापित करण्याचा असतो. जग म्हणजे नानाविध आकारांनी भरलेलें आहे. जगांत सर्व विविधत्वच आहे विविधत्वांत एकत्व हुडकून काढावयाचें काम शास्त्र. एकेकाळीं रसायनशास्त्रांत ७२ निरनिराळीं तत्त्वें मानीत असत, त्याच्यांत पृथक्करण होतां होतां सर्व विश्वांत एकच तत्त्व आहे व त्याचा खेळ आपण सर्व जगाच्या पसाऱ्यांत पाहतों असें म्हणण्यापर्यंत आधिभौतिक-दृष्टीनें आपल्या प्रयोगांच्या साहाय्यानें मजल गाठली आहे. झाडां झुडुपांत परवापर्यंत जीव मानला जात नसे. पण त्यांनाही सजीव प्राण्या-प्रमाणें भावना, चेतना, विकार आहेत असें ठरूं पहात आहे. असल्या

सर्व आधिभौतिक शास्त्रांचा रोख एकत्व प्रस्थापित करण्याचा आहे. आपल्या श्रद्धेवरच केवळ न विसवता बुद्धीनेंच फक्त मार्ग आक्रमणाऱ्या शास्त्राची ही स्थिति, मग श्रद्धेलाच प्रधान समजून श्रद्धेनेंच किंवा अंतःकरणातील प्रेरणेनें वेदातील व उपनिषदातील श्रुतिवाक्यें आप्तवाक्यें मानून त्याच्या समन्वयावर उभारलेल्या वेदांतशास्त्रांत एकत्व स्थापण्याचे प्रयत्न जर दिसले तर त्याबद्दल आश्चर्य वाटावयासच नको. वेदांतशास्त्र असेंच विविधत्वांत एकत्व शोधून काढून जीवशिवाच्या ऐक्यापर्यंत मजल नेऊन सोडतें. "स ऐच्छत बहुस्याम्" असल्या उपनिषद्वाक्यांत सांगितलेल्या नानात्वापासून "नेह नानास्ति किञ्चन" वगैरे वाक्यांत सांगितलेलें एकत्व शोधून काढण्याकडे सर्व शास्त्रांची प्रवृत्ति आहे. तसें भाषाशास्त्रही करणार. [सर्व सुधारलेल्या देशांतील भाषा एका आद्य आर्यभाषेपासून निघाल्या आहेत हें ऐक्य भाषाशास्त्र पाहते ] शब्दाचा इतिहास काढीत काढीत मागें समाजाच्या अगदीं पहिल्या स्वरूपापर्यंत जाता येतें. व्युत्पत्तिशास्त्राच्या मदतीनें शब्दांत व त्याच्या प्रत्ययांत साठविलेला इतिहास समजतो. धार्मिक मतांचा व पंथांचा ठेवा भाषेंतच जपून ठेवलेला असतो. भाषेच्या तुलनात्मक अभ्यासानें सर्व धर्मांचा तुलनात्मक अभ्यास सहज होतो व समाजाचे आचारविचार, चालीरीति, धार्मिक समजुती ह्यांचा उलगडा होतो ह्या सर्वांसाठीं इतर कांहीं शास्त्रांपासून भाषाशास्त्रास मदतीची अपेक्षा असते. भाषेच्या अध्ययनामुळें निघणाऱ्या सिद्धांतास इतिहासानें पुष्टि दिली पाहिजे. लेखी पुस्तकी इतिहासाच्या पूर्वीच्या कोरीव लेखांतल्या किंवा नाण्यावरच्या लेखांतल्या इतिहासानें भाषाशास्त्रांतील सिद्धांतास दाखले दिले पाहिजेत. पुराणवस्तुसंशोधन म्हणून एक नवीन शास्त्र अस्तित्वांत आलें आहे. X पुष्कळ बाबतींत तेंही भाषाशास्त्रास उपकारी आहे. भाषा समाजाचा विषय असल्यामुळें भाषाशास्त्र समाजशास्त्राचें एक अंग ठरतें भाषाशास्त्राच्या एका टोंकास मानवशास्त्र व दुसऱ्या टोंकास समाजशास्त्र आहे. [आपल्या स्वत चें सुख वाढविणें ही एक मनुष्याच्या जीवितांतील मुख्य कामगिरी आहे. मानवशास्त्रांतर्गत पुष्कळ गोष्टींचा उलगडा झाला म्हणजे त्या योगानें त्याचें समाधान झाल्यावर अर्थातच त्याचें सुख वाढणार व असल्या पुष्कळ गोष्टींचा उलगडा

करण्याची पात्रता भाषाशास्त्रांत आहे म्हणूनच त्यानें मोठमोठ्या विद्वानांचीं मनें आकर्षण करून घेतलीं आहेत.

भाषा केवळ आरशासारखी आहे. आरशांत ज्याप्रमाणें पाहणारांचें बरोबर प्रतिबिंब उमटतें, तद्वत् (त्याच्या आरश्या) स्पष्ट भाषेंत बोलणाऱ्याचें बरोबर प्रतिबिंब उमटलेलें सांपडतें.) कालाच्या तडाख्यांत सांपडून मी मी म्हणणारीं बलाढ्य राष्ट्रें काय अथवा व्यक्ति काय, आपआपल्या कर्तबगारीसह नामशेष होतात. इतिहासानें त्यांचा मागमूसही सांपडत नाहीं. शारीरिक अवशेष तर सांपडणें शक्यच नसतें. ठठरीवरून माणसाच्या आकृतीची कल्पना येते, तशीं भाषाही त्या त्या कालच्या समाजाची प्रतिकृति आहे. तीवरून समाजाची, समाजाच्या संस्कृतीची हुबेहुब नक्कल पुढें येऊ शकते. भाषा म्हणजे इतिहासाचें पूर्वस्वरूप आहे व इतिहास भाषेची पुरवणी आहे.

भाषेभाषेचें एक शास्त्र बनणें शक्य आहे ही जाणीव नवीनच उत्पन्न झाली आहे. या शास्त्राचा जन्म गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला. असें एक परस्पर उपकारी शास्त्र निघणें शक्य आहे अशी जाणीव विद्वान् लोकांना संस्कृत भाषेच्या अभ्यासापासून झाली. संस्कृत भाषेच्या वाघूळ-पणामुळें तिला स्वजनांनीच "गीर्वाणभाषा" म्हणून संबोधली एवढेंच नव्हे तर तिनें आपल्या वाघूळपणानें परदेशीयांस व परभाषीयांसही तिजकडेच भुरळ घालून मारून टाकलें आहे.

हिंदुस्थानांत भाषाशास्त्र केव्हां आलें:—पाश्चात्य देशांत भाषाशास्त्र फारसें जुनें समजलें जात नाहीं. गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत याचा जन्म झाला आहे, हें वर सांगितलेंच आहे. एकोणिसाव्या शतकांत जीं कांहीं नवीन शास्त्रें उत्पन्न झालीं त्यामध्यें भाषा शास्त्राची गणना केली आहे, आणि हिंदुस्थानांत त्याच्यानंतर या शास्त्राचा शिरकाव झाला आहे. इंग्लिश लोकांच्या सहवासानें ज्या कांहीं नव्या गोष्टी हिंदु लोकांस समजल्या आहेत त्यामध्यें भाषाशास्त्रही एक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. अव्वल इंग्रजींत संस्कृत भाषेचा अभ्यास कांहीं पाश्चात्यांनीं मोठी मेहनत घेऊन केला. सर्व शास्त्रांचें अध्ययन करण्यांत वर्षानुवर्षें तर्दे खर्च केलीं. त्याशिवाय धन व हिंमत किती वेचली हें कांहीं विचारूंच नका.

प्रत्यक्ष ब्राह्मणापेक्षा वेदाचें अध्ययन त्यानीं चागलें केलें. हें सर्व त्याचें ऋण कबूल केलें पाहिजे, व ऋण कबूल करण्यात खोट्या स्वदेशप्रीतीच्या कल्पना आड येऊ देता उपयोगीं नाहीं. त्या लोकाना सरकारचा पाठिंबा, राज्यकर्ते म्हणून वाटतील तीं साधनें व सामुग्री एकत्र करता येण्याजोगा अधिकार, वाटेल तितकें धन वेंचण्याचें सामर्थ्य इत्यादि गोष्टींमुळें कांहीं कांहीं बाबतींत अचाट व अगाढव्य अशीं कामें त्याना पार पाडता आलीं. त्यामध्येंच काम करण्याची त्याची मनावर इच्छा व जें कांहीं काम करवयाचें तें व्यवस्थित, पूर्ण व सागोपाग करण्याची हातोटी ह्याची भर पडली. संस्कृत भाषेच्या अध्ययनापासून तिकडील लोकाना भाषाशास्त्राच्या अभ्यासास फारच मदत झाली, व संस्कृतच्या ज्ञानापासून भाषाशास्त्रांत नवे नवे शोध होऊं लागले त्यामुळें थोड्याच अवधींत भाषाशास्त्राची उपासना चागली होऊन सध्या सध्या तर त्यात प्रगति बरीच दिसून येते. हिंदुस्थानात भाषाशास्त्र जें आलें तें त्याच्यानंतरच होय.

४. " भाषाशास्त्र आलें " म्हणजे तरी काय ? त्याचा अर्थ थोडासा निराळा आहे. संस्कृत भाषेबद्दल नियमबद्ध व शास्त्रीय विचार करण्याची पद्धत हिंदुस्थानात फार पूर्वीपासून आहे. त्याकडे एका नवीन दृष्टीनें पाहण्यास शिकविण्याची व त्या दृष्टीनें प्राप्त झालेल्या ठोकताळ्यांची अखिल मानवसृष्टीबद्दलचीं प्रमेयें रचण्याची पात्रता आणण्याची कामगिरी ह्या तौलनिक अभ्यासानें केली आहे हें खरें. संस्कृत बोली म्हणून वापरणाऱ्या आर्य लोकांत भाषाशास्त्रीय विचार पुष्कळ वेळा चालत असत. देवताचें स्तवन करणें, जीवन कलहात निरनिराळ्या देवताची करुणा भाकणें, निसर्गामध्यें होणाऱ्या भौतिक चमत्कारानीं थक्क होऊन त्यावर देवतांचा आरोप करणें, गोधन सापडून देण्यासाठीं, दस्यूचा नाश करण्यासाठीं, पुत्रधनधान्य समृद्धि होण्यासाठीं, देवताची मदत मागणें इत्यादि गोष्टी वेदाचे विषय असल्यामुळें भाषाविषयक वाद त्यामध्यें सापडू नयेत ह्यात कांहीं आश्चर्य नाहीं. तरी पण कोठें कोठें उल्लेख सांपडतात. दहाव्या मडळात वाग्विषयक 'वागंभृणी' देवतेचें एक सूक्त आहे, त्यामध्यें वाग्देवता आपलें सामर्थ्य वर्णन करीत आहे. " मी वाटेल तें करीन, ब्राह्मणाचा क्षत्रिय, क्षत्रियाचा ब्राह्मण, शूद्रासही ब्राह्मण

करण्याचें सामर्थ्य मजमध्यें आहे " वगैरे वढाईचे उद्‌गार काढले आहेत. भाषा विषयक चर्चा जरी प्रथमप्रथमच्या मंडळात नसली तरी दहाव्या मंडळात सांपडते. पहिल्या मंडळाच्या मानानें दहावें मंडळ पुष्कळ पुढचें ठरतें. ह्याच्या पुढचा दाखला यजुर्वेदाच्या दोन संहितांपैकीं कृष्णयजुर्वेदाच्या संहितेंत आढळतो. त्यातच प्रथम भाषाविषयक चर्चा सुरू झालेली दिसते. वाग्भृणींसूक्तापेक्षा कृष्णयजुर्वेदातला दाखला स्पष्टआहे. तेथील उताराच येथें देतों :—

वाग्वै पराच्यव्याकृतावदत्ते देवा इन्द्रमब्रुवन्निमां नो वाच व्याकुर्वीति। सोऽब्रवीद्वरं वृणै मह्यं चैवैष वायवे च सह गृह्याता इति तस्मादैन्द्रवायवः सह गृह्यते। तामिन्द्रो मध्यतोऽवक्रम्य व्याकरात्तस्मादियं व्याकृता वागुद्यते।

ह्या यजुर्वेदीय उताऱ्याचा अर्थ खालील प्रमाणें आहे —" वाणी प्रथम अस्पष्ट आणि अव्यक्त स्थितीमध्यें होती. देवानीं इंद्राची प्रार्थना केली कीं वाणीचे व्यक्त असे भाग पाडले जावेत. ह्यासाठीं आणि वायूसाठीं एका भांड्यामध्ये सोम आणा, म्हणजे करतों असं तो म्हणाला. तो सोमरस भांड्यात ओतल्यानंतर इंद्र आणि वायू ह्यानीं वाणीस व्यक्त स्वरूप दिलें. " ह्यातील वाणी प्रथम अव्यक्त होती व नंतर वायूच्या साहाय्यानें व्यक्त झाली इतकेंच महत्त्वाचें आहे. देवानीं इंद्राची स्तुति करणें किंवा इंद्रानें सोम पिऊन तयार होणें हें वर्णन तेथील संधर्माला धरून व परंपरायुक्त असल्यामुळें अर्थवादात्मक समजावयास कांहीं हरकत नाहीं. वायु सोम प्याला व सोमामुळें त्याला विशेष जोर आला व त्यानें व्यक्त स्वरूप दिलें मनांत आपले हजारो विचार चाललेले असतात आंत असल्या मुळें ते अव्यक्त असतात वायूच्या साहाय्यानें मुखाच्या वाटे त्या विचाराना आपण व्यक्त करतो. ही ध्वनींच्या उद्‌गमाची स्थिति तीच वरच्या उताऱ्यात वर्णन केली आहे सर्व सृष्ट वस्तूचा नियंता म्हणून इंद्राचा उल्लेख केला आहे. कधीं कधीं इंद्राच्या ऐवजीं आत्म्याचा उल्लेख सांपडतो. आत्म्यापासून आकाश, आकाशापासून वायू व वायूपासून इतर कांहीं पदार्थ असा सृष्टीचा क्रम सांगतात. वायु किंवा त्याचा समानार्थी श्वास हा भाषेच्या व्यक्ततेच्या मुळाशीं असतो.

वेदानंतर कालक्रमाच्या दृष्टीनें ब्राह्मण ग्रंथ येतात. ह्या ग्रंथांतही भाषाविषयक वाद पुष्कळ सांपडतात. ब्राह्मण ग्रंथाची प्रवृत्ति मुख्यत: यज्ञयागाच्या अभिवृद्धिसाठीं आहे, व यज्ञयागाच्या प्रधान वर्णनाबरोबर अंगभूत दुसऱ्या कित्येक गोष्टींचें वर्णन त्यामध्यें येतें. यज्ञयाग करण्यासाठीं पुष्कळ आचार्य विद्वान् मंडळी एकत्र यजमानानें रोवलेल्या यूपाभोंवतीं निरनिराळे अधिकार चालविण्याकरितां गोळा होत असत, त्यावेळेस यज्ञकर्म यथाविधि होत असेच, पण इतके विद्वान् ब्राह्मण एकत्र आल्यानंतर कांहींतरी विषयावर चर्चा झाल्याशिवाय कशी राहणार ! यज्ञ लहान असो वा मोठा असो, तो पूर्ण झाल्यावर केवढी इतिहास वगैरे सांगत असत. कधीं कधीं मंत्र उच्चारतांना आलेल्या शब्दाच्या व्युत्पत्तीचा कीस काढीत बसत असत. ऐतरेय ब्राह्मणांत मैत्र, मानुष, जाया ह्या शब्दांची व्युत्पत्ति दिली आहे. तैत्तीरीय संहितेंत रुद्र व वृत्र हे कोण होते ह्याचा विचार केलेला आढळतो. तैत्तिरिय ब्राह्मणांत 'अश्व' 'नक्षत्र' इत्यादि शब्दांची व्युत्पत्ति दिली आहे. कांहीं कांहीं शब्दव्युत्पत्त्या विलक्षण व मजेदार आहेत. विलक्षण व्युत्पत्त्या काढण्यांत आपल्या बुद्धीचे खेळ दाखविण्यांत त्या कर्तांना पुरुषार्थ वाटे. ब्राह्मणांतील आचार्यांच्या भाषाविषयक वादविवादांत भाषाशास्त्र आणि व्याकरणशास्त्र किंवा व्युत्पत्तिशास्त्र ह्यांची सरमेसळ केलेली दिसते. किंबहुना व्युत्पत्ति चांगली आली कीं भाषाशास्त्रांत सरवेज झाला अशी त्याची समजूत होती.

ह्या तऱ्हेनें निरुक्त कशीं अस्तित्वांत आलीं हें सांगता येईल. दिवसेंदिवस वेदाचा अर्थ दुर्गम झाला व तो सगतवार लावण्यासाठीं निरुक्तकाराची प्रवृत्ति झाली. पाणिनीपूर्व प्रसिद्ध आचार्य यास्क याच्या पूर्वीही कितीतरी निरुक्तकार होऊन गेले. नैरुक्तांची एक निराळी शाखा बनली व इतर शाखेप्रमाणें ह्या शाखेचें अध्ययन पद्धतशीर होऊं लागलें. अग्रायण, औदुंबरायण, और्णनाभ, कात्थक्य, कौत्स, क्रोष्टुकि, गार्ग्य, गालव, चर्मशिरस्, तैटिकी, वार्ष्यायणि, शतवलाक्ष, मौद्गल्य, शाकटायन, शाकपूणि, शाकल्य, स्थौलाष्ठीवि इत्यादि निरुक्तकारांचा उल्लेख यास्काचार्यांच्या निरुक्तांत आला आहे. ह्यावरून भाषाशास्त्रांतील निरुक्तिरूपी सरित्प्रवाहाचें मूळ आर्य संस्कृतींत किती लांबवर पसरलें आहे, ह्याची कल्पना

येईल. यास्काचार्यानंतरच्या विद्वान मंडळींत पाणिनी, कात्यायन, पतंजली, दंडी, मम्मट वगैरे आलंकारिक, असा क्रम लागतो. पुढें भाषेच्या अध्ययनाच्या आपोआप दोन शाखा झाल्या. एक वैयाकरणांनीं उचलली व दुसरी आलंकारिकांनीं उचलली. स्वरप्रक्रिया, प्रत्ययोद्गम ह्यांची चंगतवार मांडणी व शास्त्रीय उपपत्ति वैयाकरणांनीं लावली. शब्द आणि अर्थ ह्यांचा संबंध, त्यांमध्यें होणारे फेरबदल व त्यांमध्यें शब्दाच्या अभिधा, लक्षणा व व्यंजना या त्रिविध व्यापारानें होणारे प्रकार, त्यांचे बारिकसारीक भेद आलंकारिकांनीं विशद करून सांगितले. असले सर्व प्रयत्न संस्कृतच्याच बाबतींत झाले असें नाहीं तर संस्कृतापासून उत्पन्न झालेल्या किंवा संस्कृताच्या बरोबरीनें अस्तित्वांत असलेल्या प्राकृत भाषेंतही असले प्रयत्न झाले आहेत. वररुची, हेमचंद्र, कचायन ( कात्यायन ), त्रिविक्रम, वगैरे वैयाकरणांनीं आपापल्या परीनें चर्चा केली आहे.

त्याच्यानंतर मराठी भाषेच्या टापूंत यावयाचें म्हणजे प्रथम प्रथम थोडी निराशा होते. महिल्या कवींत भाषाशास्त्रावर कांहीं सांपडत नाहीं. सर्व काव्यांमध्यें व ग्रंथांमध्यें वेदांतांतील घटपटादि खटपटच फार दिसून येते. माया, ब्रह्म, जीवात्मा, परमात्मा, जगत्, पाप, पुण्य, इहलोक, परलोक, स्वर्ग व नरक वगैरे विषयाकडे त्यांचें लक्ष लागलेलें असें. त्यांच्या काव्यांत भक्तिरसानें ओथंबलेलीं वर्णनें व स्तवनें सांपडतात. ह्यावरून त्यांची किंमत कमी आहे असें नाहीं. भाषाशास्त्रांतील सिद्धांत नसतील, परंतु वाणीच्या सामर्थ्यानें, लेखणीच्या कौशल्यानें भाषेंत त्यांनीं विलक्षण प्रगति केली. त्यांचें सामर्थ्य भाषा तयार करण्याचें होतें. भाषेचा विचार करण्याचें नव्हतें. भाषा तयार करण्याचें कामच ज्यास्त महत्त्वाचें आहे. कवींना "शब्दसृष्टीचे ईश्वर" म्हणून जें बहुमानानें संबोधतात तें ह्याच दृष्टीनें. काव्यकरण्याचें काम फार बिकट आहे. त्याला प्रतिभेची ईश्वरी देणगी लागत्ये; पण पाठीमागून त्या काव्यावर टीका करणें इतकें कांहीं बिकट नाहीं. तद्वत्च ह्या शब्दसृष्टीच्या ईश्वरानीं आपलें रचनाकौशल्य खर्च करून भाषारूपी विश्वाची उभारणी केल्यानंतर मग त्यांतील संबंध दाखविण्याकरतां व धागे धागे हुडकून काढून एकंदर पटाची वीण विशद करून दाखविण्याकरतां टीकाकार, भाष्यकार, वैयाकरणी, आलंकारिक, नैरुक्त

इत्यादिकांची प्रवृत्ति होते. भाषेचें रानटी स्वरूप घालवून तिला सौंदर्य, हेंच शब्दसृष्टीचे ईश्वर प्राप्त करून देतात. तेव्हां त्यांच्या ग्रंथांत भाषा विषयक चर्चा न सांपडली म्हणून कांहीं विषाद वाटावयास नको. ज्ञानेश्वरएकनाथादिकांनीं योगशास्त्रान्तर्गत वर्णांचीं उद्गमस्थानें दिलीं आहेत. कांहीं कांहीं ठिकाणीं मराठी भाषेचा स्वाभिमानपूर्वक उल्लेख केला आहे. " देशी आणि संस्कृतवाणी । एका मावांची सुवासनी । शोभती तें आणि। चोखारा आईका" अशी "देशी लेणें" मराठीची स्तुति केली आहे,

संस्कृतवाणी देवें केली। प्राकृत तरी चोरापासून आली।
असो तु ह्या अभिमान भुली। वृथा बोली कायकाज ॥

अशा अधिक्षेपकांस रोकडा जबाब एकनाथानें विचारला आहे व पुढेंच 'माझी मराठी भाषा चोखडी' अशी तिची प्रशंसा केली आहे.

ह्याच्यापेक्षां जास्त व्यवहारोपयोगी भाषेचें वर्णन दासबोधांत आढळतें. पण त्याचा रोख भाषेची शास्त्रीय चर्चा करण्याचा नसून व्यवहारास उपयोगी पडेल अशा रीतीनें भाषा कशी पेलावी व तशी पेलली तर भाषेंत सामर्थ्य किती आहे ह्यासंबंधीचा तो विचार आहे.

मराठीभाषेच्या व्याकरणांत दादोबा तर्खडकर, गोडबोलेशास्त्री, चिपळूणकर, खेर, नवलकर, दामले, जोशी ह्यांनीं परिश्रम केले आहेत. प्रत्येकाच्या व्याकरणात कांहीं गुण, कांहीं दोष आहेत. व्याकरणांत जी एक ऐतिहासिक परंपरेची शुद्धता असते ती त्याच्यामध्यें सांपडत नाहीं. तसेंच न्याय व मानसशास्त्र ह्यांतील नियमांचा व्याकरणातील परिभाषेस जो पाया असतो तोही फारसा दिसून येत नाहीं. ह्याला कारण एकच असावेसें वाटतें आणि तें म्हणजे मराठीच्या पूर्वीच्या संस्कृत व प्राकृत ह्या भाषांशीं जितका परिचय असावयास पाहिजे तितका त्यांचा नसावा, व त्यामुळेंच, त्यांनीं लिहिलेलीं व्याकरणें भाषाशास्त्राच्या दृष्टीनें इतकीं उच्च ठरत नाहींत.

ही उणीव भाण्डारकर, भागवत, राजवाडे व गुणे ह्यांनीं दूर करून टाकली.

---

# प्रकरण २ रें

—:o:—

## भाषेची उत्पत्ति.

भाषेची उत्पत्ति कोठून—तिचें मूळ कोठें आहे, ह्या प्रश्नाचें उत्तर निरनिराळ्या रीतीनें देता येईल. मानसशास्त्राचा व शारीरशास्त्राचा भाषाशास्त्राशीं जो संबंध आहे त्यावरून एक उत्तर येईल, तर प्रत्येक धर्माच्या आद्य पुस्तकांत सृष्ट्युत्पत्तीविषयीं जें कांहीं सांगितलेलें असतें त्याकडे पाहिलें असतां वरील प्रश्नाचें दुसरेंच उत्तर येईल. आपणास एवढें माहीत आहे कीं, भाषा एखाद्या मुलाला प्राप्त होते ती एकदम केव्हांही प्राप्त होत नाहीं. दिवसानुदिवस वडील माणसें, भोंवतालची परिस्थिति, ह्यापासून तें मूल सारखें भाषा शिकत असतें. आदल्यादिवशीं रात्रीं निजावयाचें व दुसऱ्यादिवशीं उठून पाहावयाचें तों आपल्या भाषेंत निष्णात अशी केव्हांही स्थिति होत नाहीं. भाषा हळूहळू मिळवावी लागते. ईश्वरानें उत्पन्न केलेल्या आद्यपुरुषापासून तहत आजपर्यंत एक मानवी पिढी आपल्या पुढील पिढीस हीच एक जिनगी ठेवते. व प्रत्येक पिढी त्यांत सारखी भर टाकीत असते. तेव्हां सध्याची भाषारूपी जिनगी ह्यारूपास प्राप्त होण्यास कित्येक वर्षे लागलीं आहेत. आतां त्या त्या मानानें जसें जसें आपण मागें जाऊं तसें तसें भाषेचें स्वरूप संकुचित होत जाईल. आदिपुरुषाची भाषा अगदींच लहान असेल. जसजशा त्याच्या गरजा वाढत जातात किंवा जसजसा त्याचा ईश्वरनिर्मित सृष्टींतील पदार्थांशीं संबंध येत जातो, तसतसा त्याला नावें देऊन त्यांचा विच्छेद करण्याची त्याला इच्छा होते

ह्या बाबतींत धार्मिक मताचा पगडा आपल्या मनावर बसू देतां उपयोगी नाहीं. कांहीं धर्मांत असें सांगितलें आहे कीं, भाषा ही ईश्वराची देणगी आहे. ती ईश्वरनिर्मित आहे मनुष्याच्या प्रयत्नाचें फल असें तिच्यांत कांहींच नाहीं. परिपक्व दशेस आलेली, सांगोपांग तयार झालेली अशी भाषा ईश्वरानें आपल्या आवडत्या लेंकास दिली. खिस्ति मताप्रमाणें आदिपुरुष आदम हा ईश्वराचा पुत्र आहे. ईश्वरानें त्याला आपली

हुबेहुब नक्कल म्हणून तयार केलें. पृथ्वीवर असलेल्या धुळीच्या कणापासून त्याचें शरीर तयार केलें आणि त्याच्या आंत जीवितसार ओतलें. त्याच्या उपयोगासाठीं व सुखासाठीं त्यानें 'प्रकाश अवं दे' म्हटलें आणि जिकडे तिकडे प्रकाश झाला. तद्वतच वाणीचें झालें. अशा प्रकारचें वर्णन बहुतेक धर्मांच्या ग्रंथांत उत्पत्तिकांडांत सांपडावयाचें. उत्पत्तिक्रमांत आत्म्यास प्रधानपद देऊन त्यापासून आकाश, आकाशापासून वायू, वायूपासून इतर असें सांगितलें आहे. मनुस्मृतीच्या पहिल्या (सृष्टि) अध्यायांत हाच क्रम दिला आहे. विराट् पुरुष मन उत्पन्न करतो व इतर सृष्टि मन उत्पन्न करतेः—

" मनः सृष्टिं विकुरुते चोद्यमानं सिसृक्षया
आकाशं जायते तस्मात्तस्य शब्दं गुणं विदुः ॥ ७५ ॥

आपल्या इकडच्या ग्रंथांत भाषा ईश्वरानें उत्पन्न केली असें प्रत्यक्ष वर्णन नसून भाषेचें मूळ जो शब्द किंवा ध्वनि किंवा स्फोट ह्याची उत्पत्ति केली असें आहे. उपनिषत्काळीं वाणी आणि ऋग्वेद यांचें समीकरण बांधलें गेलें. ऋग्वेदाला प्राप्त झालेल्या महत्त्वामुळें किंवा ऋग्वेद म्हणजेच तेवढें चांगलें वाङ्मय अशी समजूत असल्यामुळें ऋग्वेद म्हणजे वाणी अशी समजूत होऊन बसली. " अथाध्यात्मं वागेवर्क् प्राणः साम " किंवा " वाग्वाव नाम्नोभूयसी वाग्वा ऋग्वेदं विज्ञापयति " ह्या विधानांच्या मुळाशीं तीच समजूत आहे. मन, प्राण आणि वाक् हीं तीन आत्म्यानें आपल्याला अन्न म्हणून निर्माण केलीं. " यः कश्च शब्दो वागेव सा " आणि " त्रयो लोका एत एव वाक् " असल्या वाक्यांत वाणीची किंवा भाषेची व्याप्ति किती समजली जात होती हें दिसून येतें. ऋग्वेदानंतर उत्पन्न झालेलें यजुर्वेद-सामवेदादि सर्व वाङ्मय वाणीच्या टापूंत आणलें. हें " सर्वेषां वेदानां वागेकायनम्" ह्यावरून दिसतें. बृहदारण्यकोपनिषदांत व इतर व्याकरणग्रंथांत वाणीस कामधेनु कल्पिली आहे व स्वाहाकार, वषट्कार, स्वधाकार हे तिचे स्तन आहेत, व त्यांवर देव मनुष्य व पितरयोनी पोसल्या आहेत.

अशा तऱ्हेचीं कोठें अलंकारिक तर कोठें भद्रामय अशीं भाषेच्या किंवा वाणीच्या उत्पत्तीबद्दल वर्णनें सांपडतात. मनुष्याचा स्वभाव कितीही भद्राळू असला तरी परिपक्व झालेली भाषा ईश्वरानें मनुष्याच्या तोंडांत

दिली, अशा प्रकारच्या सिद्धांतावर त्याचा विश्वास बसणें शक्य नाहीं. कारण, प्रत्यक्ष जें आढळतें तें त्याच्या विरुद्ध पडतें.

याणीमध्यें किंवा भाषेमध्यें ईश्वर निर्मितत्व आहे. नाकबूल कोण करील ? परंतु तें कोणत्या दृष्टीनें ? यथावत् वस्तूचा निर्माता ईश्वर आहे. देवापासून तों कीटकापर्यंत, राईपासून पर्वतापर्यंतच्या वस्तूंवर त्याची सत्ता आहे, त्याच्या इच्छेशिवाय वारा वाहत नाहीं, झाडाचें पान हालत नाहीं. बोलणारा उत्पन्न करण्यास, नंतर ध्वनि उत्पन्न करण्याचें सामर्थ्य देण्यास व सामर्थ्य दिल्यानंतरही त्याचें तोंड हालण्यास ईश्वराचें अधिष्ठान पाहिजे. त्याच्या मनांत विचार येण्यास ईश्वरी सत्तेची अपेक्षा लागते. कर्ता करविता तोच आहे. मनुष्य म्हणजे त्याच्या पुढें एक बाहुलें आहे, व त्याची प्रत्येक हालचाल तो आपल्या हातांत सूत्र धरून करीत असतो. तो त्याच्या हातून सर्व कामें जगाच्या योगक्षेमाकरितां करवून घेऊन आपण पुन्हां नामानिराळा राहतो. तेव्हां ह्या किंवा असल्या सर्वमान्य सिद्धांताप्रमाणें भाषेच्या उत्पत्तीमध्यें व नंतरच्या जोरदार जिवंतपणांतही ईश्वराचा कर्तृत्वपणा बरोबरचा आहे. प्रत्येक कार्यास इतर जशीं उपादान समवायादि कारणें लागतात तसें ईश्वराचें अधिष्ठानही लागतें, हें सर्व खरें आहे. ह्याच्या विरुद्ध न काढणें म्हणजे ईश्वराच्या प्रत्यक्ष अस्तित्वावर गदा आणण्याचा आरोप पतकरणें होय. परंतु ह्या सिद्धांतावर नजर ठेवून चालावयाचें नाहीं. हाच सिद्धांत जर ठाम समजून गळ्याशीं बांधला तर सर्वच आटोपलें. भाषेच्या बाबतींतच नव्हे तर इतर बाबतींतही मनुष्याच्या प्रयत्नास कांहींच वाव उरणार नाहीं. ईश्वरानें मनुष्य आपली प्रतिकृति बनविली, त्याअर्थी सर्व शक्तींत व अर्थात् निर्माणशक्तींतही मनुष्यानें आपल्या निर्माणकर्त्या जवळ जवळ जाण्याची आपली तयारी दाखवावी अशीच ईश्वराची योजना असली पाहिजे.

भाषा ही ईश्वराची देणगी आहे असें जे प्रतिपादितात त्यांच्यावर तर्कशास्त्रांतर्गत एक आपत्ति येते. तीवर त्यांना उत्तर देतां येत नाहीं. एखादा शिक्षक आपल्या बहिऱ्या व मुक्या मुलांना शिकविण्याकरतां त्यांप्रमाणें त्यांना पचतील व लवकर उमगतील अशा चिन्हांचा कोश तयार करतो त्याप्रमाणें ईश्वरानें आदिमनुष्यास शिकविण्याकरतां एकादा

कोश तयार केला किंवा कसें ! भाषा ही ईश्वरनिर्मित नाहीं कारण मुलें जन्मास येतात तीं भाषेशिवाय येतात आणि मुकेपणापासून तों अगदीं अतिशय उत्तम अशा वक्तृत्वापर्यंत मजल केवळ आपल्या प्रयत्नानें व भोंवतालच्या परिस्थितीच्या मदतीनें पोहोंचवितात. तेव्हां ह्यांत मनुष्यनिर्मित कांहीं तरी असलें पाहिजे. भाषेच्या उत्पत्तींत, वाढींत मनुष्याचा व्यक्ति ह्या नात्यानें हात असतोच; पण तो सुद्धां इतर समाजाशीं जर त्याचा संबंध न आला किंवा सहवास न घडला तर कुच-कामाचा ठरतो. पूर्वी एकदा भाषेसंबंधींचें गूढ आहे तरी काय हें जाणण्याची इच्छा चीनमधील एका बादशाहास झाली. त्यानें तें जाणण्यास एक प्रयोग केला. एक मूल जन्मल्याबरोबर त्याच्या गणगोतांतून त्याला उचलून लांब एका ओसाड जागेंत पहाऱ्यांत ठेवलें. त्याच्याशीं कोणाचा संबंध येऊ नये, त्याच्या नजरेस कोणी पडूं नये, त्याच्या कानांवर कोणाचा शब्द पडू नये अशी कडेकोट व्यवस्था केली. खाण्या-पिण्यास मात्र कोणत्यातरी अदृश्य रीतीनें त्यास पोचतें करीत असे. असा क्रम पुष्कळ वर्षे झाल्यानंतर त्या मुलाला एकदम बाहेर आणलें. तों प्रथम त्यानें 'ब्यॅकस' असा शब्द उच्चारला म्हणतात, व त्याला खावयास दिलें त्यावेळेस, गडबड करण्याचें त्यानें थांबविलें. हा प्रयोग बादशाहानें केवळ मौजेखातर केला असेल. पण त्यात ईश्वराचा किंवा मनुष्य-व्यक्तीचा भाषेच्या उत्पत्तींत किती हात आहे, हें दिसतें. असाच एक प्रयोग मोंगल बादशाहानें केला होता असें म्हणतात. तो मनुष्य, प्रेटोच्या माणसासारखा शारीरिक सर्व अवयवांनीं पूर्ण वाढ झालेला पण बुद्धि, समजण्याची पात्रता, या त मात्र लहान अर्भकासारखा, असा बाहेर आला. त्याच्या भाषेच्या व इतर बाबतींत उत्पत्ति व वाढ व्यष्टि ह्या नात्यानें एकलकोंड्याप्रमाणें राहिल्याबर होणें शक्य नाहीं. व्यक्तीच्या सर्वांगीण विकासास समाजाचा सहवास अगदीं जरूर आहे.

भाषेच्या उत्पत्तीचा उलगडा करतांना असलेंच एक दुसरें कारण पुढें मांडण्यांत येतें, कदाचित् भाषा ईश्वराची देणगी नसेल, परंतु सृष्टि उत्पन्न केल्याबरोबर जो एक मनुष्यांचा पहिला समाज असेल त्यानीं आपआपसांत सभा भरवून आपल्या सोयीकरतां कांहीं शब्दांचा समूह तयार

करून, कांहींतरी नियमानें आपली बोली बांधून, भाषेसंबंधीं आरंभ केला असावा. ह्या मतांतही फारसें तथ्य नाहीं. कोणीही जुलुमानें रूढि पाडूं शकत नाहीं व भाषेच्या बाबतींत तर समाजाला रूढि पाडतां येणारच नाहीं. 'संकेत' उत्पन्न करणें म्हणजे एक रूढि घालणें आहे व हें समाजाच्या आवांक्या बाहेरचें काम आहे. धर्माच्या बाबतींत रूढि पाडतां येईल, राजकीय बाबतींत एखा मनुष्याचा शब्द कायदा म्हणून पाळला जाईल. सामान्य जनतेला तो आवडो अथवा न आवडो त्याच्या आवडी निवडीचा राजसत्तेपुढें प्रश्न नसतो. पण हें झालें इतर बाबतींत. भाषेच्या बाबतींत धार्मिक सत्ता अथवा राजसत्ता अगदीं लंगड्या पडतात. अमक्यानें अमका शब्द अमक्याच तऱ्हेनें उच्चारला पाहिजे, अमकाच स्वर काढला पाहिजे, अमक्या शब्दाला अमकाच अर्थ पाहिजे असे कांहीं नियम कोणास करतां येणार नाहींत. भाषादेवीचा संचार नेहमीं तिच्या स्वैरवृत्तीनें चाललेला असतो. तिला कोणाचींही बंधनें सहन होत नाहींत. फार तर ती आपल्या भक्ताला आपल्या अंगावर नानातऱ्हेचीं भूषणें घालून आपल्या नेत्रांचें पारणें फेडण्यास मुभा देईल. ती कोणा राजाची अथवा धर्मगुरूची, अथवा समाजाची, इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष ईश्वराचीही सत्ता आपल्या वर कबूल करीत नाहीं.

भाषेच्या उत्पत्तीविषयीं जे दोन सिद्धांत पुढें आणण्यांत येतात त्यांचा येथवर विचार झाला व दोहोंपैकीं कोणत्याही मुद्यावर विसंबून भाषेच्या उत्पत्तीचा उलगडा नीटसा होत नाहीं असें दिसून आलें. उत्क्रांति सिद्धांताचें आपल्यास ह्या गोष्टींत कितपत साहाय्य होतें हें पाहूं. सध्या सर्वांना हें कबूल आहे कीं, मनुष्य प्राण्याचें हल्लीं जें स्वरूप आहे तें एकाएकीं त्यास प्राप्त झालें नाहीं. प्रसिद्ध शास्त्रसंशोधक डार्विन ह्याच्या मतांप्रमाणें मनुष्यप्राण्याचे पूर्वज वानरें ठरतात. त्यांच्या रूपापासून हळूहळू उत्क्रांति होत होत मनुष्याच्या सुंदर रूपापर्यंत आलें आहे. भाषेच्या बाबतींत आपल्या ह्या पूर्वजाची मजल केवळ 'चिरचिर' असा आवाज करण्याच्या पलीकडे गेली नव्हती. एवढें खरें आहे कीं, बाकीच्या प्राण्यांमध्यें आणि ह्या मानव पूर्वज मर्कटामध्यें बुद्धीच्या परिपक्वदशेमध्यें फार अंतर आहे. उपजत बुद्धि किंवा परिस्थितीचें ज्ञान इतरांच्यापेक्षां ह्या प्राण्यामध्यें ज्यास्त सांपडतें.

अंत करणातील विकार, विचार व भाव व्यक्तकरण्याकरता निरनिराळ्या तऱ्हेचे आवाज उत्पन्न करण्याचें ज्ञान त्याच्या डोक्यांत असतें, मनुष्याच्या शारीरिक स्वरूपाच्या बाबतींत जर आद्यपणा ह्या मर्कटास दिला जातो, तर मानवान पत्करलेल्या बोलीच्या बाबतींतही आद्यपणा मर्कटाच्या माथेस का देऊ नये ? बोलीचा आद्यपणा किंवा आद्यस्वरूप हातानें खुणाकरून आपल्या मनातील भाव आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यास कळवून योगक्षेमाचा मार्ग सुकर करून ठेवण्यात समजतात तर हें भाषेचें आद्य स्वरूप–हस्तविक्षेप, नेत्रविक्षेप किंवा मुखावरील स्नायूमध्यें फरक करून उत्पन्न केलेली भाषा–मानवपूर्वजाजवळ कितपत सापडते हे पाहिलें म्हणजे झालें माकडें सकाळीं आपापलीं लहान मुलं खेळवतात, त्याना मांडीवर घेऊन, वर फेकून, एकमेकाकडे फेंकून वगैरे प्रकारानें जो एक लडिवाळ पणा तीं दाखवतात तसा माणसास मुद्धा दाखविता येणार नाहीं

केवळ आवाज उत्पन्न करण्याच्या शक्तीबद्दलच जर पाहिलें तर मनुष्य आणि इतर प्राणी ह्यामध्यें काहीं फरक नाहीं. आपण जसे निर निराळे स्वर उत्पन्न करतों तसे निरनिराळे स्वर कोणत्याही प्राण्यास उत्पन्न करता येतात एकसारखा एकादा स्वर तर कमी अधिक प्रमाणानें काढण्याची शक्ति ईश्वरानें यचावत् सर्व प्राण्याना दिली आहे परंतु एक-सुरी आवाजानें भिन्नभाव बाहर प्रकट केले जात नाहींत तेंव्हा त्या एकजिनसी तारेंत काहीं तरी भेद उत्पन्न केले पाहिजेत, तरच त्याच्या साहाय्यानें भिन्नभाव प्रकट करता यतील एकसुरी आवाज उत्पन्न होताना त्या आवाजाच्या मार्गांत काहीं तरी अडथळा ठेवला म्हणजे झालें अडथळे ठेवण्याचीं साधनें ईश्वरनिर्मित आहेत परंतु तीं वापरण्याचें ज्ञान व कौशल्य प्रत्येक प्राण्यानें आपल्या मगदुराप्रमाणें व गरजाप्रमाणें दाखवणें त्याच्या स्वाधीन आहे. मनुष्यापेक्षा खालच्या दर्जाच्या प्राण्यास एकसुरी आवाजात अडथळे ठेवण्याचें इतकें साधत नाहीं काहीं थोडे अडथळे ते ठेवू शकतात व पुष्कळ तऱ्हेचे आवाजही उत्पन्न करतात त्या आवाजाच्या प्रकाराप्रमाणे मनुष्य त्याच्या मनातील भाव ओळखतो उदाहरणार्थ कुत्र्याचा आवाज घेऊ. त्याच्या गुरगुरण्यात प्रकार आहेत दुसरा अनोळखी कुत्रा भेटला म्हणजे त्याचें एकप्रकारचें गुरगुरणें असतें,

माणसानें काठीनें मारलें म्हणजे दुसऱ्या सन्देचें गुरगुरणें असते. तें रडावयास लागलें म्हणजे त्याचा एक निराळाच आवाज बाहेर पडतो. दुसऱ्या पुष्याशीं भांडावयास कुत्रें लागलें म्हणजे त्या सर्वांपेक्षा निराळाच आवाज ऐकूं येतो. त्याप्रमाणें इतर प्राण्यांचें. पश्वादींही हीच गत. बुद्धीची देणगी नसल्यामुळें किंवा असली तर अगदीं खालच्या दर्जाची बुद्धि असल्यामुळें ह्यापुढें मजल त्यांच्यानें मारवत नाहीं. तें सर्व मनुष्यांच्या वाट्यास आलें आहे.

निरनिराळे स्वर मुखांतून कसे बाहेर पडतात ह्याचा सविस्तर शास्त्रीय विचार पुढें येणारच आहे. सध्या आपणास इतकें समजलें कीं आवाज उत्पन्न करणं निसर्गानें सर्वांच्या आटोक्यांत ठेवलें आहे. आवाजाच्या मार्गांत अडथळे ठेवून निरनिराळे प्रकार उत्पन्न होतात, व अन्त करणांतील भाव त्याच्या योगानें दाखविले जातात. मनुष्याचीं स्वर उत्पन्न करण्याचीं अतरिंद्रियें आहेत, तींही हळू हळू उत्पन्न झालीं आहेत एक काळ असा होता कीं त्यावेळेस मनुष्यही इतर प्राण्याप्रमाणें एकच स्वर उत्पन्न करीत होता. जसजसे दिवस जात चालले तस त्याला ह्या एकतानी स्वराच्या साहाय्यानें दोन्ही—सुख व दु ख—दाखविता येत होतीं एवढेंच नव्हे, पण आपणास अपेक्षित अशा दुसऱ्या इसमास बोलवण्यात त्या आवाजाचा उपयोग त्याला करता येत होता.

प्राणिमात्रास जशी गर्भावस्था आहे तशी भाषेसही गर्भावस्था आहे. सूक्ष्मदर्शक यत्रानें जर गर्भाचें निरीक्षण केलें तर त्या गर्भात पुढें उत्पन्न होणाऱ्या परिपक्क अशा प्राण्याचें सर्वतोहेनें परिपक्क असें एक चिमुकलें रूप दृष्टीस पडतें. त्या गर्भास सर्व स्थित्यंतरातून व रूपांतरातून वाढीस लागण्यास व पूर्णत्वास येण्यास काळ जावा लागतो. किंवा हें ज्याप्रमाणें प्राणिमात्राचें अतिसूक्ष्म स्थितींतलें स्वरूप आहे त्याप्रमाणें मनुष्यानें प्रथम उत्पन्न केलेला जो आरोदन किंवा आरटन स्वर त्यात भाषेचें सर्व एकवटलेलें मूळ पाहण्यास सापडतें. त्या आरोदन किंवा आरटन स्वरात निरनिराळे प्रकार झाले. त्याचा पुन पुन उच्चार, त्याचें दीर्घ उच्चारण, कमी अधिक प्रमाणात उत्पन्न होणारे भिन्न आवाज, वगैरे

मनुष्याचे भाषा सुरू करण्याचे प्रथमचे प्रयत्न असले पाहिजेत. त्या पहिल्या मनुष्याचा किंवा पहिल्या समाजाचा शब्दकोश म्हणजे या एकतानी सुराचे पांच किंवा सहा प्रकार, आणि त्या प्रकारांनीं अंतःकरणांतील भावना दाखवितां येत असाव्यात. सध्यांच्या इतक्या गरजा त्या पहिल्या समाजाच्या नसाव्यात. त्यांच्या गरजा तात्पुरत्या अगदीं विशेषसें नडेल अशाच असावयाच्या. त्या म्हणजे ज्याच्यावर जीविताचें अस्तित्व अवलंबून राहावयाचें अशाच असावयाच्या. क्षुत्, तृष्णा, भय, आशा, इच्छा, सुख, दुःख इत्यादि भावना असाव्यात, व ह्यांचा भाव आपल्या निकट असणाऱ्या लोकांस कळविता येण्यासाठीं निरनिराळे स्वर उत्पन्न केले जात असले पाहिजेत.

ह्याच्या पुढची पायरी म्हणजे इतर प्राणि जसे स्वर उत्पन्न करतात तसे हुबेहुब प्रतिध्वनि आपण स्वतः काढावयाचे आणि त्या स्वरानुरूप त्या त्या प्राण्यांस एकमेकांपासून निराळे काढून नावें द्यावयाचीं. कोणत्याही भाषेच्या वर्तमानकालीन सुधारलेल्या स्थितींत स्वरानुकरण व त्याप्रमाणें प्राप्त झालेलें नामाभिधान हें फारसें दिसून येणार नाहीं. दिवसानुदिवस बाहेर पडत असलेल्या ज्ञानाच्या नवीन नवीन शोधामुळें त्याच्यावर इतके थर पडले आहेत कीं, स्वरानुकरणासंबधीं माहिती पार बुजली आहे. परंतु जर थोडासा विचार केला किंवा वर वर दिसणाऱ्या गोष्टींच्या आंत जरा शिरकाव करून घेतला म्हणजे समजून येईल कीं, मनुष्याच्या प्रथम दिवसांतल्या ज्ञानाच्या पुंजीचा विचार करून जर पाहिलें तर त्यावेळेस स्वरानु-करणाशिवाय दुसरें साधन मनुष्याच्या हातांत काय होतें ? मुद्दा हा होता कीं कोणीकडून तरी दुसऱ्या माणसास आपल्या मनातील विचाराचा बोध करून देणें. समजा, कुत्र्याबद्दलचा किंवा गाढवाबद्दलचा आपल्या मनांतील विचाराचा दुसऱ्यास बोध करून देणें आहे; आणि "कुत्रा अथवा गाढव" असे शब्द तर माहीत नाहींत. तर मग तो बोध कसा करून द्यावयाचा ? जवळ जशीं जशीं साधनें असतील तसा त्यांचा उपयोग करून इष्ट साध्य करून घेतां येईल. चित्रकला साधन असलें तर त्या कल्पनेचा बोध करण्या-करतां कुत्र्याचें किंवा गाढवाचें चित्र काढून दाखवितां येईल. कांहीं खुणांचा जर उपयोग करावयाचा म्हटलें तर त्या प्राण्याची नेहमींची

कायमची काहीं तरी अंगविक्षेपाची सवय—उदाहरणार्थ कुत्रें आपलें शेंपूट हालवितें किंवा चावा घेण्यासाठीं धावतें, गाढव नेहमीं फुरफुर करतें—अदाच काहीं तरी अंगविक्षेपाची खूण करून त्या प्राण्यासंबंधीं कल्पनेचा बोध आपण दुसऱ्यास करून देऊं. तिसरें साधन स्वर आहे. कुत्र्याचा जो नेहमींचा स्वर भों, भों, किंवा गाढवाचें खिंकाळणें त्यासारखा बरोबर आवाज काढून प्राण्याची कल्पना आणून देणें.

भाषेच्या उत्पत्तींत ज्याचें प्रधानत्वानें नांदणारें हें अनुकरण तत्त्व लहान मुलाच्या भाषेंत तर फारच दिसून येतें. लहान मुलास भाषा काहीं एकदम येत नाहीं. त्याचा शब्दकोश हळूहळू बनत जातो. त्याच्या शब्द कोशांत जर एकाद्या वस्तूचा दर्शक शब्द नसेल तर अनुकरणानें, अंग विक्षेपानें, हाताच्या डोळ्याच्या खुणांनीं, कोणीकडून तरी अर्ध्यामुर्ध्या भाषेनें आपल्या मनांतील भाव आपल्या वडील मंडळीस करून देतांना त्या बिचाऱ्या मुलाची त्रेधा उडते. मांजर हें 'मांजर' ह्या शब्दानें मूल ओळखत नाहीं. म्यँव म्हटलें म्हणजे त्याची त्याला प्रतीति होते. गाईस 'हम्मा' म्हणून मुलाच्या भाषेंत शब्द आहे. 'कावळा' आला म्हटलें तर लहान मुलास कळावयाचें नाहीं. कावळ्याबद्दल 'काव' असा त्याला परिचित शब्द घातला तर त्याला लगेंच प्रकाश पडेल. मूल आणि आद्यकालिन पुरुष ह्यांच्या भाषा शिकण्यांत पुष्कळ अंतर आहे. मुलास त्याची चुकी सांगणारा, चुकी असली तर सावरून धरणारा व चुकी असून देखील त्याचें कौतुक करून त्याच्या तोंडावरून हात फिरवून शाबासकी देणारा त्याचा बाप किंवा कोणी वडील माणूस जवळ असतो, तसा त्या पहिल्या मनुष्याच्या बाबतींत कोणी नसतो. त्याच्या चुका त्याला स्वतः ला जशा अडचणी येतील तशा सुधाराव्या लागतात. समवयी गोष्टीस समर्पक नांव असें एक सारखें मूल आपल्या वडिलांच्यावरून धडे घेत असतें. व ह्या रीतीनें भाषाशिक्षणाच्या रस्त्यावर मजल दरमजल करून थोड्याच दिवसांत आपलें ध्येय गांठतें.

येथें एक गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं ती ही कीं, भाषेला जन्मास आणण्यास व पुढें तिचें संगोपन करण्यास स्वरानुकरण कितीही कारणीभूत

झालें तरी तें एकटेंच तेवढें कारण म्हणून म्हणता येणार नाहीं. सर्व शब्दांची ह्यानें उत्पत्ति लागणार नाहीं. एकादा पक्षी रेंव, रेंव असा शब्द करतो म्हणून त्याला काव म्हटलें. दुसरा कु कु, असा शब्द करतो म्हणून कुक्कुट म्हटलें, मांजरास कोणी तोंड धुतांना पाहिलें असेल म्हणून त्याला मार्जार म्हटलें, मांजर मेंव मेंव करतें म्हणून त्याला माऊ, माऊबाई, मनुबाई म्हटलें, हें सर्व खरें! पण ह्या सदराखालीं न येणारे असे पुष्कळ शब्द सापडतील. सजीव प्राण्यांच्या बाबतींत प्रत्यक्ष स्वरानुकरण शक्यतरी आहे, पण निर्जीव अचेतन पदार्थांच्या बाबतींत काय? व त्यांना नांवें कशीं द्यावयाचीं? तेंही कदाचित् लक्षणा वगैरे प्रकार उपयोगांत आणून वारता येईल. परंतु भावना, इच्छा, भय इत्यादि विकारवाचक शब्दांची उपपत्ति कशी लावावयाची? मनुष्य रानटी स्थितींत असो वा सुधारलेल्या स्थितींत असो, तो स्ववंशवर्धन आणि स्वशरीरसंरक्षण हीं दोन कामें सारखीं करीत असतो. किंबहुना त्याच्या आयुष्यांतील हीं दोन प्रधान अंगें होत. स्वशरीरसंरक्षण अन्न घेऊन, संकट टाळून, वगैरे उपायांनीं करावयाचें असतें. रानटी स्थितींत त्याच्यावर कसल्याप्रकारचीं संकटें येत असलीं पाहिजेत? जंगलांत रहात असल्यामुळें हिंस्र पशूपासूनच त्याला पुष्कळ भीति असावयाची. भाषा अवगत नसणाऱ्या पहिल्या माणसानें ज्यावेळेस लांडगा किंवा तसलाच एकादा हिंस्र प्राणि आपल्याकडे येतांना पाहिल्यावर भीतीनें गांगरून जाऊन प्रथम शब्द कोणता काढला असावा? अंतःकरणाच्या वृत्तीवर जबरदस्त धक्का बसल्यामुळें कांहीं तरी भावनाप्रेरित व विकारप्रधान शब्द बाहेर पडणार ह्यांत कांहीं वादच नाहीं. तो मनुष्य काय ओरडला असेल? लांडगा! लांडगा! लांडगा! असें ओरडला किंवा धावा! धावा! धावा, असें ओरडला! का आला! आला! आला! आला! असें ओरडला? कांहीं तरी ओरडला हें खास, व जो शब्द ओरडला असेल तो भावनाप्रधान अथवा उद्गारप्रधान असावयाचा. म्हणून त्याला उद्गारवाचक म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. व्याकरणाच्या नियमाच्या दृष्टीनें लांडगा कदाचित् नाम ठरेल व आला, धांवा वगैरे क्रियापदें ठरतील, परंतु ज्या भावनेनें हे शब्द उच्चारले गेले तिच्या दृष्टीनें ते उद्गारवाचक ठरले पाहिजेत. अशा रीतीनें भाषेच्या

उत्पत्तीच्या मुळाशीं जशी स्वरानुकरण करण्याची प्रवृत्ति सापडते, तशीच भावनाप्रधान शब्द करण्याचीही प्रवृत्ति सापडते. पहिल्या मनुष्याचा शब्दकोश ह्याप्रमाणें अनुकरणजन्य असो किंवा भावनाप्रधान उद्गारापासून होवो, त्याच्या कोशांत शब्द फार थोडे असले पाहिजेत, आणि जसजसा त्याचा संबंध भोंवतालच्या परिस्थितीशीं जास्त येऊं लागला, व जसजशा त्याच्या गरजा वाढूं लागल्या व आपलें हृद्गत विचार दुसऱ्यास कळविण्यास अडचणी जसजशा जास्त भासूं लागल्या, तसतसा त्याचा शब्दकोश वाढला असला पाहिजे.

हा शब्दांचा कोश वाढतो कसा व वाढण्यास कारणें काय होतात ? शब्दकोशाच्या वाढीचीं कारणें पुष्कळच आहेत. एक म्हणजे मनुष्याची इच्छा. एखाद्या पदार्थाला नाव नाहीं आणि त्याचा नावानें तर निर्देश करावयाचा. मग त्याला कांहीं तरी हेतुप्रेरित नाव द्यावयाचें आणि म्हणावयाचें कीं, ह्या शब्दास हा अर्थ आहे आणि आजपासून ह्याचा हा अमुक अर्थ समजावा आणि तसा त्याचा उपयोग केला जावा. रूढीच्या जबरदस्त कचाटींत शब्द एकदा सापडला म्हणजे त्याचा सर्वतोमुखीं प्रसार होण्यास फारसा वेळ लागत नाहीं. आता एवढें मात्र खरें कीं, “ अस्मात् शब्दात् अयम् अर्थ बोद्धव्य ” अशी रूढी बनून त्याप्रमाणें शब्द बनण्यास कांहीं तरी परिस्थिति अनुकूल लागते. नवें नाव पदार्थाला द्यावयाचें म्हणजे वरच्या नियमाप्रमाणें मनुष्य देतो हें खरें आहे, तरी पण त्याबरोबर हेंही खरें आहे कीं नाव देणाऱ्याच्या मनावर नाव देण्याच्या वेळची परिस्थिति परिणाम केल्याविना रहात नाहीं. त्या पदार्थाचें दुसऱ्या इतर पदार्थांशीं नानातऱ्हेचे संबंध येतात त्याच्यामध्यें कित्येक तऱ्हेचें साम्य आढळतात, ह्यातून कोणत्या तरी संबधाचा, सहवासाचा अथवा साम्याचा—सारखेपणाचा आधार घेऊन, एकमेकांत मिसळून वगैरे नानातऱ्हा करून नवीन पदार्थाचा नामकरण विधि पार पडतो, मात्र जें कांहीं होतें तें उघड रीतीनें सभाविमा भरवून वाद-विवाद वगैरे होऊन न होता नामकरण करणाऱ्याच्या मनात गुप्तरीतीनें होत असतें व त्या सर्वांचा दृश्य परिणाम म्हणजे तो “ अस्मात् शब्दात् अयम् अर्थः बोद्धव्यः ” अशा सकेतास आरंभ करतो हा होय.

पदार्थांच्या नामकरणाच्या मुळाशीं जे संबंध असतात त्यांच्याबद्दल भाषाशास्त्रवेत्त्यांमध्यें भिन्नमत आढळून येतें. कांहीं लोक सर्व संबंधाचा आधार 'रूपक' आहे म्हणतात, तर कांहीं 'अतिशयोक्ति' आहे असें म्हणतात.

दोन्ही मतांत फारशी तफावत नाहीं. भाषा ही अलंकार-मूलक असते व सर्व अलंकारांच्या मुळाशीं अतिशयोक्ति असते. सर्व अलंकारांचा अतिशयोक्ति जसा कांहीं प्राण असतो. मम्मटानें दहाव्या उल्लासांत " अतिशयोक्तिरेव प्राणत्वेन अवतिष्ठते तां विना प्रायेणऽलंकारत्वायोगात् " असें म्हटलें आहे. रूपक घेतलें काय किंवा अतिशयोक्ति घेतली काय दोन्हींची शब्दाच्या लाक्षणिक अर्थावरच उभारणी केलेली असते. तेव्हां रूपक मुळाशीं असतो किंवा अतिशयोक्ति असते असें म्हणण्यापेक्षां शब्दाचा लाक्षणिक अर्थच भाषेचा पुष्कळ अंशानें आधार असतो हें म्हणणें जास्त शास्त्रशुद्ध ठरेल.

शब्दाच्या सख्येची वाढ आणि तिचीं कारणें ह्यांचा निराळे ठिकाणीं 'शब्द व अर्थप्रक्रिया' ह्या सदराखालीं सविस्तर विचार येईलच. भाषेच्या उत्पत्तीशीं शब्दाचा जेवढा संबंध येतो त्या दृष्टीनें थोडासा उहापोह ह्या ठिकाणीं करावा लागला.

---

## प्रकरण ३ रें

—:o:—

### वर्णोत्पत्ति.

भाषेच्या उत्पत्तीविषयीं आपण एथवर विचार केला. आतां त्याच्याही जरा पलिकडे जाऊन मनुष्याच्या तोंडाच्या आंतील भागांत ईश्वरानें काय रचना केली आहे, कीं जिच्या साहाय्यानें त्याला निरनिराळे आवाज काढतां येतात व आपली भाषा बनवितां येते हें पाहूं. मनुष्याच्या मुखामध्यें सूर काढण्याचें एक यंत्रच आहे. व त्याची रचना थेट एकाद्या वाऱ्याच्या भात्यानें चालणाऱ्या सुस्वर वाद्यासारखी आहे. किंवा वस्तुस्थिति कदाचित् उलटीच खरी असेल. मुखांतील वाऱ्याच्या हारमोनियमवरून हल्लीं प्रचारांत

असलेल्या तकट्टंपी हारमोनियमची कल्पना मनुष्यानें काढली असेल. असो मुखांतील यांत्रिक रचना काय आहे हें पाहणें आहे.




सर्वांच्या मुळाशीं फुफ्फुसें आहेत. ह्याच्या साहाय्यानें मनुष्यास श्वासोच्छ्वास करता येतो. ह्याच्या सुस्थितीवर मनुष्याचें जीवित सर्वस्वीं अवलंबून आहे. हीं फुफ्फुसें चांगलीं तर जीवित चांगलें. नाहीं तर सर्व व्यर्थ. बाहेरील हवा, ह्याच्या सहाय्यानें आपण आंत घेतों आणि बाहेर सोडतों. हवा बाहेर सोडतांना निरनिराळ्या स्थानांतून किंवा निरनिराळ्या पोकळ्यांतून त्या हवेला खेंचून आपण स्वर काढतों. फुफ्फुसास लागूनच दुसरी एक श्वासनलिका आहे. हिच्यांतून हवा केवळ आंत बाहेर जाते. ह्या नलिकेंत कांहीं अडथळा झाला म्हणजे आपणास ठसका लागतो. ह्या नलिके नंतर दोन पोकळ्या आहेत. श्वासनलिकेंतून हवा किंवा श्वास पहिल्या पोकळीपर्यंत येईतोंपर्यंत निर्विकार असतो. ती हवा किंवा श्वास ह्या रूपांतच असते. पण पहिल्या अ पोकळींत आल्या बरोबर कांहीं तरी एकसुरी आवाज उत्पन्न करण्याचें त्या पोकळीच्या साहाय्यानें सामर्थ्य येतें. त्याच्या पुढची जी ब पोकळी आहे तिचा एक कायमचा आकार ठरलेला नाहीं. वाटेल तसा आकार तिला देता येतो. आंतून बाहेर येणाऱ्या हवेच्या मानानें ही दुसरी ब पोकळी लहान किंवा मोठा आकार घेते व त्याप्रमाणें उच्चारलेल्या स्वराचा सविकार किंवा विकार होतो. ही पोकळी फार महत्त्वाची आहे. स्वराचे जे प्रकार झाले आहेत ते ह्या पोकळीच्यामुळें. जिव्हेच्या पाठीमागें जो एक मोकळा भाग आहे तो सर्व ह्या पोकळीच्या ताब्यांत आहे. श्वासाला जे विविध प्रकार होतात व त्याप्रमाणें विविध कंठ्य, तालव्य, ओष्ठ्य, वगैरे नांवें मिळतात तीं नांवें मिळण्यास आरंभ ह्या पोकळीपासून होतो. स्वरोच्चारांत मुखांतील सर्व अवयव थोडाबहुत भाग घेतात. ह्या 'काकलक' मण्यापासून ओठाच्या शेवटच्या भागापर्यंतच्या भागाला उच्चाराच्या दृष्टीनें मुख ही संज्ञा दिली आहे. व त्या भागांतील सर्व अवयवांचा उपयोग स्वरोच्चाराच्या कामीं करावा लागतो. आपल्या

गळ्यांत जें हाड पुढें आलेलें दिसतें त्यालाच "काकलक" मणी अशी पारिभाषिक संज्ञा आहे.

ह्या नंतरची पायरी स्वर आणि व्यंजनें उत्पन्न करणें ही होय. स्वर आणि व्यंजनें ह्या दोन वर्णांत उच्चारण्यास स्वर सोपे आहेत. तेव्हां व्यंजनांच्या अगोदर त्याचा जन्म झाला असला पाहिजे. स्वरांमध्यें सुद्धां साधे स्वर आणि संयुक्तस्वर अशी विभागणी आहे. साधे स्वर अ, इ, उ आणि ह्यांच्या एकमेकांशीं मिश्रणानें किंवा दीर्घीभवनानें संयुक्त स्वर उत्पन्न होतात. स्वरांमध्यें ज्याप्रमाणें उच्चाराच्या सोपेपणामुळें अ, इ, उ हे स्वर स्वतंत्र कल्पिले गेले व बाकीचे इतर स्वर ह्या तीन मूळच्या स्वरांतच सर्धीनें बनले गेले त्याप्रमाणें व्यंजनांत 'म्' हें स्वर उच्चाराच्या सोपेपणामुळें अगोदरचें समजलें पाहिजे. केवळ दोन्ही ओंठ मिळून नाकातून जोरानें हवेच्या लाटा कंठाच्या मधल्या रस्त्यानें बाहेर सोडल्या म्हणजे 'म्' चा आनुनासिक उच्चार निघतो. तेव्हां हे चार—अ, इ, उ हे तीन स्वर व म् व्यंजन हे पहिले वर्ण आहेत. ह्या अ, उ, म् वर्णांचें मिश्रण ॐ ह्या आर्यलोकांच्या अतिशय पवित्र मानलेल्या वर्णांत आहे. सर्व वेदांतील ऋचांचें, ब्राह्मणात वर्णन केलेल्या यज्ञसंस्थेचें इंगित व पुढील पिढीच्या आर्यसंस्कृतीचें एकीभवन ॐ शब्दांत सांपडतें. ॐ शब्दाला एकंदर हिंदुलोकांच्या शास्त्रांमध्यें इतकें महत्त्व आहे कीं जर ॐ आणि आर्यसंस्कृति एकच आहेत म्हटलें तर वस्तुस्थितीस सोडून होणार नाहीं. उपनिषदांत व त्यावर उभारलेल्या पौराणिक वाङ्मयात ज्या निरनिराळ्या देवता अ, उ, म् ह्यांतील प्रत्येक वर्णाशीं संलग्न केल्या आहेत त्यांच्या मुळाशीं तरी हेंच आहे. तेव्हां धार्मिक समजुतीनें जरी पाहिलें तरी ॐ हा शब्द लोकांनीं प्रथम उपयोगांत आणला असावा व सर्व पावित्र्यद्योतक अर्थ त्यात घातला असावा. असो. ॐ शब्दाचा आपल्या प्रस्तुत मुद्याशीं संबंध इतकाच असल्यामुळें झालें इतकें पुरें.

कोणताही उच्चार करण्याची मनुष्यास इच्छा झाली पाहिजे आणि इच्छा फळास आणण्याकरतां प्रयत्न केले पाहिजेत. प्रयत्न करतांना 'काकलक' मण्यापासून ओंठापर्यंतचे अवयव उपयोगी पडतीलच, इच्छा किंवा विचार होणार ते हृदयांत होणार किंवा डोक्यांत होणार, परंतु

शब्दाच्या अभावीं अव्यक्त स्थितींत राहणार व 'काकल्क' मध्याच्या पलीकडच्या टापूत असणार. म्हणून प्रयत्नाच्या व्यक्त व अव्यक्त स्थितींत त्याला दोन प्रकार होतात. कांहीं प्रयत्न आभ्यंतर असतात व कांहीं बाह्य असतात. आभ्यंतर प्रयत्न अव्यक्त स्थितींत व बाह्य प्रयत्न व्यक्त स्थितींत असतात. घांटेस तसा आकार येणारी'व'पोकळी जी वर सांगितली तिच्या टप्यात श्वास आला म्हणजे आभ्यंतर प्रयत्नास बाह्य स्वरूप मिळतें. तोंडाच्या पोकळींत जेव्हा श्वास किंवा हवा रेटली, त्यावेळेस मात्र त्याला पूर्ण बाह्य स्वरूप प्राप्त होतें. आभ्यंतर प्रयत्नात जशी पोकळी कमी जास्त होईल तसे आणखी चार प्रकार होतात. स्पृष्ट, इषत्स्पृष्ट, संवृत, विवृत असे ते चार प्रकार आहेत. ह्याचा अर्थही स्पष्ट आहे. बाह्य प्रयत्नात पोकळी कमी जास्त होण्याचा किंवा दुसऱ्या कशाचीं स्पर्श होण्याचा प्रश्न नसल्यामुळें तोंड कमी किंवा जास्त उघडण्याचीच तेवढी बाब असते. कमी उघडलें तर उच्चाराचा संवार होईल, जास्त उघडलें तर विवार होईल. अशा रीतीनें बाह्य प्रयत्नात दोन प्रकार संवृत व विवृत म्हणून होऊ शकतात. पुढें व्याकरणात ऱ्हस्व, दीर्घ, व प्लुत हे जे प्रकार मानले गेले ते संवृत, विवृतास दुसरीं नांवें आहेत.

संस्कृतमध्येंच अ, इ, उ हे आद्यस्वर सांपडतात असें नाहीं. जगांतील कोणतीही भाषा घेतली तरी तिच्यांतील मूळचे स्वर हेच तीन सांपडतील. बाकीचे स्वर संयुक्त आहेत. संयुक्त व्यंजनात ज्याप्रमाणें एकापेक्षा अधिक व्यंजनें भाग घेतात तसे संयुक्त स्वरांतही एकापेक्षा अधिक स्वर भाग घेतात. कांहींत संधि होतात, कांहींत फक्त दीर्घीभवन होतें. चौदा स्वरांपैकीं हे तीनच मूळ ठरतात आ, ई, ऊ हे त्या त्या स्वराचे दीर्घ उच्चार किंवा सजातीय स्वराचे संधि होत. ए, ऐ, ओ, औ, हे विजातीय स्वराचे संधि आहेत. 'ऋ ऌ ना स्वर म्हणावें किंवा नाहीं त्याबद्दल वादच आहे, कारण त्यात र् आणि ल् व्यंजनोच्चार येतो. शुद्ध स्वराच्या नंतर व्यंजनमिश्र स्वराची उत्पत्ति झाली असावी अर् किंवा अल् ह्यामधील सवा लोप करून जो ऱ्हस्व उच्चार राहतो त्यालाच हीं दोन ऋ ऌ म्हणून नांवें आहेत. जेव्हा स्वरात अ, इ, उ, नंतर त्याच्या संधीनें झालेले आ, ई, ऊ, ए, ऐ, ओ, औ व नंतर ऋ ऌ असा उत्पत्तिक्रम लागतो.

'इ'च्या उच्चारापेक्षा 'अ'चा उच्चार ज्यास्त दीर्घ होतो, म्हणून तो 'अ' ही संयुक्त स्वर असावा अशी शंका काहीं विद्वानांना आली व त्यांनीं त्या 'अ' चें पुन्हा पृथक्करण करण्यास सुरुवात केली. हे सर्व स्वर झाल्यानंतर अं आणि अः हे दोन राहतात, एकास अनुस्वार आणि दुसऱ्यास विसर्ग अशी संज्ञा आहे. खरें पाहिलें असता दोन्हींमध्यें प्रथम जो 'अ' दिसतो तो उच्चारसौकर्यास साधन म्हणून घेतला आहे. त्याचें खरें प्रतीक –, ।. असेंच होईल. अनुस्वार म्हणजे प्रतिध्वनि किंवा पश्चाद्ध्वनि. ह्याचा उच्चार पूर्णत्वानें नासिक आहे तो एक ध्वनि आहे. प्रतिध्वनि नाहीं. ध्वनि मात्र सापेक्ष आहे. पुढें येणाऱ्या व्यंजनाप्रमाणें तो नासिक ध्वनि बदलतो. तो म् चा किंवा न् चा उच्चार आहे म्हणून म्हणतात इतकेंच. त्याचा असकाच एक ठरीव ध्वनि नाहीं. विसर्ग म्हणजे त्याग किंवा सोडणें. हा ध्वनी स् चा किंवा र् चा फरक आहे असें व्याकरण सांगतें. विसर्ग म्हणजे श्वासाचा प्रकार आहे ह्याचा उच्चार 'ह' करावयाचा असतो प्रत्येक स्थानाच्या ताब्यात दिलेल्या व्यंजनाच्या वर्गांत ख् घ्, छ् झ् ठ्, ढ्, थ् ध् फ्, भ् सारखीं महाप्राणोच्चारमिश्र व्यंजन आहेत. ह्यामध्यें श्वासाचें–विसर्गाचेंच प्राधान्य दिसून येतें. तेव्हां हे दोन्ही अनुस्वार आणि विसर्ग व्यंजनाच्या प्राग्भावस्थितींत उत्पन्न होणें काहीं शक्य दिसत नाहीं. व्यंजनाच्या उत्पत्तीनंतर त्याची वर्णी लागली असावी आणि नंतरच व्याकरणकारांनीं व्यंजनाच्या पंक्तीस ते बसू शकत नाहींत म्हणून स्वराच्या मालिकेंत ओवून त्याची संभावना केली असावीसें दिसतें.

स्वराची अशा रीतीनें उत्पत्ति झाली स्वरानंतर अतिशय अडथळ्याची जरूरी लागणाऱ्या व्यंजनाची परंपरा सुरू झाली. व्यंजनें उत्पन्न करणें म्हणजे स्वर उच्चारण्यांत जो एक मोकळा एकतानी स्वर बाहेर येतो त्याला निरनिराळ्या द्वारांनीं बाहेर सोडणें. द्वारें काहीं तशीं म्हणण्यासारखीं नाहींत हें खरें, परंतु बाहेर येताना ज्याप्रमाणें रस्त्याच्या किंवा गाडीच्या अडव णुकीसाठीं किंवा भिन्न दिशा देण्यासाठीं चाकावर ताफे टाकतात, तद्वत् त्याच्या मार्गांत ताफे किंवा अडथळे टाकावयाचे स्वर कधीं कंठांतून येट बाहेर जातो, तर कधीं ओठापर्यंत येऊन थांबतो व नंतर बाहेर पडतो. कधीं जिव्हा त्याला अडवते आणि तो टाळूच्या वरच्या भागास स्पर्श करून बाहेर पडतो, तर

कधीं त्याला नाकांतून वाट फोडावी लागते, कधीं दांतांशीं त्याला आपला संबंध आणावा लागतो; ह्या निरनिराळ्या परिस्थितींत बाहेर पडल्यामुळें व त्याचे परिणामही निराळे असतीं परस्पर भिन्न झाल्यामुळें त्यांनां नांवेंही निराळीं द्यावीं लागलीं. व्यंजनांच्या उत्पत्तीची वाट अशा तऱ्हेनें लागते. व्यंजनांमध्येंसुद्धां कांहीं पूर्ण व्यंजनें आहेत, व कांहीं अपूर्ण आहेत. कांहीं व्यंजनांत स्वराचा थोडासा वास आल्यासारखा होतो. त्यांना आपण अर्धस्वर किंवा अर्धव्यंजनें म्हणूं. कांहीं व्यंजनामध्यें 'स्' च्या उच्चाराचें प्राबल्य असतें. तेव्हां त्यांचाही एक निराळा वर्ग धरेल. कंठ्य, तालव्य, दंत्य, मूर्धन्य, ओष्ठ्य इत्यादि त्यांचे वर्ग आहेत, य, व, अर्धस्वर समजतात, ह श, ष, स, त्स् इत्यादि 'स' ध्वनिप्रधान व्यंजनें आहेत.

व्यंजनामध्येंही कंठ्य व्यंजनें अगोदर उत्पन्न झालीं असावींत. नंतर ओष्ठ्य नंतर दंत्य, नंतर मूर्धन्य व पुढें ह, य, स उच्चार असा क्रम व्यंजनोत्पत्तीचा असावा. 'क' वर्गांतील व्यंजनापासूनच 'च' वर्गांतील व्यंजनें निघालीं आहेत. संस्कृतमध्यें व्यंजनाचा 'अभ्यास' होणें म्हणून जो प्रकार आहे त्यांत 'क' वर्गाचा अभ्यास 'च' वर्गानेंच होतो. ह्यावरून क-वर्ग च-वर्गाच्या मुळाशीं असावा. त्याचप्रमाणें दंत्य व्यंजनांपासून मूर्धन्य व्यंजनें निघालीं असलीं पाहिजेत. त, थ, द, ध, न व्यंजनें जरा जोरांत उच्चारलीं म्हणजे ट, ठ, ड, ढ, ण वर्ण उत्पन्न होतात. 'ष्' च्या जोडींत 'त्' चा 'ट्' करावा किंवा 'ऱ्'च्या जोडींत 'न्'चा 'ण्' करावा इत्यादि मान्यता पुढें व्याकरणकारांनासुद्धा द्यावी लागली. ह्या फेरबदलाविषयीं पुढें भाषाशास्त्रवेत्त्यांनींही, अधारण घालून मान्यता दर्शविली. सर्व व्यंजनवर्गांकडे जर नजर फेंकली तर असें दिसतें कीं, व्यजनें बनवितांना सुद्धां त्यांना उच्चारास साधन म्हणूनच केवळ नव्हे तर त्यांचें खुद्द अंग तयार करण्यासही स्वरांची मदत घेतली असावी. संस्कृतांत "संप्रसारण" म्हणून जो 'य्,व्,र्,ल्,' चा 'इ, उ, ऋ, लृ' करण्याचा प्रकार आहे त्यावरून हें उघड दिसतें. व्यंजनांतच अर्धस्वर किंवा अर्धव्यंजनें आणि पूर्ण व्यंजनें असे दोन प्रकार त्यामुळेंच पडले असावेत. इंग्लिशमध्यें V व्ही आणि W डब्ल्युच्या उच्चाराची व त्याना स्वर म्हणावें कीं व्यंजनें म्हणावीं ही अडचण त्यामुळेंच उद्भवली आहे. स्वर, नंतर अर्धस्वर, नंतर, ह स श

सारखीं श्वासयुक्त व्यजनें नतर ल् म् न् र् सारखीं कोमल व्यजनें, नतर थ् द् सारखीं थोडीशीं कठोर व्यजनें व शेवटीं क् ख् ग् घ् ङ् असलीं सुतराकठीण व्यजनें उत्पन्न झालीं असावीत, अशी ही एक दुसरी विचार-सरणी वर्णांच्या उत्पत्तीच्या बाबतींत लावता येईल.

ह्याचा विचार पुढे योगशास्त्रातील षट्चक्राच्या साहाय्यानें येणार आहे. येथें आपण घशाच्या स्नायूंतील स्वर किंवा व्यजनें उच्चारण्याच्या कामीं जे स्नायू उपयोगीं पडताना दिसतात त्याच्या दृष्टीनें विचार केला आहे. योगशास्त्र स्वर आणि व्यजन ह्याच्या उच्चाराचा भाग घशाच्या स्नायूपलीकडे अदृश्य कोटींत जाऊन लावत, एवढा फरक मानावा लागेल हें अगोदर सागून ठेवलें पाहिजे, नाहीं तर एकमेकाचा विरोध येण्याचा संभव आहे.

आतापर्यंत आपण स्वर आणि व्यजने ह्याच्या उत्पत्तीपर्यंत आलों. नुसत्या एकट्या स्वरानें किंवा एकट्या व्यजनानें मनुष्याच्या अंत:-करणातील भाव काहीं दुसऱ्यास प्रगट करता येणार नाहीं. तेव्हा भाषेच्या मुख्य उपयोगाच्या दृष्टीनें केवळ स्वराची आणि केवळ व्यजनाची उत्पत्ति निरर्थक ठरते. त्यामध्ये भाषा नाहीं, भाषेच्या प्रथम स्थितींत नुसत्या स्वराना काहीं तरी ' बोलावण, धाक दाखवणें ' वगैरे अर्थ असू शकतील. परंतु सध्याच्या परिस्थितींत कोणत्याही भाषेत नुसत्या स्वराला किंवा व्यजनाला काहीं अर्थ नाहीं. त्याचें एकीकरण, एकीभवन वगैरे झालें पाहिजे. आतापर्यंत अर्थाकडे दृष्टि ठेवून ते कसे उत्पन्न होतात हे आपण पाहिलें नाहीं. तर घशातील कोणत्या स्नायूच्या विशेषानें स्वर, व्यजनें उत्पन्न होतात हें पाहिलें. म्हणजे शारीरशास्त्रातील दृष्टीनें त्याकडे आपण पाहिलें आहे. भाषाशास्त्र आणि इन्द्रियविज्ञानशास्त्र याचा सबंध फार निकटचा आहे. भाषाशास्त्राची पहिली स्थिति इन्द्रियविज्ञानशास्त्रांत सापडते. इंद्रिय-विज्ञान शास्त्रानें जर मदत करण्याचें बंद केलें तर भाषा शास्त्राची प्रगति थाबलीच म्हणून समजावें. आवाज अथवा स्वर उत्पन्न होणार कोठून ! त्याशीं निरनिराळीं व्यजनें बनणार कशीं व त्याच्याशिवाय भाषा तरी तयार होणार कशी ! इंद्रियविज्ञान शास्त्रानेंच स्वर व व्यजनें ह्याचे निरनिराळे आवाज काढतां येतात. त्याना एक करणें हें मनुष्याच्या बुद्धीवर अवलंबून

राहील. आवाज तर बाहेर निघाला. त्या आवाजाचाच पुढें शब्द तयार होतो. शब्दाचें सामर्थ्य फार अचाट आहे. इतकें कीं, त्याच्या सामर्थ्याचा विस्तार आकाशाच्या विस्ताराबरोबर आपल्या इकडील शास्त्रकारांनीं लावला आहे. पंचमहाभूतांचे सर्वांचे कांहीं कांहीं विशिष्ट गुण आहेत. पृथ्वीचा गुण गंधत्व आहे. त्याप्रमाणें आकाश तत्त्वाचा गुण एक आणि तो शब्द. बरें, आकाशाची व्याप्ति कोठपर्यंत ? लौकिक दृष्ट्या आपल्या डोक्यावर जी एक कल्पनातीत पोकळी आहे व जिच्यामध्यें ईश्वराच्या निर्माण शक्तीचें कौशल्य दृग्गोचर होतें, त्या पोकळीस आकाश म्हणतात. हा लौकिक अर्थ तर आहेच. परंतु ह्याच्यापेक्षां ज्यास्त म्हणजे जेथें जेथें पोकळी आहे तेथें तेथें आकाशाची कल्पना आहे. पर्वताच्या दरींमध्यें, आपण मूठ झांकली तर मुठीच्या आंत, आकाश आहे. आपण तांब्यावर झाकण ठेवलें तर त्याच्या आंत आकाश आहे. येवढेंच नव्हे तर आपल्या कानास भोक आहे, त्यांत हवा आहे; तर तेथेंही आकाश आहे. त्या विशाल-रूपी वरच्या आकाशापासून तों श्रोत्रविवरांतील चिमुकल्या आकाशापर्यंत—ह्या सर्व आकाशाचा गुण शब्द. श्वासनलिकेमधून जो आवाज बाहेर पडतो म्हणून सांगितलें तो ह्याचमुळें. त्या नलिकेंतसुद्धां आकाश आहेच. आकाश आणि शब्द ह्याची व्याप्ति इतकी आहे. शब्द उच्चारला जाण्यास आकाशाची अतिशय जरूरी लागते. आकाशाविनाय शब्द उत्पन्न होणार नाहीं. निर्वात अशा स्थितींत कसलाही आवाज उत्पन्न होऊं शकत नाहीं. भौतिक शास्त्राचा हा एक सिद्धांत आहे. घटाकृति भांडें घेऊन त्यांतील हवा जर काढून घेतली तर आंत आवाज उत्पन्न होऊ शकत नाहीं. कांहीं लोक म्हणतील कीं, आंत शब्द उत्पन्न होतो, परंतु त्याला वाहक हवा नसल्यामुळें आपणास तो ऐकू येत नाहीं. दोन्हींचा अर्थ एकच. भौतिक शास्त्राचा हा सिद्धांत आपल्या नैयायिकांनीं व मीमांसकांनीं फार पूर्वींच उपकरणें वगैरे साधनें नसतानाच हुडकून काढला होता. ह्याबद्दल त्यांची तारीफ करणें जरूर आहे.

शब्द किंवा ध्वनि उत्पन्न झाला. तो आकाशाचा धर्म आहे. परंतु शब्द जो ऐकावयास येतो, तेव्हां काय क्रिया होते ? उत्पन्न होण्याची क्रिया एक आहे व ऐकण्याची क्रिया अगदीं निराळी आहे. ऐकतांना क्रिया

काय होत असते आवाज ऐकला जातो त्या वेळेस क्रिया होते ती अशी. पाण्याच्या ज्याप्रमाणें वाऱ्यानें लाटा उत्पन्न होतात त्याप्रमाणें हवेमध्येंही लाटा उत्पन्न होत असतात. नाद उत्पन्न झाल्याबरोबर ता हवेतील एका कोणत्या तरी जवळ असेल त्या लाटेवर आदळतो नतर तीं लाट दुसरीवर आदळून दुसरी तिसरीवर अशा रीतीनें त्या परपरेनें आवाज दूरवर पोहोंचविला जातो पदार्थविज्ञानशास्त्राच्या सिद्धातानें हेंच सिद्ध केलें आहे. नाद उर्मी उत्पन्न होतात व त्याच आवाज दूरवर नेण्याच्या कामीं मदत करतात. आपल्या इकडील नैयायिकानीं आणखी एक मत प्रस्थापित केलें आहे स्वर उत्पन्न झाल्याबरोबर हवेंतील कणावर आदळतो. तो कण दुसऱ्यावर, दुसरा तिसऱ्यावर अशा रीतीनें स्वर लाब पल्ल्यावर जातो. कोणतेंही मत स्वीकारा, आवाज दूर नेला जातो हें खास मग तो लाटाच्या साहाय्यानें असो किंवा हवेंतील अतिसूक्ष्म अणुरेणूच्या साहाय्यानें असो दोन्ही मतात फारसें अतर नाहीं. नाद उत्पन्न झाला, तो ऐकला गेला. परतु जोंवर तो एकतानी—एक स्वरी—आहे तोंपर्यंत त्याचें काहीं वाटणार नाहीं परतु जेव्हा त्यामध्यें नानाप्रकार उत्पन्न होतील तेव्हा मात्र त्याकडे लक्ष देणें जरुरीचें होईल व त्याचा विस्तार इतका होईल कीं, त्या सर्व सिद्धातांचें व मताचें मिळून एक निराळेंच नादशास्त्र अथवा स्वरशास्त्रच बनेल नादाच्या विविध प्रकाराकडे व रियत्यतरा कडे मीमासकानीं चागलें लक्ष दिलें होतें मीमासकाची प्रवृत्ति केवळ श्याकरता होती. वैदिक वाङ्मय झालें तोंडातोंडीं बापापासून मुलाकडे किंवा गुरूपासून शिष्याकडे त्याची विल्हेवाट होऊ लागली अर्थाकडे विशेष नजर कोणी देईनासें झालें केवळ पोपटपची रीतीनें सहिता पाठ म्हणता आली, काम झालें. ह्या प्रवृत्तीमुळें त्यायद्दलचा आदर कमी होईल ह्या भीतीनें वेदाचें अर्थगाभीर्य विशद करण्याकडे व त्याबरोबरच त्याचें महत्व वाढविण्याकडे मीमासकानीं आपली बुद्धि लावली. मीमासकानीं यज्ञयाग तर केलेच परतु वाक्यमीमासा व शब्दमीमासाही पण केली, आणि ती इतक्या आस्थेनें केली कीं, जगात शब्दाशिवाय ते दुसरें काहीं तत्त्व मानीनासें झाले. शब्द हें त्याचें तत्त्व, शब्द हें त्याचें सार, शब्द हेंच निर्वाण. शब्द म्हणजे ब्रह्म आणि ब्रह्म म्हणजे शब्द.

सर्व विश्वाचा लय शब्दात व त्याची उत्पत्तीही शब्दापासून. दुसरा ईश्वर नाहीं. मीमांसकाचें थोडक्यात म्हणणें असें आहे.—ध्वनि पुष्कळ आहेत. हरतऱ्हेचे आहेत. पुष्कळ असल्यामुळें ते अनित्य आहेत. घोडा शब्द घेतला. तो मी एका तऱ्हेनें उच्चारणार. दुसरा दुसऱ्या तऱ्हेनें उच्चारणार. प्रत्येक मनुष्याचा उच्चार करण्याचा प्रकार निराळा असणार. बारीक आवाजाप्रमाणें बारीक स्वर निघेल किंवा घोगऱ्या आवाजाप्रमाणें घोगरा स्वर बाहेर पडेल. ज्याप्रमाणें प्रत्येकाचा तोंडावळा सारखा नसतो, एकाचें चालणें दुसऱ्याच्या चालण्याप्रमाणें नसतें तसा एकाचा आवाज दुसऱ्या सारखा नसावयाचा. एकच घोडा शब्द, निरनिराळ्या हजारो रीतीनें उच्चारला जातो. तेव्हा हे सर्व ध्वनि निराळे. परंतु हे लाखो निराळे "घोडा" शब्द एका कोणत्यातरी शब्दाची प्रतिकृति आहेत. माणसाचें चेहरे निरनिराळे असले तरी मनुष्य ह्या वर्गांत सर्व येतातच. तद्वत हे सर्व शब्द त्या शब्दाच्या प्रतिकृति आहेत, असा एक शब्द असला पाहिजे. घोडावाचक एक शब्द असेल, घटवाचक दुसरा शब्द असेल, पटवाचक तिसरा शब्द असेल. असले सर्व शब्द स्फोट स्वरूपी असतात, सर्व शब्द जरी झाले तरी एक स्वरूपी, निर्विकारी स्फोटाचीं निरनिराळीं रूपें आहेत, ब्रह्म जसा निर्विकार आहे पण त्या ब्रह्माच्या पसाऱ्यात आपण त्याचे निरनिराळे आकार व विकार पाहतों हे विकार जसे ब्रह्माच्या दृष्टीनें अनित्य तसे निरनिराळे शब्दाचे प्रकार स्फोटाच्या दृष्टीनें अनित्य होत. स्फोटच तेवढा कायम व नित्य. सर्व अनित्य शब्दाची एक 'सामान्य' जात मानली आहे. एका कोणत्या तरी 'नादा' पासून त्याची प्रवृत्ति असली पाहिजे. ती 'सामान्य' जात म्हणजे नाद. त्यालाच मीमांसक ब्रह्म म्हणतात. प्लेटोनें जी एक सामान्य 'जाती' मानली आहे त्या सिद्धांतातील मासली ह्या सारखीच आहे. समवाय संबंध जो मानतात तो ह्या सारखाच आहे.

मनुष्याच्या शरीराच्या आत कोणीतरी कर्ता करविता आहे अशी वेदांत्याची समजूत आहे. त्याला चिच्छक्ति म्हणा, आत्मा म्हणा किंवा पाश्चात्य लोकांच्या एखाद्या पारिभाषिक शब्दानें त्याला संबोधा,—त्याच्या इच्छानुरोधानें इंद्रियें आपापलीं कामें योग्य तऱ्हेनें बजावतात. हृदयातील

वायु त्याच्या इच्छेनें हालतो आणि ध्वनि उत्पन्न होण्यास सुरवात होते. ध्वनि आकाशाचा गुण आहे व आंत हृदयरूपी आकाशच आहे. ध्वनीचा आरंभ होण्याची ही जी अवस्था हिलाच 'परा' वाणी म्हणतात. हृदयाकाशांतून वायु निघून बाहेर वाट काढू पहातो व एका स्थानापासून दुसऱ्या स्थानाकडे जातो; ह्या स्थितीला 'पश्यन्ती' वाणी म्हणतात. वायु बाहेर येण्याची सारखी खटपट करीत असतो व मुखांत शिरून व्यक्त अवस्थेंत येण्याच्या बेतात असतो; ह्या दोन्ही अवस्थास अनुक्रमें 'मध्यमा व वैखरी' अशीं नांवें आहेत. ह्या 'वैखरी' वाणीस बाकीच्यांचा उपसर्ग पोहोंचतो. एकजिनसी जो स्वर वर सांगितला त्यालाच 'वैखरी' म्हणता येईल. पुढें कंठ, तालु, मूर्धन्, दंत, ओष्ठ ह्यांपैकीं कोणत्यानाकोणत्याहीं तिचा संबंध आल्यामुळें त्यामध्यें बहुजिनसीपणा उत्पन्न होतो. व निरनिराळे वर्ण उत्पन्न होतात. उदाहरणाच जसा वेळ लागेल तसे त्यांत ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत, उदात्त, तीव्र, मृदु वगैरे फरक होतात. 'मूळ ध्वनीस ह्या निरनिराळ्या उपाधि आहेत. मुखविवरांत आल्यानंतर ह्या उपाधिंपैकीं एकादी उपाधि आपल्या ताब्यांत त्याला घेऊन, आपला रंग, स्वभाव त्या मूळ निर्विकार ध्वनीला अर्पण करते. शब्द जे तयार झाले ते ध्वनीच्या बहुविधत्वानें झाले आहेत हें उघड आहे. पहिल्या तीन अवस्था म्हणजे भाषेचीं सूक्ष्म रूपें होत आणि शेवटची भाषेचें स्थूल रूप होय. पहिल्या तिन्हींचा भाग साधारणपणें अतींद्रिय गोष्टी ज्यांला समजतात अशा योग्यांशिवाय कोणास लागत नाहीं. चवथी व्यक्त असल्यामुळें कोणत्याही मनुष्याच्या आवाक्यांत असते. भाषेच्या व्यक्त एक आणि अव्यक्त तीन अवस्थांबद्दलची समजूत वेदांतील एका ऋचेच्या मुळाशीं असावीसें दिसतें; त्या ऋचेचा अर्थ प्रत्येक मतवाल्या लोकांनीं आपापल्या मताप्रमाणें केला आहे. ऋचा पहिल्या मण्डलांतील आहे.

" चत्वारि वाक् परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः ।
गुहा त्रीणि निहितानेंगयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥ "

ह्यांतील चार वाणी म्हणजे ॐ, भूः, भुवः, स्वः समजाव्या असें कांहीं म्हणतात. नाम, क्रियापद, उपसर्ग, निपात म्हणून कोणी म्हणतात. ऋक्, यजुः, साम व लौकिक; किंवा मंत्र, कल्प, ब्राह्मण व भाषा; किंवा सर्प,

पक्षी, जीव आणि मनुष्य इत्यादिकांच्या भाषा होत; यशीं पुष्कळ मतें आहेत. भाषाशास्त्राच्या मतानें परा, पश्यन्ती, मध्यमा आणि वैखरी ह्या त्या चार भाषा समजण्यास कांहीं हरकत नाहीं.

चार प्रकारच्या वाणींच्या विचारांत मजल हृदयाकाशापर्यंतच गेली; पण कांहीं योगी हृदयाकाशाच्या पोकळीच्या पलीकडे जातात; आणि वायु हृदयाकाशाच्या पोकळींत येईपर्यंत कोणकोणत्या नाडींतून व चक्रांतून जातो ह्याचा विचार त्यांनीं केला आहे. ह्याला षट्चक्रभेदन म्हणतात. वायूचा रस्ता पहिल्या रक्तवर्ण ' मूलाधार ' चक्रापासून तों थेट मुखाच्या बाहेर येईपर्यंत किंवा मुखाच्या बाहेर न आणतां मस्तकांतील सहस्रदळचक्रापर्यंतचा रस्ता शोधलेला आहे.

*मनुष्याच्या शरीरांत एकंदर सहा चक्रें कल्पिलीं आहेत. त्यांचीं नांवें मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहतविशुद्ध, अग्नि आणि सहस्रदळ अशीं आहेत. प्रत्येक चक्राचा रंग निराळा आहे आणि त्याची अधिष्ठात्री देवताही पण निराळी आहे. सर्वांच्या वर मस्तकांत सहस्रदल आहे. त्यामध्यें ॐ शब्दाची उत्पत्ति मानली आहे. त्याच्या खालीं डोळ्याजवळ अग्निचक्र म्हणून एक विद्युद्वर्ण चक्र मानलें आहे व त्यांत ' ळ ', ' क्ष ' हे वर्ण उत्पन्न होतात. हें चक्र पूर्ण मानलें नाहीं. कंठाजवळ धूम्र रंगाचें विशुद्ध नांवाचें चक्र आहे. त्यामध्ये सर्व स्वरांची उत्पत्ति होते. त्याच्या-खालीं हृदयाजवळ पिंगट रंगाचें अनाहत नांवाचें चक्र आहे, त्यांत क पासून कवर्ग, चवर्ग, आणि ट्, ठ् इतके वर्ण उत्पन्न होतात. खालच्या नीलवर्णाच्या मणिपूर चक्रांत ड्, ढ्, ण्, तवर्ग आणि पवर्गांतील प्, फ्, इतके वर्ण उत्पन्न होतात. त्याच्या जवळच्या पीत रंगाच्या स्वाधिष्ठान चक्रांत ब्, भ्, म्, य्, र्, ल्, उत्पन्न होतात. सर्वांत खालच्या रक्तवर्ण मूलाधार चक्रांत व, श, ष, स् इतके वर्ण उत्पन्न होतात.*

भाषाशास्त्राच्या दृष्टीनें उच्चाराचा इतका खोल विचार करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. स्वर अव्यक्त स्थितींत असतांना भाषाशास्त्राचा विषय होऊं शकत नाहीं. व्यक्त झाल्यावरच भाषाशास्त्राच्या कक्षेंत येऊं शकतो. आंतील विचार, विकार व भावना स्वराच्या साहाय्यानें बाहेर आल्या म्हणजेच भाषाशास्त्राला विषय प्राप्त होतो. स्वर म्हणजे केवळ साधन आहे

'मानस' सरोवराच्या लहरी स्वरसमुदायांच्या रूपानें मुखाच्या बाहेर येतात. हे स्वरसमूह म्हणजे शब्द, तेव्हां शब्द हे विचार, विकार, भावना, वासना वगैरेंचीं प्रतीकें होत. व भाषाशास्त्राचा हाच विषय आहे. जरूरीपुरतांच योगशास्त्रांतील एका सिद्धांताचा संबंध आणला आहे. व त्याच दृष्टीनें षट्चक्रांचा उल्लेख व विवेचन पाहिलें पाहिजे. परा, पश्यन्ती आणि मध्यमा ह्यांचें भाषाशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्व नाहीं, योगशास्त्रांत किंवा मानसशास्त्रांत असेल. 'काकलक' मण्यापासून पुढें स्वराची उपपत्ति पाश्चात्य लोकांना लावतां आली, त्याच्या पलीकडे अव्यक्त प्रदेशांतही त्याची उपपत्ति लावणें ह्याला कुशाग्रबुद्धीच लागते. आपण वर्णोच्चार करतों, तो इतक्या सावधपणानें किंबहुना निष्काळजी-पणानें करतों कीं, खरी क्रिया काय होते ह्याच्याकडे आपलें कोणाचें लक्षच नसतें. कंठाच्या वर तरी काय होतें, जीभ कोठें स्पर्श करते, ओठ मिटतात कीं नाहीं ह्याचा विचार करतो कोण व विचार करण्यास शब्द उच्चारतांना अवसर असतो कोठें ? तेव्हां अगम्य स्थानांतील शोध लावण्यांत योगशास्त्रकारांनीं बुद्धि दाखविली खरी.

खरें पाहिलें असतां कंठाच्याखालीं अमके वर्ण उत्पन्न होतात, ह्या म्हणण्याला कांहीं अर्थच नाहीं. खालीं केवळ हवाच असते. सर्व शरीरांत जो खेळतो तो प्राणच असेल. नाद उत्पन्न करण्याचें सामर्थ्य कांहीं त्याच्यांत नसलें पाहिजे, व सामर्थ्य जर नाहीं तर त्याचा विना-कारण निर्देश करण्यांत तरी काय हशील ? नाभीजवळ असलेल्या चक्रापासून अमका वर्ण उत्पन्न होतो हें कसें सांगावयाचें व सांगितलें तर ऐकणाराचा त्यावर विश्वास बसावा कसा ? कोणताही वर्ण उच्चार-तांना नाभीजवळचा शरीराचा भाग हलत असतो, तसेंच इतर चक्रां-संबंधीं समजावयाचें कीं काय ? शिवाय दुसरी अडचण येते ती ही कीं, माणसास जशीं सहा चक्रें शरीरांत आहेत तशीं इतर प्राण्यांस आहेत कीं, नाहींत ? असलीं तर त्यांच्यांत तसे वर्ण होत असले पाहिजेत. वर्ण उत्पन्न झाले तर त्यांची प्रतीति कां होत नाहीं ?

अशा रीतीनें वर्णाच्या उच्चारापर्यंत आपण येऊन पोहोंचलों. आतां येथें हा प्रश्न उद्भवतो कीं जितक्या तऱ्हेचे उच्चार करण्याचें सामर्थ्य

ईश्वरानें मनुष्य प्राण्यास दिले आहे तितके वर्ण भाषेंत असले पाहिजेत किंवा काय ? भाषेभाषेंत वर्णमाला ही सारखी नसते त्याचें कारण काय? साधारण असें धरून चालावयास हरकत नाहीं कीं जो म्हणून उच्चार आहे त्याचा द्योतक असा एकदा वर्ण पाहिजे अमुक एक उच्चार दाखविण्यास वर्णांचा संकर करण्याची जरूरी लागू नये. द्चा उच्चार मृदुदंत्य आहे, ड्चा उच्चार मृदुमूर्धन्य आहे त्याचप्रमाणें 'न्' व 'ण्' हा आहे उच्चार निरनिराळे दाखविण्यास दोन निरनिराळ्या जोड्या पाहिजेत. इंग्रजी भाषेंत पहिले दोन्ही उच्चार d नें दाखविले जातात व दुसरे दोन्ही n नें दाखविले जातात. एकाच वर्णानें दोन्ही उच्चार दाखविल्यामुळें घोटाळा उडण्याचा संभव असतो व घोटाळा हा भाषेचा पहिला जो गुण सुलभपणा, त्याच्याशीं विरुद्ध पडतो. भाषा दुसऱ्यास सुलभ रीतीनें समजली पाहिजे. आणि असे जर वर्णसंकर झाले तर समजण्यास थोडा विलंब लागेल. ह्या दृष्टीनें वर्णसंकर करावा लागणें हें भाषेच्या उणेपणाचें चिन्ह आहे. वर्ण कमी असणें हा जसा दुर्गुण तसा वर्ण जास्त असणें हाही पण दुर्गुणच ठरतो. असें सांगतात कीं काहीं भाषांत २०० वर्ण आहेत. इतके वर्ण उच्चारण्याची पात्रता मनुष्यांत असणार कोठून व पात्रता असली तर त्या सर्वांची जरूरी लागणार केव्हां ? भाषेंत असणाऱ्या वर्णमालिकेंतील संख्येवरून साधारणतः भाषा पूर्ण आहे कीं नाहीं हें आजमावण्यास काहीं हरकत नाहीं. भाषेंत उच्चारांची विविधता दाखविण्यास वर्णसामुग्री भरपूर असणें हें ठीक आहे. वर्णांच्या बाबतींत अग्रत्वाचा मान संस्कृतकडे येतो. संस्कृतमध्यें एकंदर वर्ण ६२ किंवा ६३ आहेत. जितके उच्चार तितकीं प्रतीकें लिपींत असलीं पाहिजेत. असा कोणताही उच्चार नाहीं कीं तो कोणत्याना कोणत्यातरी खुणेनें दाखविला जात नाहीं. ह्यानेंच संस्कृत भाषेस चांगली समृद्धि आली आहे संस्कृतपासून निघालेल्या किंवा तिच्याशीं अती सलग्न असलेल्या व सध्या हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रांतांत चालू असलेल्या बोलींनीं तोच कित्ता गिरविला आहे. व संस्कृतचा अग्रत्वाचा मान हक्कानें आपल्याकडे चालू ठेवला आहे. काहीं काहीं वावदूकांना संस्कृत भाषेंतील ऐश्वर्यामुळें उत्पन्न झालेलें सौंदर्यतेज सहन न होऊन ते संस्कृत भाषेंत एक उणेपणा दाखविण्याचा प्रयत्न करतात, आणि म्हणतात " काहीं वर्णांची विना-

कारण पुनरावृत्ति झालेली आहे. उच्चार इतके नसून भाषा वापरणाऱ्याच्या डोक्यावर ६२ वर्णांचें ओझें लादलें आहे. स्वर ऱ्हस्व घेऊन पुन्हा दीर्घ घेण्यात हशील काय ? 'अ' घेतला तर पुन्हा 'आ' घेण्यानें काय साधलें ? विनाकारण संख्या ज्यास्त करणें हेंच कीं नाहीं ?" ह्याला उत्तर हेंच कीं नुसतें दीर्घ घेण्यात चूकच झाली. दीर्घापेक्षा दीर्घ (प्लुत) एक स्वर घेतला नाहीं हें माग्यच समजावयाचें. प्लुत म्हणून आणखी एक दीर्घ उच्चार आहे. त्याचा शापक वर्णावर वर्ण नाहीं. त्याच काहीं तरी ऽऽऽ असें गमक करावें लागतें. हा उलट संस्कृत भाषेचा उणेपणा आहे. व तो जुन्या पाणिनि वगैरे वैयाकरणाच्या नजरेस आला म्हणून त्याच्यासाठीं निराळीं सूत्रें त्यांना बांधावीं लागलीं.

वर्णांच्या बाबतींत संस्कृत भाषेंत जे दोष सापडत नाहींत ते इतर भाषेंत कितीतरी सापडतात, उदाहरणार्थ आपण इंग्लिश भाषा घेऊं. एकाच 'क' ध्वनीची K, C, Q अशीं तीन प्रतीकें आहेत. ह्यात पुनरुक्तीचा दोष आहे. थ, ध, फ, ग वगैरे वर्णांत अपूर्णता दिसून येते कारण त्याना तयार करण्याच्या वेळीं H ह्या वर्णाचें साहाय्य घ्यावें लागतें. काहींत उच्चाराची व वर्णाची संगतिच नसते. X चा उच्चार 'एक्स' करावयाचा पण त्याचा उपयोग भलत्या वेळेस करावयाचा असतो. कधीं कधीं उच्चाराची भ्रांति होते. E चा उच्चार पुष्कळ तऱ्हेनें होतो. अमुक ठिकाणीं अमका का करावा ह्याबद्दल संशय उत्पन्न होतो. काहीं वर्ण अजिबात उच्चारलेच जात नाहींत. G, L, P ह्यांचा उच्चार कधीं कधीं होत नाहींत (Eight, Calm, Receipt). उच्चाराहून प्रतीकें अगदीं निराळीं असतात. उच्चार एक आणि तद्दर्शक प्रतीकाचें नाव भलतेंच. ग्रीक पहिल्या वर्णाचा उपयोग 'अ' उच्चार करण्याकडे होतो, परंतु त्याचें नाव मात्र 'आल्फा.' त्याचप्रमाणें बीटा वगैरे वर्ण. वर्णास म्हणावयाचें आय् आणि त्याचा उच्चार मात्र ऱ्हस्व 'इ' असा विसंगतपणा सर्व लिपींत आहे. संस्कृतमध्यें व तदुद्भव बोलींमध्यें तो दोष नाहीं. ह्या दोषामुळें वर्णोच्चाराचा दुरुपयोग होतो, व त्याचें निरर्थकत्व ज्यास्त नजरेस येतें. वर्णास 'डब्ल्यु' म्हणावयाचें आणि त्याचा उपयोग 'व' उच्चारण्याकडे करावयाचा. अशा विसंगतेचा दोष बऱ्याच भाषांत दिसून येतो. संस्कृत

व मराठी भाषेची ह्या दोषांपासूनची अलिप्तता ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. जुन्या प्राकृत भाषांनीं तर ह्यांच्यांतही सुधारणा केली आहे. ऋ दोन्ही, ऌ दोन्ही, ऐ, औ, ऌ तालव्य व मूर्धन्य व्यंजनें वगैरे वर्ण प्राकृत भाषांनीं घेतलीं नाहींत. मराठीनें देखील प्राकृताच्या सहवासानें सर्व जरी नाहींत तरी कांहीं वर्ण ऋ, ऌ वगैरे संस्कृत मधून घेतले नाहींत.

वर्णांच्या संख्येबद्दल विचार करतांना स्वरांबद्दल फारसा वाद रहात नाहीं. वाद असतो तो व्यंजनांबद्दल. सर्वांत कमी व्यंजनें आस्ट्रेलियाच्या कांहीं भाषांत आहेत. त्यांचा व्यवहार आठच व्यंजनांनीं चालतो. कांहीं भाषांत १० आहेत. चिनी भाषेंत १७–१८ आहेत. मल्याळी भाषेंत १४–१५ आहेत. फारशी भाषेंत २४ आहेत. आरबींत २८ आहेत. हिब्रू भाषेंत २२ आहेत. ग्रीक भाषेंत १४ साधीं आणि ३ संयुक्त आहेत. लॅटिन भाषेंत १६ आहेत. व इंग्लिश भाषेंत २० आहेत.

तात्त्विक विचार पाहून थोडासा निराळाच होईल. उच्चाराप्रमाणें वर्ण नसणें किंवा त्यांचीं पृथक् पृथक् प्रतिकें नसणें हा कांहीं भाषेचा दोष म्हणतां येणार नाहीं. ह्याला भाषेचा दोष म्हणण्यापेक्षां लिपीचा दोष म्हणणें ज्यास्त बरोबर होईल. कांहीं थोड्या अंशीं–शब्द घटनेच्या दृष्टीनें भाषेचा दोष होईल; नाहीं असें नाहीं. सोसायटी नांवाच्या बेटांतल्या भाषेंत कंठ्यवर्णच नाहींत. ते 'क्'चा उच्चार 'ट्' करतात. ग्रीक भाषेंत य् व फ् नाहींत. आरबी भाषेंत 'पी' नाहीं, ब्रजी भाषेंत 'फ्' नाहीं, चिनी भाषेंत 'र्' नाहीं. ह्या सर्वांना दोष म्हणतां येईल. परंतु भाषेंत उच्चार असतांना त्याला दाखविण्यासाठीं जर दुसऱ्या वर्णांचें साहाय्य घ्यावें लागलें तर तो भाषेचा उणेपणा होत नसून लिपीचा उणेपणा ठरतो.

---

# प्रकरण ४ थें.

—:*:—

## शब्दसिद्धि.

भाषाशास्त्र आणि इंद्रियविज्ञानशास्त्र ह्यांचा संबंध कसा येतो हें मागें सांगितलें. भाषाशास्त्रांतील आद्य घटक जो स्वर तो व त्याचा कोणताही प्रकार उच्चारतांना कोणत्या इंद्रियाचा कसा फायदा होतो हें आपण पाहिलें. वर्ण कांहीं एकट्याच उच्चारण्याची जरूरी कधीं भासत नाहीं. कांहीं वर्णांचें एकीकरण करून मनांतील भाव शब्दरूपानें दाखवावा लागतो. व हेंच सुभाषेचें मुख्य साध्य होय. अंतःकरणांतील भाव दुसऱ्यास समजावून सांगणें हीच कामगिरी भाषा करीत असते. "आंबा, पिवळा, खाणें" हे शब्द आपण घेऊं. हे शब्द उच्चारतांना आपण मुखांतील वायूच केवळ हालवितों येवढेंच नव्हे तर त्यांच्या उच्चारांपूर्वी आपल्या विचारशक्तीच्या आवारांत मोठी गडबड उडून गेलेली असते. 'आंबा' शब्द उच्चारला खरा पण आंत तो आंबा, त्याचा वाटोळा आकार, त्याची एक विशेष प्रकारची चव, दुसऱ्या एकंदर पदार्थांपासून त्याचें भिन्नत्व, त्याचा हाताला लागणारा मऊपणा, अथवा घणघरेपणा, वगैरे आंब्यासंबंधीं सर्व माहिती आंत मनामध्यें एक क्षणभर येऊन आपली त्याबद्दलची इच्छा अथवा तिटकारा अशा कोणत्या तरी भावनेनें प्रेरित होऊन आपण मुखांतील वायूंचा आधार घेऊन 'आंबा' असा शब्द उच्चारतों. त्याचप्रमाणें 'पिवळा' शब्द उच्चारण्यापूर्वींसुद्धां आंत तशाच प्रकारची क्रिया होत असते. आपण कोठेंतरी तो रंग पाहिलेला असतो. त्या वस्तूपासून तो रंग निराळा करून त्याचें अस्तित्व आपल्या समोर असलेल्या वस्तूवर लादतों व वस्तू आणि गुण ह्यांच्या साहचर्यासह आपण त्याचा निर्देश करतों. क्रियापदाचें असेंच आहे. पदार्थ आणि गुण ह्यांचें साहचर्य जसें आपणास बांधतां येतें तसेंच क्रियाही मूळ पदार्थावर लादतां येते. शब्दोच्चारापूर्वीं विचार–साम्राज्यांत पुष्कळ कल्पना वावरतात. त्यांमध्यें विशेष पद्धत नसते. विचार आले म्हणजे एकदम येतात व क्षणांत नाहींतसेंही होतात. आपणास जे उपयोगी ते पद्धतशीर रीतीनें लाव-

ण्याची क्रियाही आत आपोआप होते." इतकें सर्व जोंपर्यंत होतें तोंपर्यंत आपलें तिकडे लक्षही नसतें. व पुष्कळ वेळा--पुष्कळ वेळा का ? नेहेमीं असें होतें कीं विचारशक्तीच्या राज्यांत होणाऱ्या चलबिचलीची बोलणारास कल्पनाही नसते. त्याला न कळत हा कारभार होत असतो किंवा कारभार इतका त्याच्या सवयीवर पडतो कीं त्यांपैकीं अगोदरचा कोणता व नंतरचा कोणता हें सांगता येत नाहीं. " रामानें तीन पिवळे आंबे खाल्ले " ह्या वाक्यातील प्रत्येक शब्द उच्चारताना वर सांगितलेली क्रिया मनात होत असली पाहिजे परंतु प्रत्येक मनुष्य कांहीं मानसशास्त्र विशारद असणें शक्य नाहीं व झाला तरी प्रत्येक शब्दाच्या व वाक्याच्या बाबतींत इतके खोल दूरवर लक्ष्य पदोपदीं पोहोंचविणें होणार नाहीं, त्यामुळें त्याला ती क्रिया समजून येत नाहीं मानसशास्त्रान्तर्गत क्रिया होते हें मात्र निर्विवाद इंद्रियविज्ञानशास्त्र, मानसशास्त्र, व भाषाशास्त्र यांचा एकमेकांशीं संबंध कसा निकटचा आहे हे ह्यावरून कळून येईल, प्रथम उच्चारला जाणारा शब्द मानसशास्त्राच्या राज्यांत येतो, नंतर इंद्रिय विज्ञानशास्त्रात सांगितलेल्या इंद्रियांकडून त्याला व्यक्त स्वरूप दिलें जातें व व्यक्तस्वरूप मिळाल्यानंतर त्याचें पृथक्करण, एकीकरण, साम्य, विरोध वगैरे भाषाशास्त्रांतील नियमानुसार त्याची जात ठरविली जाते व शेवटीं त्याला इतिहासाचें, वाङ्मयाचें किंवा शास्त्र व कलाशाचें स्वरूप मिळतें.

सर्व शब्द कांहीं सारख्या प्रकारचे नसतात व त्यामुळें प्रत्येक शब्द उच्चारण्यापूर्वी मनात एकच प्रकारची क्रिया होत नसली पाहिजे प्रत्येक शब्दाच्या निरनिराळ्या जातीप्रमाणें मनात क्रियाही भिन्न होत असावी, व पुन्हा शब्द बाहेर पडल्या नंतर सर्व शब्द कोणत्या तरी नियमानुसार जोडणें व त्यापासून तात्पर्य सार बाहेर काढणें ही एक निराळीच क्रिया आहे. त्याचा विचार पुढें येणारच आहे. सध्या आपणास शब्दाच्या जाती कोणत्या आहेत हें ठरवायचें आहे. निरनिराळ्या दृष्टीनें शब्दाचे प्रकार निरनिराळे ठरतील वस्तूचें ज्ञापक ह्या अर्थानें एक प्रकार होईल. व्याकरणाच्या दृष्टीनें निराळेच प्रकार पडतील. प्रथम मानसशास्त्रदृष्ट्या काय प्रकार पडतात ते पाहू. त्या शास्त्राप्रमाणें शब्दाचे दोनच प्रकार आहेत. पहिला प्रत्यक्ष वस्तुनिदर्शक व दुसरा वस्तुसंबंधनिदर्शक, असे

दोन प्रकारचे शब्द आहेत. कोणत्याही वस्तूचें चित्र मन.चक्षूपुढें उभें राहिलें म्हणजे त्याचा द्योतक शब्द पहिल्या प्रकारात येतो. 'पुस्तकें' म्हटलें कीं, त्याच्या प्रतिकृतीची काहीं तरी कल्पना मन.चक्षूपुढें उभी राहते. काहींतरी कल्पना मनात आल्याशिवाय शब्दाची प्रवृत्ति नाहीं. अगोदर मनोभूमि काहीं तरी वस्तूच्या कल्पनेनें तयार करावी लागते, व नंतरच त्याजवर शब्दाचें बीं रुजणें शक्य होतें. शब्दाचा दुसरा प्रकार ह्याहून निराळा आहे. वस्तूची छाया मन.चक्षूपुढें उभी राहिलीच पाहिजे असा काहीं ह्याच्या बाबतींत नियम नाहीं. ह्याला त्याची जरूरीही लागत नाहीं. जरूरी जी लागते ती पहिल्या प्रकारच्या शब्दाच्या संबंधाची. प्रत्यक्ष वस्तुनिदर्शक शब्दाशीं ह्याचा संबंध मात्र यावा लागतो. त्या संबंधाशिवाय त्याची प्रतीति होत नाहीं. संबंध आल्याशिवाय दुसऱ्या प्रकारचे शब्दाची नीट समज पडत नाहीं, म्हणूनच ह्याला वस्तुसंबंधनिदर्शक असें नाव दिलें आहे.

अशाच प्रकारचें विचारसरणीचें धोरण व्याकरणातील काहीं पारिभाषिक शब्दांच्या मुळाशीं ठेवलेलें आढळतें. व्याकरणात 'वाचक' आणि 'द्योतक' असे दोन शब्द आहेत. साधारण अव्युत्पन्न माणसाच्या नजरेनें पाहिलें तर दोन्ही शब्द समानार्थी किंवा एकाच अर्थी दिसतील. अर्थांतला फरक त्याच्या नजरेस येणार नाहीं. फरक आहे तो सूक्ष्म आहे आणि तो व्याकरण शास्त्रातच मानावयाचा. स्वतंत्र रीतीनें ज्याच्या अर्थाची प्रतीति होते ते 'वाचक' शब्द आणि तशी ज्याची होत नाहीं, प्रतीति होण्यासाठीं दुसऱ्या शब्दाच्या संगतींतच त्याला ठेवावें लागतें अशा शब्दाला 'द्योतक' शब्द म्हणतात. अप, अधि, असले उपसर्ग घेतले किंवा च, वै, तु, हि असलीं अव्ययें घेतलीं तर ह्याला त्याचा स्वतःचा असा अर्थ काय आहे ? स्वतंत्र रीतीनें वाक्यात त्याचा उपयोग करीत नाहींत. कोणत्याही वस्तूची जाती, व्यक्ति गुण ह्यापैकीं तीं काहींच दाखवीत नाहींत. त्याला अर्थ प्राप्त होतो तो दुसऱ्या वस्तुनिदर्शक शब्दाच्या साहचर्यांत. असें जरी आहे तरी हें ध्यानात ठेवलें पाहिजे कीं, हे सर्व तेवढे द्योतकशब्द वरच्या वस्तुसंबंधनिदर्शकाचे प्रकार आहेत असें नाहीं. हे त्यापैकीं काहीं आहेत. यास्काचार्यांनीं नाम, आख्यात, उपसर्ग, निपात असे शब्दांचे चार प्रकार पाडले आहेत, व ते

वाचक व द्योतक ह्या मुद्यावरच पाडले आहेत. ही मानसशास्त्राच्या पुढची पायरी आहे. वर जे दोन भाग मानसशास्त्राच्या आधारानें पाडले आहेत त्याच्याहीपूर्वी जावयाचें म्हणजे नैयायिकांनीं मूळ शब्द कल्पून त्याचे जे दोन प्रकार मानले आहेत ते येतात. नैयायिक म्हणतातः—"शब्दः द्विविधः (१) वर्णात्मकः (२) अवर्णात्मकः." पहिल्या वर्गांत सर्व साधारण मानवी शब्द येतात व दुसऱ्या वर्गांत प्राणी जे शब्द करतात ते किंवा मेघांची गर्जना येते. वर्णात्मक शब्दांचे नंतर मानसशास्त्र मानते ते दोन भाग पाडा किंवा वैयाकरणी म्हणतात तसे चार पाडा किंवा सध्यां प्रचलित आहेत त्याप्रमाणें आठ भाग कल्पा. हे सर्व पुढचे प्रकार आहेत. वैयाकरणांनीं मानलेल्या प्रकाराची छाननी पुढें येईलच. सध्यां आपण वरील दोन प्रकारांकडे लक्ष देऊं.

भाषेचीं दोन स्वरूपें असतात. एक आंतर व एक बाह्य. बाह्यरूपांत उच्चाराचें किंवा स्वराचें प्राधान्य असतें. आंतर स्वरूपांत मनांत जी कांहीं क्रिया होते तिला प्राधान्य असतें. त्यांतच वस्तूची आणि शब्दाची सांगड घालण्याची क्रिया चाललेली असते. ह्या क्रियेनें वस्तू आणि तिचा शब्द ह्यांचा संबंध कळतो. म्हणूनच ही क्रिया वस्तुसंबंधनिदर्शक असते. मनुष्य कुत्र्यासारखा कधीं ओरडतो; किंवा लहान मूल मांजरासारखें ओरडतें; हा जो आवाज काढला तो कुत्र्याचा किंवा मांजराचा द्योतक शब्द नव्हे हें खास. तें त्यांचें ओरडणें आहे. परंतु भाषेच्या खऱ्या नियमानें व मीमांसकाच्या विचारसरणीनें पाहावयाचें झालें तर हे आवाज काढणें हें सुद्धा शब्द गणले पाहिजेत. तेंच भॅव, भॅव, किंवा मॉ, मॉं, ओरडणें ज्यावेळेस मांजर किंवा कुत्रा दाखविण्याकडे आपण उपयोग करतो व त्याप्रमाणें तो पदार्थ त्या शब्दानें दाखविला जातो ह्यालाच शब्दाचें वस्तुसंबंधनिदर्शकत्व म्हणाव.

भाषेच्या प्रथमच्या अवस्थेंत मनुष्य ज्या वेळेस वचनोन्मुख असतो त्या वेळेस त्याच्या स्वरांत अनुकरणत्व व उद्गारप्रधानत्व हीं दोन तत्त्वें कधीं प्रामुख्यानें दिसतात हें आपण मागें पाहिलें आहे. त्या दोन्हीं तत्त्वांचा उल्लेख येथें येवढ्याच अर्थानें घ्यावयाचा कीं, त्या प्रकारचे भाषेंत शब्द बनत असतात. शब्दसमूहामध्यें जसा ज्या शब्दाचा संबंध येईल तसा त्यावरून

त्याचा प्रकार ठरवावयचा. " घरा वर पक्षी बसला " ह्या वाक्यांत चार शब्द आहेत. ह्यांतील कांहीं शब्द अर्थाच्या दृष्टीनें पूर्ण आहेत कांहीं अपूर्ण आहेत. अपूर्ण शब्दांचा अर्थ करण्यासाठीं पूर्ण शब्दाची जोड घ्यावी लागते. 'घर,' 'पक्षी,' 'बसला,' हे शब्द पूर्ण आहेत, 'वर' हा शब्द अपूर्ण आहे. त्यांनी भाषेंत असल्या अपूर्ण शब्दांना कांहींच किंमत नाहीं. त्यांच्याकडे बोलणारे इतकें लक्ष देत नाहींत. ते शब्द नुसते रिकाम-टेकडे असतात.

ह्या दोन पूर्ण आणि अपूर्ण प्रकारांत आणि वैयाकरणांनीं मानलेल्या चार प्रकारांत फारसें अंतर नाहीं. वैयाकरणांनीं मानलेले उपसर्ग आणि निपात हे प्रकार अपूर्ण शब्दांच्या सदरांत येतात. व पहिले दोन प्रकार, नाम आणि आख्यात हे पूर्ण शब्दांच्या सदरांत येतात. अंतर आहे तें एवढेंच एक व्याकरणाची परिभाषा आहे व दुसरी शब्दशास्त्राची आहे. सर्व वैयाकरणी तरी ह्या चार प्रकारांवर कोठें स्वस्थ आहेत ? शब्दांचे चार प्रकार मानण्यांत त्यांचे समाधान कोठें होतें ? चारांची संख्या आठांवर हल्ली व्याकरणकारांनीं नेली आहे. तेथें तरी त्यांचें समाधान झालें तर ठीक.

शब्दाचे प्रकार कांहींही व कितीही असोत. शब्द एकटाच असा कोणी उच्चारीत नाहीं. व उच्चारला तरी त्याला विशेषसा अर्थ असत नाहीं. मनांत क्रिया चाललेलीच असते. एका वस्तूची छाया आंत आली कीं तिचा दुसऱ्या वस्तूच्या छायेशीं संबंध येतो. अशा तऱ्हेनें ह्या कांहीं नाना छाया उद्भवतील त्या एकमेकांस जोडून मग व्यक्त रीतीनें शब्दसमूहाच्या रूपांत त्या प्रतिकृती बाहेर पडतात. शब्दाशब्दांत असणारे संबंध पुष्कळ तऱ्हेचे असूं शकतील. आकांक्षा, योग्यता, संनिधि, किंवा संयोग, वियोग, साहचर्य, विरोधिता, अर्थ, प्रकरण, लिंग, संनिधि इत्यादि संबंध मानले आहेत. निरनिराळे जे शब्द आपण उच्चारतों ते पहिल्या तीन संबंधानें बांधले जाऊन, त्यांच्या वैयक्तिक कल्पना एक होऊन त्यांची एक सामुदायिक अशी कल्पना बोलणारास किंवा ऐकणा-रास करून देतात. ही सामुदायिक कल्पना म्हणजे तात्पर्य. एक शब्दही कधीं कधीं तात्पर्य किंवा सामुदायिक कल्पना करून देतो. परंतु त्या

वेळेस दुसरें काहीं शब्द अध्याहृत असलेच पाहिजेत असें समजावें लागतें. तात्पर्यावरून किंवा शब्दाच्या व्यक्तीसमूहजन्य सामुदायिक कल्पनेवरून आपल्या इकडील वाक्यपरीक्षा किंवा तात्पर्यमीमांसा करणें हींच ज्यांच्या आयुष्याची इतिकर्तव्यता होती अशा मीमांसकामध्यें दोन तट पडले आहेत. वाक्यांतून किंवा शब्दसमूहांतून तात्पर्यार्थ कसा बाहेर पडतो हें पाहणें मोठें मनोरंजक आहे व त्या मीमांसकांतील दोन पक्षांची विचारसरणी पाहणें अस्थानीं होणार नाहीं.

मिमांसकांची प्रवृत्ति कशी करता आहे हें पूर्वीच आलें आहे. त्यांच्यांत तात्पर्याच्या दृष्टीनें पक्ष दोन, ( १ ) पहिला गुरु मीमांसक ( २ ) दुसरा भट्ट मीमांसक .पहिल्यालाच प्राभाकर व दुसऱ्यास कौमारिल अशीं हीं नांवें आहेत. शब्दशास्त्रानें ह्यांना निराळींच नांवें दिलीं आहेत. पहिले अन्विताभिधानवादी व दुसरे अभिहितान्वयवादी. ह्या दोन नांवाच्या अर्थावरून त्यांचीं मतें काय आहेत हें दिसून येतें. पहिले लोक अन्वितशब्दाचें अस्तित्व कबूल करतात व दुसरे प्रत्येक शब्द निराळा समजून त्याला एक विशिष्ट अर्थ देऊन नंतर त्याचा अन्वय करतात. पहिल्या वर्गाच्या मतानें अन्वित म्हणजे सबद्ध अशाच शब्दांचें अस्तित्व कबूल केल्यामुळें त्यांना तात्पर्याची अगदींच जरूरी भासत नाहीं. कारण तात्पर्य प्रथम पासूनच त्यांना मिळत असतें. शब्द उघडा, असंबद्ध, निराश्रीत असा कधींही त्यांच्या मतें सांपडणें शक्य नाहीं. शब्द जो येणार तो कांहीं तरी कर्तृ, कर्म, अधिकरण वगैरे पैकीं एकादा संबंध बरोबर घेतल्या शिवाय कधींही येणार नाहीं. शब्दाचा बोध होतो खरा पण तो उघड्या निराश्रित एकलकोंड्या शब्दाचा होणें शक्य नाहीं. बोध होण्यासाठीं शब्दास दुसऱ्या त्याच्या सवंगड्याचा आश्रय घ्यावा लागतो, व त्याला आपला उघडेपणा झांकावा लागतो.अन्वयाचा किंवा संबंधाचा आरंभ अगदीं पहिल्या शब्दाच्या उच्चारापासून होत गेल्यामुळें सर्व शब्दांचें सामुदायिक स्वरूप किंवा तात्पर्य काय हें पाहण्याची अवश्यकताच राहत नाहीं.

हल्लीं परभाषा शिकविण्याची किंवा शिकण्याची नवी तऱ्हा Direct Method म्हणून काढली आहे. हींमध्यें अन्विताभिधानवाद्यांच्या मताचा

पुरस्कार बराच किंवा सर्वैव केला जातो. मुलांस जी भाषा शिकवावयाची ती त्याच्यापुढें वैयक्तिक शब्द न ठेवतां अन्वित–जोडलेले–असे शब्द-समूहच ठेवून व बोलणाऱ्यास त्याचें अनुकरण करावयास सांगून शिकवायची असते. परभाषा शिकण्याची ही नवीन पद्धत आहे. हिच्यात पठणशक्तीस ताण बसत नाहीं, व भाषा शिकणाऱ्याचा भाषेंत प्रवेश फार लवकर होतो. लिहिण्यापेक्षा बोलणें ह्या पद्धतीनें सोपें होतें.

दुसरा पक्ष अभिहितान्वयवाद्याचा. ह्या लोकांना तात्पर्यार्थाची फार जरूरी भासते. प्रत्येक शब्दास त्याचें निराळें अस्तित्व आहे. त्याचा निराळा त्यास अर्थ आहे. उच्चारल्याबरोबर त्याच्या अर्थाची पूर्णत्वानें ऐकणारास प्रतीति झालीच पाहिजे. पुढें असणाऱ्या दुसऱ्या शब्दाशीं त्याचा संबंध आल्यानंतर मग तात्पर्यार्थ निराळाच निघेल ही गोष्ट वेगळी. त्याचा स्वार्थ एक असेल व तात्पर्यार्थ दुसराच असेल. शब्दाशब्दांत असणारे संबंध पहिल्या पक्षाच्या लोकांनीं मानलेल्या संबंधापेक्षा निराळे आहेत. एकादा शब्द उच्चारल्याबरोबर त्याच्या अर्थप्रतीतीनें अशी कांहीं ऐकणाऱ्याच्या मनात अपेक्षा उत्पन्न होते कीं त्याच्यापुढें अमकाच शब्द आला पाहिजे. भलताच शब्द आला तर तात्पर्यार्थ भलताच निघून बोलणारा आपल्या बुद्धीवर नाहीं असा निष्कर्ष निघेल. अग्नि ओला असतो, ह्या वाक्यात अपेक्षेचा भंग झाला आहे अग्नि शब्द उच्चारल्याबरोबर अपेक्षा ही असते कीं पुढें काहीं तरी उष्णत्वदर्शक शब्द आला पाहिजे. त्याशिवाय तात्पर्यार्थाची पूर्तता व्हावयाची नाहीं त्याऐवजीं जर तद्विरोधी ' ओला, ' वगैरे शब्द आला तर भलताच अर्थ निष्पन्न होतो. त्याचप्रमाणें पुढें येणारा शब्द योग्य असला पाहिजे व ज्याचा ज्या शब्दाशीं संबंध असेल त्याच्या जवळ तो शब्द होता होईल तो ठेवला पाहिजे. क्रिया-विशेषण, संबंधीसर्वनाम ह्यांच्या जागा बदलल्या म्हणजे वाक्यांत कसे प्रमाद होतात हें सर्वांना माहीत आहेच. Indirect method म्हणून भाषा शिकणाऱ्यामध्यें जी एक पद्धत प्रचलित आहे ती अभिहितान्वयाची आहे. प्रत्येक शब्द कोशांत पहावयाचा, त्याचा विशिष्ट अर्थ कल्पावयाचा व नंतर असे पुष्कळ शब्द वर सांगितलेल्या संबंधानें जोडून तात्पर्यार्थाची प्राप्ति करून घ्यावयाची. भाषांतराच्या मुळाशीं हीच पद्धत आहे. –

वर सांगितलेले दोन्ही पक्ष खरे आहेत. प्रत्येक वाक्याचा अर्थ करतांना आपणास दोन्ही पक्षांचा आश्रय करावा लागतो. केवळ शब्दालाच अर्थ असतो म्हणून चालावयाचें नाहीं व नसतो म्हटलें तरीही बरोबर दिसणार नाहीं. आपल्या मनांत दोन्ही प्रकारच्या क्रिया चाललेल्या असतात. शब्दाचा वैयक्तिक अर्थ आपण घेतों आणि सामुदायिकही अर्थ घेतों. दोन्ही पक्षांचा समन्वयच आपण करतों. वैय्याकरण व मम्मटादि आलंकारिक ह्यांनी आपल्या ग्रंथांत दोन्ही मतांचा समन्वयच केला आहे. दुसऱ्या शब्दांच्या संबंधाशिवाय कोणत्याही शब्दाला स्वतंत्र अर्थ हा राहणारच आणि दुसऱ्याशीं संबंध आल्यानंतर त्याचा संबद्ध अथवा अर्थही त्याला येणार.

ह्या दोन्हीपैकीं एकच जर पक्ष मानला तर पुढें भाषांच्या जाती मानण्यांत जी एक मोठी अडचण येते, तिचा येथें उल्लेख केला पाहिजे. आपण तुटक तुटक शब्दांत विचार करतों कां वाक्यांत विचार करतों ? अगोदर तुटक शब्द मनांत योजून नंतर ते सांधतों कां सांखळींत गोंवल्याप्रमाणें एक ओळच्याओळ आपल्या मनांत उभी राहते व नंतर बाहेर पडते हा एक प्रश्नच आहे. भाषा चांगली सुधारली म्हणजेच हे विचार सुचतात व सुचल्यानंतर त्याची बरोबर सगतवार मांडणी करणें कठीण होतें. मानसशास्त्रानें जर पाहिलें तर आपण जो विचार करतों तो नेहेमीं सूत्रबद्ध असतो. तुटक तुटक असे विचार कधींही येत नाहींत व जर आले तर वर्तनांत सूत्रबद्धता आढळून येत नाहीं. वेडे किंवा मादक पदार्थांच्या अमला खालीं असलेले लोक मात्र तुटक विचार करतात. त्यांना पौर्वापर्य संबंधाची अगदी कल्पना नसते. तशी स्थिति शुद्धीवर असलेल्या माणसाची नसते.

विचारांमध्यें जी सूत्रबद्धता सापडते त्यामुळेंच कांहीं लोक असें म्हणतात कीं भाषा जी उत्पन्न झाली ती सर्वांगपरिपूर्ण झाली. तिच्या कोणत्याही बाबतींत उणेपणा नव्हता. उत्क्रांति कांहीं हळू हळू झालेली नाहीं. सर्वनामें, क्रियापदें, नामें, प्रत्यय, लकार अशा तऱ्हेनें एकामागून एकाची उत्पत्ति झाली नाहीं. गेजच्या गरजा भागविण्यापुरती भाषा त्याच समाजाजवळ होती; व ती सर्वांगपूर्ण होती. तिच्यांत म्हणजे क्रियापदें अगोदर झालीं व इतर शब्द उत्पन्न होत गेले हें म्हणणें चूक आहे.

असें म्हणणारा एक पक्ष आहे. पृथ्वीच्या पाठीवर पुष्कळ ठिकाणीं मानवांचे कळप किंवा समाज होते. त्यांच्या भाषाही निरनिराळ्या होत्या व त्या चांगल्या सपन्न होत्या. उत्क्रांतीची किंवा सुधारणेची त्यांना जरूरि नव्हती. सुधारणा झाली असेल, नाहीं असें नाहीं पण अगदीं क्षुल्लक बाबतींत झाली असेल. त्या त्या समाजाची रानटी भाषा एकत्र करून मग पुढें भाषात जातवारी काढली. समाजाच्या व्यवस्थितींत अमकीच एक भाषा असली पाहिजे असा कांहीं आग्रह धरतां यावयाचा नाहीं. शब्दांपासूनच प्रत्यय झाले पाहिजेत. भाषेचें प्रथमचें स्वरूप शब्दनिगडितच पाहिजे, व नंतर प्रत्ययनिगडीत होईल, हें म्हणणें ठीक नव्हे. अमका एक समाज उदाहरणार्थ, चिनी अथवा तुर्की शब्दनिगडित भाषा वापरतो, आर्य लोकांचे वंशज प्रत्ययी भाषा वापरतात म्हणून एकेकाळीं आर्य लोकही चिनी लोकांप्रमाणें शब्दनिगडित भाषा वापरीत असावेत असें त्या पक्षाचें म्हणणें आहे.

ह्या मताची उभारणी कच्च्या पायावर झाली आहे. हे लोक उत्क्रांतिवादच मानीत नाहींत. जगात अशी कोणतीही वस्तू सजीव किंवा निर्जीव नाहीं कीं ती उत्क्रांतीच्या कक्षेत येत नाहीं. भाषा म्हणजे कांहीं निर्जीव गोष्ट नव्हे. भाषेच्या प्रत्येक अवयवास चेतनत्व आहे. सचेतन भाषेला उत्क्रांतीचे नियम लागू करावयाचे नाहींत तर मग ते कोणाला लागू करावयाचे ? सचेतन भाषा सचेतन मानवाच्या ताब्यात आहे. मानवाप्रमाणें तीही उत्क्रात होत जात आहे. तेव्हा वरील मतात कांहीं अर्थ नाहीं हें उघड आहे.

मनुष्यानें आपल्या भोंवतीं जरा नजर फेंकली तर त्याला चारी बाजूस ईश्वरनिर्मित अशा विविध प्रकारच्या वस्तू दिसतील. जितक्या वस्तू त्याच्या नजरेच्या टापूत येतील तितक्या सर्वांस नावें असलीं पाहिजेत. तेव्हा वस्तुनिदर्शक अशी एक शब्दाची जातच बनली. ज्या ज्या वस्तूंची इंद्रियाना प्रतीति घडते अशा वस्तूचा एक निदर्शक शब्द व त्या सर्व वस्तू एका वर्गात. भोंवतालच्या सर्व वस्तू एकसारख्या एका मुशींत ओतून काढल्यासारख्या नाहींत. कांहीं मोठ्या असतील, कांहीं आखूड असतील, कांहीं पिंवळ्या, असे नानाप्रकार असणार. वस्तू एका जातीची

परंतु व्यक्तीव्यक्तीच्या गुणात फरक. हे सर्व गुण दाखविणारे शब्द पाहिजेत. पुन. त्या वस्तूत पुष्कळ तऱ्हेच्या क्रिया आहेत. प्रसरणादि क्रिया करण्याची पात्रता त्या वस्तूत असते. तेव्हा क्रिया दाखविणाऱ्या शब्दांचा एक निराळा वर्ग बनतो. ह्या तिन्ही वर्गांस I Substance words, 2 Attributive words, 3 Phenomena words अशी नावें दिलीं आहेत. ह्यापैकीं स्वतंत्र कोणते आणि दुसऱ्यापासून व्युत्पादिले जाणारे कोणते ह्याबद्दल वाद आहे. कोणी म्हणतात शब्द मूळ दोनच प्रकारचे असू शकतात व त्या दोन प्रकारच्या शब्दांपासून इतर सर्व शब्द साधले जातात. पहिला प्रकार सार्वनामिक धातूचा व दुसरा क्रियावाचक धातूचा. सार्वनामिक धातूपासून प्रत्ययाचा पसारा उत्पन्न होतो व क्रियावाचक धातूपासून प्रातिपदकें वगैरे तयार होतात.

आपल्या इकडील विद्वानांत पूर्वी शब्दाच्या मूळ स्वरूपाबद्दल अशीच भवति न भवति झाली आहे. नामेंच प्रथम असावींत आणि क्रियावाचक धातू किंवा शब्द पाठीमागून आले असावेत. क्रियाधातूपासून काहीं जरी प्रातिपदकें निघालीं तरी काहीं स्वतंत्र असणारच असें म्हणणाऱ्यांचा एक पक्ष, व त्याच्या विरुद्ध दुसरा पक्ष यथायत् नामें कोणत्या तरी धातूपासून व्युत्पादणें शक्य आहे असें प्रतिपादिणारा आहे. शाकटायन वगैरे वैय्याकरण आणि निरुक्तकार यास्क वगैरेचें "आख्यातजानि नामानि" हें तत्त्व आहे. ह्या सिद्धांतास काहीं हरकती येतात. सर्वच नामें किंवा प्रातिपदकें धातूपासून काढू लागलों तर पुष्कळ ठिकाणीं आपण अगदीं हतबल होऊं. काहीं शब्द असें आहेत कीं, त्यात अवयव सापडणें शक्य नाहीं. प्रकृति–प्रत्यय साधित शब्द असले तर व्युत्पत्तिनें अखंड शब्दांचे खंड पाडता येतील, व अमक्या धातूपासून आला असें म्हणता येईल. काहीं शब्द तर केवळ प्रकृतिच असतात. त्याच्यात प्रत्ययाचा पूर्ण अभाव असतो. काहीं लोक असेंही म्हणतील कीं, ह्या निरवयव प्रकृतींत मुद्दा काहीं प्रत्यय व प्रकृति प्रच्छन्न समजून अध्याहृत धरावेत किंवा कल्पावेत. असें जरी केलें आणि अक्षरवर्णावून निघण्याचा मार्ग काढला तरी " उणादि " प्रातिपदकें अशीं आहेत कीं, त्यापुढें व्युत्पत्तिवाद्यांना हात टेकावे लागतील; कारण, त्यांचा वाटूडी वर्षंच

दाखवितां येणेंच शक्य नाहीं. तेव्हां हा वाद कसा तरी मध्यावर मिटविला पाहिजे. जो शब्दच केवळ अर्थावबोधक असतो व जो धातु प्रकृति व प्रत्यय ह्यांच्या संयोगानें होत नसून 'स्वयमेव सिद्ध' असतो त्याला धातुज नाम म्हणतां येणार नाहीं. दुसरे जे शब्द कृत किंवा तद्धित प्रत्ययानें अथवा समासाच्या योगानें साधले जातात, त्यांची व्युत्पत्ति लावून त्याला धातुज असें म्हणतां येईल. मूळच्या ह्याच मुद्यावर सिद्ध व साधित किंवा रूढ, यौगिक, योगरूढ, यौगिकरूढ असे शब्दाचे वर्ग पाडून त्यांची योजना केली आहे. भाषेतील प्रथमचे शब्द क्रियावाचक होते व वस्तुबोधक शब्द त्यापासून झाले असावेत असा पुष्कळ विद्वानांचा तर्क आहे. संस्कृतमधील वैयाकरण व निरुक्तकार धातूपर्यंत तरी जातात. व्युत्पत्ति काढतां काढतां धातूपर्यंत थांबतात. पृथक्करण करण्याच्या ह्यांचीची मजल धातूंच्या पुढें त्यांनीं नेली नाहीं. धातूंत कांहीं त्यांनीं व्युत्पत्ति चालविली नाहीं. पण एकाच कुटुंबांतील ठरलेल्या भाषांच्या तुलनात्मक अभ्यासानें धातूसुद्धां व्युत्पादितां येतात. संस्कृत वैयाकरणांनीं धातूंची संख्या १७०६ पर्यंत नेली,परंतु ही संख्या कांहींच्या मतें जास्त आहे. अमका धातु अमक्या धातूपासून निघाला असें म्हणत पाठीमागें जात जात कांहीं लोक नऊ धातूपर्यंत येतात. आणि सर्व भाषेची प्रचंड इमारत ह्या नऊ धातुरूपी स्तंभावर चढविली आहे असें प्रतिपादतात. डॉ० मरे यांनीं हे नऊ धातु थॉग्, बॅग्, क्यॉग्, डयॉग्, स्यॉग्, म्यॉग्, न्यॉग्, ल्यॉग्, ग्ल्यॉग् असे कल्पिले आहेत. ज्या तत्वावर त्यांनीं सर्व इतर धातू ह्या नऊ धातूंशीं जोडले त्याच तत्वावर ह्या नऊ धातूंना पुन्हा एका धातूशीं जोडतां येणार नाहीं का ? सर्व ग्रीक भाषा एकट्या 'इ' धातूपासून निघाली आहे असें कित्येक मानतात. त्याचप्रमाणें लॅटिन भाषा 'दि' पासून झाली असेंही एक मत आहे. वेदांतांत ज्याप्रमाणें सर्व लौकिक वस्तूंचा व व्यवहारांचा एका अद्वितीय ब्रह्मा मध्यांत लय करतात त्याप्रमाणें सर्व शब्दांचा, व धातूंचा एका धातूंत लय करावयाचा अशी हरप्रवृत्ति नसेलना ? ह्या विचारसरणींत अतिशयोक्तीचा भाग फार असावासा वाटतो. व्युत्पत्तीस अगदींच वाव द्यावयाचा नाहीं असें नाहीं. शब्द तर व्युत्पादिले पाहिजेत. होतां होईल तों त्यांची

मूळें शोधून काढलीं पाहिजेत. पण कांहीं शब्द असे सांपडणारच कीं, त्यापुढें व्युत्पत्तीस हात टेकावे लागतील, व आद्य माणसाची जरी भाषा घेतली तरी तींत त्यानें एकस्वरी धातूपासून भाषा बनविण्यास सुरवात केली असें म्हणणें म्हणजे त्याच्या अंगीं विलक्षण भाषाशास्त्रवित्त्व होतें असें म्हणण्यासारखें आहे. तेव्हा त्याच्या भाषेकडे जरी पाहिलें तरी कांहीं शब्द व्युत्पाद्य व कांहीं अव्युत्पाद्य असतात असें म्हणणें खात्रीनें विसंगत होणार नाहीं. नामें क्रियापदापासून निघतात कीं नाहीं हा वाद बाजूस ठेवून भाषेच्या प्रथमच्या स्थितींत कोणत्या प्रकारचे शब्द असतात हें पाहू. मानसशास्त्रदृष्ट्या शब्दाचे 'वस्तुनिदर्शक' आणि 'वस्तुसंबंध निदर्शक असे आपण भाग पाडले. व्याकरणदृष्ट्या 'वस्तुनिदर्शक' ( नामें किंवा प्रातिपदकें ) व 'क्रियानिदर्शक' ( धातु ) असे शब्दाचे प्रकार भाषेच्या प्रथमस्थितींत असावेसे दिसतात. भाषाशास्त्राच्या मतानें सार्व नामिकधातु आणि क्रियाधातु असे धातूचे दोन प्रकार पडतात. चिनी भाषेंत शब्दाच्या दोन जाती कल्पिल्या आहेत एक सजीव शब्दाची व दुसरी निर्जीव शब्दाची. सजीव किंवा सचेतनी शब्द हे वस्तूचा निर्देश करतात पण एकापुढें दुसरा ठेवला म्हणजे पहिल्याचा वस्तुनिदर्शक अर्थ नाहींसा होऊन त्याच्या ऐवजीं त्या वस्तूचा गुण-निदर्शक तेवढा अर्थ त्या पहिल्या शब्दाचा होतो. दुसरे शब्द निर्जीव जातीचे, हे रिकामटेकडे असतात. तात्पर्यार्थाची मात्र पूर्तता ह्याच्याशिवाय होत नाहीं. ह्याच शब्दाना अव्ययें अथवा निपात म्हणण्याची चाल आहे. अव्ययें व निपात ह्याना कोणताच प्रत्यय लागू शकत नाहींत. त्याचें जें एक स्वरूप असतें तेंच कायम राहतें.

वाक्यामध्यें येणारे शब्द, योग्यता, आकांक्षा, सन्निधि, ह्या किंवा कर्तृ, कर्म, अधिकरण इत्यादिसंबधानीं एकमेकास सांधलेले असतात. सांधताना संबंध दाखविणारे शब्द योजावे लागतात. ह्यानाच फाल्तु रिकाम टेकडे किंवा निर्जीव अशी संज्ञा दिली तर चालेल. कांहीं भाषांत असें होतें कीं, ह्या फाल्तु शब्दाचा अवशेष प्रत्ययामध्यें राहतो. सर्व प्रत्यय एके काळीं फाल्तु का होईना पण स्वतंत्र शब्द होते परंतु काळाच्या ओघांत सांपडल्यामुळें पुढचे किंवा पाठीमागचे शब्दावयवातील

वर्ण लोकांच्या बोलण्यांत दिसत नाहींत. सध्या साधारण समजूत अशी आहे कीं, प्रत्यय म्हटला म्हणजे शब्दाच्या शेवटींच आला पाहिजे. पण तसा प्रत्ययाला काहीं सर्व साधारण असा निर्बंध घालता येणार नाहीं. प्रत्यय शब्दाच्या कधीं मागें येईल, कधीं पुढें येईल. मूळ शब्दाच्या पुढें किंवा मागें प्रत्ययाच्या येण्यानें भाषेत कधीं कधीं दोन रूपें दृष्टीस पडतात, एक प्रत्ययीभाषा व दुसरी उपसर्जनीभाषा. काहीं शब्दावशेष पुढें लागतात, काहीं मागें लागतात. वेदपूर्वकालीन समाजात ज्या भाषा प्रचलित होत्या त्यामध्यें प्रत्ययीभाषा आणि उपसर्जनीभाषा असे दोन प्रकार होते. त्याच्याहीपूर्वी असा एक समाज असला पाहिजे कीं त्याच्या भाषेमध्यें लिंग, वचन विभक्ति वगैरे संबंध दाखविणारा एकही प्रत्यय नसावा. एक समाज आपले शब्द नाकांत उच्चारी तर दुसरा अगदीं साध्यारीतीनें निरनुनासिक उच्चारी. अशी विविधता सर्व समाजाच्या प्रथम प्रथमच्या भाषेंत सांपडणार.

---

## प्रकरण ५ वें.

— o —

### प्रत्ययोद्गम.

लिंग, वचन, विभक्ति यांचे व क्रियापदास लागणारे नानाप्रकारचे प्रत्यय ह्या सर्वांचा उत्पत्तिक्रम लावता येण्यासारखा आहे. प्रत्यय हे स्वतंत्र शब्दाचे अवशेष आहेत ह्याबद्दल वाद नाहीं. वर लिहिलेल्या लिंग, वचन, विभक्ति ह्यांच्या प्रत्ययाचा माग काढावयाचा म्हणजे शब्दांचा इतिहास पाहणें आहे. व्याकरण व्याकरण म्हणतात तें हेंच. ह्या सर्व प्रत्ययाच्या प्रसाराची ऐतिहासिक सुसंबद्ध चर्चा व मांडणी हा एक व्याकरणाचा विषय असतो, आपण आपल्या मनांत. ध्वनींच्या साहाय्यानें ज्या रीतीनें व्यक्त करतों ती रीती शिष्टसंमत आहे कीं नाहीं, समाजांतील ठरीव पद्धतीप्रमाणें आहे कीं

नाहीं, हें पाहणें व्याकरणाचें काम असतें. व्याकरण भाषेस स्थैर्य आलें म्हणजे उत्पन्न होतें. व्याकरण म्हणजे भाषा नव्हे. व्याकरण म्हणजे काहीं कोश नव्हे. भाषेमध्यें येणाऱ्या शब्दांचा 'व्याकार' करणारें तें एक शास्त्र आहे. भाषेच्या उत्पत्तीच्या वेळेस 'शब्द' असे फार थोडे असतात. आदिसमाजाच्या जेवढ्या गरजा तेवढे शब्द, आणि ते कसेतरी एकमेकां जवळ ठेवून भाव व्यक्त करावयाचा. ते शब्द अमुक एका विशिष्ट क्रमातच आले पाहिजेत असा काहीं नियम नसतो. संबंधाची कल्पना त्यावेळेस कोठली व त्यामुळें व्याकरण तरी कोठून येणार ? भाषेच्या उत्पत्ती नंतर पुष्कळ दिवसांनीं व्याकरणाची प्रवृत्ति होते. व्याकरण, वेदांत व इतर दार्शनिक विचार हे सगळे विषय ज्ञाततेचे आहेत. संस्कृतभाषा प्रचलित झाल्यानंतर पुष्कळ दिवसांनीं, शेंकडों वर्षांनीं, तिला व्याकरणाच्या साच्यात घालण्याची कल्पना विद्वानांना सुचली. कोणत्याही भाषेची स्थिति हीच आहे. व्याकरणाचा जन्म भाषेच्या नंतर पुष्कळ वर्षांनीं होतो. भाषा चांगली वाढीस लागल्यानंतर तिची स्वयंस्फूर्तीच्या लेखकाकडून उपासना झाल्यानंतर व त्यामुळें भाषेस सौंदर्य व महत्व प्राप्त झाल्यानंतर भाषारूपी वृक्षाची वाढ व रचना, नियमबद्ध करण्याची इच्छा जागृत होते. नद्यांनीं संस्कृतांत वेद गायिले व नंतर त्याची व इतर भाषेची रचना यास्क, पाणिनी व इतर व्याकरणकारांनीं नियमबद्ध सांगितली. वेदावर प्रातिशाख्यें फार प्राचीनकाळीं लिहिलीं हें खरें. पण खुद्द वेद व प्रातिशाख्यें ह्यामध्यें पुष्कळ काळ गेला आहे. शिवाय प्रातिशाख्यें म्हणजे भाषेचीं व्याकरणें नव्हत. प्रत्येक प्रातिशाख्य त्या त्या विवक्षित वेदाचें विषमपदविभागी पुस्तक किंवा संक्षिप्त व्याकरण. सर्व साधारण संस्कृत भाषेशीं त्याचा संबंध अगदींच नाहीं. प्रातिशाख्यानंतर संस्कृतचें बोली किंवा भाषा ह्या दृष्टीनें व्याकरण लिहिण्याचे बरेच प्रयत्न झाले. पाणिनीच्यापूर्वी पुष्कळ व्याकरणकार होऊन गेले यास्काच्या निरुक्तांत २०–२५ व्याकरणकारांचा उल्लेख आला आहे. त्यामध्यें निरनिराळे देशही आणले आहेत यास्काचार्यांची साधी परिभाषा, विवेचन करण्याची पद्धति, सूत्रांचा अभाव, ह्यावरून आचार्य पाणिनीच्या पूर्वी ते झाले असावेत. आचार्यपाणिनीचा काल खिस्तपूर्व ८०० मानतात. व्याकरणांत चान्द्र,

ऐन्द्र वगैरे निरनिराळे पंथ आहेत. मिमांसकांच्या प्रवृत्तीनंतर व्याकरणकार यावयास पाहिजेत. मिमांसेपासून दोन फाटे फुटून एक अलंकार शास्त्राकडे जातो व दुसरा व्याकरणाकडे जातो असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. दोन्हींसही गौतम, कणाद वगैरे मुनींच्या मतांची अपेक्षा असते. तर्कशास्त्राशिवाय ह्या दोन्ही शास्त्रांचें चालत नाहीं. व्याकरणाची तर सर्व उभारणी तर्कशास्त्रावर केलेली असते. शब्द ज्या वेळेस उचारले जातात त्यावेळेस आपण अमुक अमुक तर्कशास्त्राचे किंवा मानस शास्त्राचे नियम पाळतों ह्याची थोडीच जाणीव आपणास असते. आपण आपले एकामागून एक शब्द उचारीत असतों. उचारण्याची क्रिया झाल्यानंतर, समाधानाची पहिली उकळ कमी झाल्यावर त्याचे संबंध काय आहेत किंवा त्याचें नातें काय आहे हें जाणण्याचा आपण प्रयत्न करतों. त्याच प्रयत्नात व्याकरणाचें मूळ आहे. असे शब्दांच्या जातीबद्दलचे प्रश्न सोडवण्याकरता जसे जसे प्रयत्न होतील त्यावर व्याकरणाची वाढ अवलंबून असते. व्याकरणाचा संबंध निरनिराळ्या शास्त्रांशीं लावण्यात आला आहे. त्यानें व्यापलेल्या क्षेत्राबद्दल बराचसा वाद आहे, सर्व मतात थोडें थोडें सत्य आहे, आणि प्रत्येक मतात व्याकरणाच्या एकेक अंगाची दिशा दाखविली जाते. सर्व एकवटून घेतलें म्हणजे व्याकरणाची पूर्ण कल्पना येते व्याकरण म्हणजे ध्वनिशास्त्रावरचें एक वार्तिक आहे असें म्हणतात; भाषेच्या किंवा वाङ्मयाच्या वाढीबरोबर व्याकरणही फोफावतें असें कित्येक म्हणतात; इंद्रियांच्या साहाय्यानें जे कांहीं ध्वनि उत्पन्न होतात त्यावर व्याकरण रचलें आहे असेंही एक मत आहे. व्याकरणात शब्दरूपी ध्वनींचा अंतर्भाव होतो, आणि तो जर केला नाहीं तर व्याकरण तरी कशाचें करावयाचें ? पण ध्वनींशिवाय इतरही कांहीं गोष्टी आहेत, व्याकरणात भाषेची वाढही अजमावता येते पण त्यापेक्षा दुसऱ्याही गोष्टी येतात. व्याकरणाचा विषय भाषा व भाषेंत येणारे शब्दाशब्दातील संबंध दाखविणें हा असतो, व्याकरणानें भाषा सुटसुटित साच्यात बसते, भाषेच्या वाढींतील अराजकता व्याकरणानें नाहींशी होते. व्याकरण म्हणजे भाषेंतला कायदा आहे, व त्यामुळें भाषेच्या साम्राज्यात बेबंदशाहीस थाराच रहात नाहीं. व्याकरण असणें हें भाषेच्या सुस्थितीचें किंवा सुधारणेचें लक्षण आहे. रानटी

भाषांना व्याकरण क्वचितच असतें. सुधारलेल्या भाषांचें व्याकरण लिहिल्यामुळें त्या सर्व भाषांचें एकमेकांतील नातें उघडकीस आलें आहे.

आतां व्याकरणांत सांगितलेले शब्दांचे प्रकार आणि त्यांच्यातील एकमेकांचे संबंध दाखविणारे प्रत्यय यांच्या उत्पत्तीचा क्रम पाहू. सर्व प्रत्ययांत 'वचनाचे' प्रत्यय अगोदरचे असले पाहिजेत. भाषा बोलणाऱ्या 'पहिल्या' माणसाची कल्पना केली तर त्याला स्वतःबद्दल कांहीं कल्पना आणि भोंवतालीं किंवा समोर असलेल्या वस्तू बद्दलची कल्पना असली पाहिजे. एकेवेळीं स्वतःबद्दलचा विचार सुद्धां पाठीमागून आला असावा. इंद्रियांना —त्यांतल्या त्यांत डोळ्यास प्रथम जी वस्तू दिसेल तिचा विचार सर्वांच्या अगोदर येणार व त्या नंतर स्वतःबद्दलचा विचार येणार. एकच गोष्ट त्या आद्यमानवाला दिसली अशी कांहीं गोष्ट होणार नाहीं. दुसऱ्याही कित्येक वस्तु दिसल्या असतील. तेव्हां दृष्टिपथांत येणारी वस्तु एक व ती त्याच्या स्वतःच्यापेक्षा कांहीं निराळी आहे असा विचार त्याचे डोक्यांत आला असावा. एकवचनाची कल्पना त्या वस्तूवरून व शिवाय द्विवचनाची कल्पना स्वतःवरून आली असावी. बहुवचनाची किंवा अनेकवचनाची कल्पना द्विवचनावरून सुचलेली आहे. द्विवचन पहिलें आणि नंतरच बहुवचन. जगातील कितीतरी भाषांत द्विवचन सांपडतें. आर्य, सेमिटिक, ट्युरेनिअन हॉटेन्टाट आस्ट्रेलियातील भाषा ह्या सर्वांत नामें व क्रियापदें ह्यांच्या रूपांत द्विवचन सांपडतें. त्याचा उपयोग फार होतो असें नाहीं, जशी भाषा सुधारत जाते व अनेक वचनाचा उपयोग सर्वांस व दोघासाठींही होतो तसतसा द्विवचनाचा उपयोग मागें पडतो. बहुवचन द्विवचनानंतर अस्तित्वांत आलें असलें पाहिजे असें म्हणण्यास दुसरें एक कारण आहे. एक, दोन, तीन इत्यादि संख्या वाचक शब्द एका मागून एक उत्पन्न झाले आहेत. तीन ह्या अर्थाच्या आर्येतर सर्व भाषातील शब्दामध्यें 'ओलांडणें' असा अर्थ आहे. three, tres, tri, त्रीस्—तृ ओलांडणें—असे इंग्लिश, लॅटिन, ग्रीक, व संस्कृत भाषांतील शब्द आहेत, दोनच्या पुढचे अंक म्हणचे 'पलीकडचे' लांबचे, 'तृतीय पुरुषार्थी वापरण्यास योग्य' असे आहेत. कांहीं रानटी भाषांत— व्हिक्टोरिया मधील उदाहरणार्थ—दोनच्या पुढचे आंकडे नाहींत. न्यूझीलण्ड-

मध्यें तीच स्थिति. कांहीं भाषांत तीनालाच 'बहु' ह्या अर्थी शब्द योजतात. दिसतांना द्विवचनाची उत्पत्ति व उपयोग विलक्षण व अस्वाभाविक वाटतो पण वस्तुस्थिति अशी आहे खरी. वचनांत एक, द्वि, बहु असा प्रत्ययांचा क्रम लागतो.

वचनाच्या बाबतींत बोलणारा मनुष्य आपल्याशिवाय इतर वस्तूवर एक दोन—अनेक संख्येचा आरोप करतो व त्याप्रमाणें त्या शब्दांना वचनाची उपाधि लागते. तसेंच तो मनुष्य समोरच्या वस्तूवर लिंगाचा आरोप करतो. आद्यमनुष्याची भाषा लिङ्गप्रत्ययविरहितच असली पाहिजे. लिंगाची भाषेत जरूरी असते असा भाग नाहीं. फिनी, सॅक-द्रियन वगैरे भाषांत लिंगप्रक्रिया नाहीं; तथापि संस्कृतीच्या दृष्टीनें त्या कमी दर्जाच्या नाहींत. लिंगप्रत्ययांच्या उत्पत्तीबद्दल निरनिराळे तर्क पुढें येण्याचा संभव आहे. एक तर्क असा—बोलणारा मनुष्य आपले सर्व गुण आपल्या पुढच्या वस्तूवर लादतो. त्या गुणांत आपल्या स्वतःच्या लिंगाचा त्या वस्तूवर आरोप करतो. हें मत जर खरें धरलें तर प्रतोक वस्तूस पाहणाऱ्याच्या दृष्टी-कोनाप्रमाणें निरनिराळीं लिंगें असलीं पाहिजेत, व तसें तर आपल्या पाह-ण्यांत येत नाहीं. दुसरा तर्क असा—पुल्लिंग, स्त्रीलिंग, नपुंसकलिंग, अशा सर्व तऱ्हेचीं सर्वनामें पूर्वी भाषेत होतीं व त्याप्रमाणें सर्वनामापासून इतर सर्व प्रत्यय झाले त्याचप्रमाणें ह्या सर्वनामापासून तिन्हीं लिंगें तयार झालीं. ज्या शब्दापुढें ज्या ज्या लिंगाचें सर्वनाम ठेवलें त्याप्रमाणें त्या सर्वनामा-पासून त्या शब्दाचें लिंग ठरलें. ह्याही तर्कांत एक दोष आहे. तो हा कीं, इतर शब्दांचें लिंग सर्वनामावरून ठरलें हें खरें पण ह्या सर्व-नामांत तरी तीन प्रकारचा लिंगभेद कसा झाला? आपण कांहीं एका विवक्षित शब्दाच्या लिंगाच्या उत्पत्तीचा विचार करीत नाहीं. लिंगेंच कशीं उत्पन्न झालीं हें पाहतों आहोंत, तेव्हां ह्या तीन लिंगीं सर्वनामांपासून शब्दाचीं लिंगें तयार झालीं असें म्हणून चालावयाचें नाहीं. कारण पुन्हां त्या सर्वनामांत तरी लिंगभेद कसा झाला हा प्रश्न शिल्लक राहतोच. आमच्या मतें शब्दाचें लिंग म्हणजे एक त्याची जात आहे. बोलणाऱ्यांनीं आपल्यावरून तद्वाचक शब्दाचें लिंग ठरविलें असेल. शब्दानें दाखविलेल्या अर्थाकडे पाहावयाचें. अर्थ काय विशेष बोध करतो ! त्याच्यात विशेष जोर, शक्ति, किंवा धाडस वगैरे पुरुष

ध्वनींत सापडणाऱ्या गुणापैकीं एखादा जरी गुण असला तर त्या शब्दाला पुल्लिंगीं म्हणावें. त्याचप्रमाणें स्त्रीलिंगाबद्दल झालें असावें. स्त्रीलिंगाची उत्पत्ति पुल्लिंग किंवा नपुंसकलिंगानंतर झाली असावी. प्रथम भाषेंतील सर्वच शब्द पुल्लिंगी किंवा नपुंसकलिंगी—एक लिंगींच असावेत व त्यामध्यें भेद नंतर उत्पन्न झाला असावा. संस्कृतांत स्त्रीवाचक एक शब्द 'दारा' पुल्लिंगाचा आहे व दुसरा शब्द 'कलत्र' नपुंसकलिंगाचा आहे. अन्य भाषेंतील शब्द ज्यावेळेस आपल्या भाषेंत येतात त्या वेळेस त्याचें लिंग ठरवितांना ह्या असल्या माहितीचा उपयोग करावा लागतो. त्या शब्दाच्या उच्चारांतील जोर, त्यानें दाखविलेल्या अर्थांतला जोम, शक्ति, इत्यादि गुण, त्याचा अन्त्यस्वर इत्यादि गोष्टी ध्यानंत त्याचें लिंग ठरवितात.

आतां विभक्तींच्या प्रत्ययाकडे वळूं. सर्व विभक्ति एकदम अस्तित्वांत आल्या नाहींत. एका मागून एक आल्या. विभक्तींच्या साहाय्यानें दाखविण्यांत येणारे संबंध पूर्वी स्वतंत्र शब्दांच्या साहाय्यानें दाखवीत असत. संबोधनाची दुसऱ्यास हाक मारण्याची प्रथम जरूरी माणसास भासली असली पाहिजे. संबोधनांत थोडासा उद्गारवाचक अर्थ असतो. तेव्हां इतर उद्गारप्रधान शब्दांबरोबर त्याची उत्पत्ति लावली पाहिजे. शिवाय वाक्यांत एकवाक्यता येण्यासाठीं शब्दांचे संबंध जसे प्रत्यक्ष दिसतात तसा संबुद्ध नामाचा संबंध प्रत्यक्ष दिसत नाहीं आणि नाम संबुद्ध करून सुद्धां त्याला बाजूस ठेवून त्याच्याबद्दल दुसरा शब्द घालून विधानाची एकवाक्यता आणावी लागते. संबोधनानंतर प्रथमा, द्वितीया, षष्ठी, सप्तमी, चतुर्थी, पंचमी, आणि शेवटीं तृतीया असा विभक्तींच्या उत्पत्तीचा क्रम लागतो. प्रथमा विभक्ति नामाच्या मूळच्या स्वरूपांत आढळते. इंग्लिश भाषेंत हिला नॉमिनेटीव्ह म्हणजे वस्तूचें नांव सांगणारी विभक्ति, असें नांव आहे. नामाच्या मूळ स्वरूपास प्रथमा विभक्तिंत समजण्याची कल्पना-सुद्धां नंतरची असावी. प्रथम तिच्यांत कर्तेपणाची कल्पना असली पाहिजे. प्रथम अकर्मक धातु उपयोगांत होते, सकर्मक धातु नंतर आले. त्या अर्थी कर्माच्या विभक्तीची कल्पना प्रथमेच्या नंतरची असली पाहिजे. द्वितीयेच्या अगोदर सुद्धां षष्ठी वगैरे विभक्ति प्रचारांत असल्या पाहिजेत असें एकदां वाटतें, कारण अकर्मक किंवा कर्तरी धातु ज्या

चेळेस बाहुल्यानें उपयोगांत आणीत असत तेव्हां पदार्था पदार्थां मधील संबंध दाखविण्याची जरूरी भासली असलीच पाहिजे. द्वितीया व षष्ठी ह्यांच्या नंतरच्या सप्तमी आणि चतुर्थी, ह्या विभक्ति होत. षष्ठी आणि सप्तमी ह्यांच्या रूपांत फारसें अंतर नाहीं. आर्यभाषांच्या कांहीं शाखांत सप्तमी आणि चतुर्थी यांची रूपें सारखीं दिसतात, म्हणून सप्तमीपासून चतुर्थीची उत्पत्ति झाली असली पाहिजे असें कित्येक मानतात. चतुर्थींत असलेल्या नामावर क्रियेचा जरा दूरचा संबंध पोहचतो. कर्मावर जितका क्रियेचा परिणाम होतो तितका "संप्रदाना" वर होत नाहीं. शिवाय सकर्मक क्रियापदांना एक कर्म देऊन पुन्हा दुसरें कर्म देण्याची जरूरी फार पुढें लागली असावी. क्रियेमध्यें चांगला पराचसा भाग घेणाऱ्या पदार्थांससुद्धां चतुर्थी घालतात, पण ह्या सर्व द्वितीयेनंतरच्या कल्पना. द्वितीया व चतुर्थी ह्या विभक्ति क्रियापदाच्या एका विशिष्ट रूपासही लागत. वेदामध्यें सर्तवे, कर्तवे किंवा पुढील संस्कृतमध्यें सर्तुम्, कर्तुम् वगैरे रूपें सांपडतात. पौर्वात्य भाषांत ह्या रूपांनं क्रियापदाचा एक "अर्थ" समजतात. कोणत्याही क्रियेंत "कारण, साधन, रीति," वगैरेंची कल्पना पंचमी पासून आली व हीच कल्पना तृतीयेच्या विशिष्ट रूपाच्या मुळाशीं आहे, उपमेंतील तुलनेची कल्पना पंचमीचीच आहे तृतीया पंचमीपासून असावीशी वाटतें तृतीयेंत कर्त्याचा अर्थ फार पुढें आला असावा, कर्तरि किंवा अकर्मक क्रियापदाचा कर्तरिच प्रयोग होणें शक्य आहे. कर्मणि होणें शक्य नाहीं. त्याअर्थी सकर्मक क्रियापदाच्या उत्पत्तीनंतर व कर्मणि प्रयोगाच्या कल्पनेबरोबर तृतीयेंत कर्त्याचा अर्थ ओतला असावा असा तर्क आहे. इतकें विभक्तींविषयीं झाल्यानंतर शब्दांचे आठ प्रकार मानले आहेत त्यांच्या उत्पत्तीचा विचार करूं.

भाषेच्या प्रथम स्थितींत कोणत्या तऱ्हेचे शब्द असतात हें मागें सांगितलेंच आहे. क्रियावाचक धातु व सार्वनामिक धातु असे दोन प्रकारचे धातु सांपडतात. एकापासून क्रियापदें व इतर शब्द तयार होतात. ह्यानाच शब्दांच्या प्रकृति म्हणतात व दुसऱ्या सार्वनामिक धातूपासून सर्वनामें व प्रत्यय तयार होतात. कांहीं शब्दांत दोन्ही प्रकारचीं मूळें

सापडतात. उदाहरणार्थ "अहम्" शब्द घेतला. अहम् शब्द सर्वनाम असून त्याचा अर्थ 'मी' आहे. 'अहम्' शब्द इतका जुना आहे कीं जुनी जुनी समजलेली वेदाची भाषा तिच्याकडे पाहिलें तर कालपरवाची आहे कीं काय असें वाटेल. ह्या 'अहम्' शब्दात दोन्हीं प्रकारचे धातू सापडतील 'अह' हा क्रियादर्शक धातु व 'म्' हा काहीं तरी सर्वनामाचा अवशेष असावा. अशा तऱ्हेचा सर्व शब्दाचा प्रकार आहे. क्रियापदाचीं जीं काळाचीं, अर्थाचीं व प्रयोगाचीं रूपें होतात तीं ह्या दोन प्रकारच्या शब्द-मूळाच्या मिश्रीभवनानें होतात. तेव्हां आठी प्रकारांपैकीं, धातु, सर्वनामें, नामें, असा क्रम पाहिला लागतो. बाकीचे सर्व प्रकार नामें व क्रियापदें ह्याच्या सबधावर अवलबून असतात, किंवा त्या निरनिराळ्या सबधाचीं रूपेंच असतात. उदाहरणार्थ क्रियाविशेषण. नामाना विभक्तीचे प्रत्यय लावले म्हणजे क्रियाविशेषणें तयार होतात. 'सहसा' हें क्रियाविशेषण 'सहस्' ह्या नामाचें तृतीयेचें रूप आहे साकम्, सुखम् ह्यामध्यें द्वितीया दिसते. मोठ्यानें थोरडतो. 'मोठ्यानें' हें क्रियाविशेषण रूप तृतीयान्त रूप आहे. कुत्र, यत्र ( सप्तमी, ) कोठें, जेथें वगैरे विभक्तीपासून क्रियाविशेषणें झाल्याचीं उदाहरणें होत. गुणविशेषणें नामापासून बनतात, पदार्थांतील गुण दाखविण्याकरता पदार्थांचें नावच योजीत. शब्दयोगी अव्ययें तर पूर्वस्वरूपात पुष्कळशीं क्रियाविशेषणेंच असतात. ऋते, पश्चात्, मराठींतील पाशीं (पार्श्वपासून), कडे ( कटिपासून ) "शब्द जोडणारीं" अव्ययें अगदीं अलीकडचीं आहेत. शब्दातच एकाद्या वर्णांत फरक करून शब्दाशब्दाचा सबध दाखवीत असत परंतु ह्यानें जास्तच घोंटाळा उडू लागल्यामुळें शब्दयोगीअव्ययाचा निराळाच वर्ग बनविला व त्यायोगानें भाषेंत साधेपणाही येऊ लागला. सर्व सबध दाखविण्यास विभक्ति कमी पडू लागल्या म्हणून नव्हे तर विभक्तींनीं दाखविलेला सबध दिवसादिवसानें शब्दयोगीअव्ययाकडूनच दाखवायचा अशी भाषेंतच एक प्रवृत्ति असल्यामुळें व अर्थ जास्त स्पष्ट करण्याकरतां विभक्तीशेजारीच क्रियाविशेषणें ठेवणें भाग पडू लागलें म्हणूनच शब्दयोगीअव्ययें आणि क्रियाविशेषणें ह्याचा जास्त निकट सबध येतो. शब्दयोगी अव्ययाचा क्रियाविशेषणाशीं व क्रियाविशेषणाचा नामाच्या

विभक्तींच्या रूपाशीं संबंध येतो. शब्दयोगी अव्ययाचा जसा परात्पर नामाच्या विभक्तींच्या रूपाशीं संबंध येतो तसा उभयान्वयी अव्ययाचा सर्वनामाच्या विभक्तींच्या रूपाशीं संबंध येतो. संस्कृतमध्यें यस्मात्, तस्मात्, यत्, तत्, यदि, तर्हि, हीं तर स्पष्टच उदाहरणें आहेत. मराठी "कारण" ह्या नामाचा उभयान्वयी म्हणून उपयोग करतात. "म्हणून" हें उभयान्वयी म्हण ( पूर्वस्वरूप—भण=बोलणें ) ह्या धातूचें पूर्वकालवाचक रूप आहे आता राहिलीं उद्गारवाचक किंवा केवल प्रयोगीं अव्ययें. खरें पाहिलें असता ह्यांना शब्दाच्या आठ प्रकारात का गोवावें हें काहीं समजत नाहीं. अव्यय जरी एक असलें तरी त्यामध्यें वाक्यचेंवाक्य एकवटलेलें असतें हे वाक्यरूपी शब्द फार जुने असावेत सर्व भाषेची उत्पत्ति ह्या अव्ययापासून कधीं कधीं लावतात. मनुष्याचे प्रथम प्रथमचे ध्वनि उद्गार—पूर्ण असले पाहिजेत. ह्याचा विचार मागें आलाच आहे. देवा, देवा ! अवर ! आई, आई ! अरे राम तू धनी ! हरा शिवा गोविंदा ! विष्णवे नम ! हीं सर्व वाक्येंच आहेत जी भावना ह्यांच्या मुळाशीं आहे तीच भाषेच्या प्रथमच्या ध्वनीच्या मुळाशीं असावी हे आठी प्रकार जरी एकमेकापासून निघाले असें म्हटलें तरी व्याकरण दृष्ट्या ते अगदीं स्वतंत्र आहेत कधीं कधीं एकेका प्रकारात सुद्धा दुसऱ्यास उत्पन्न करण्याची पात्रता असते एकच सर्वनाम कधीं कधीं वाक्यात दोन संबंध दाखवितें दर्शक सर्वनामापासून संबंधी सर्वनामाची उत्पत्ति होतें इंग्लिश मधील that हें सर्वनाम दोन्ही जातींचें आहे दर्शक आहे आणि संबंधींही आहे इंग्लिश मधील उपपदाचा हाच प्रकार त्याची उत्पत्ति सर्वनामापासून लावतात

क्रियापदाचीं रूपें कशीं बनतात तें पाहू उघड्या धातूच्या पुढें सार्वनामिक धातू ठेवले म्हणजे वाक्यात वापरण्यास ते योग्य होतात. सार्वनामिक धातूच्या योगानें त्याचा इतर शब्दाशीं कर्ता, कर्म, काळ, अर्थ, वगैरे संबंध दाखविले जातात क्रियापदाच्या बाबतींत काळ, अर्थ, प्रयोग इत्यादि संबंध महत्त्वाचे आहेत काळात तीन प्रकार मुख्य आहेत. ते वर्तमान, भूत, आणि भविष्य ह्या तिन्हींचे जे पोटभेद पडले ते फार पुढें पडले असावेत ते तयार करण्यास दुसऱ्या क्रियापदाची मदत घ्यावी

लागते, ह्या बाबतींत चिनी भाषेंतल्याप्रमाणें करावें लागतें. त्या भाषेंत जसें भूतकाळ दाखवावयाचा असेल तर मुख्य धातु घ्यावयाचा आणि त्याच्यापुढें " संपणें " ह्या अर्थाचा दुसरा धातु ठेवावयचा असतो म्हणजे भूतकाळ साधतो. तद्वत्च जे भूतभूत, वर्तमानभूत, वर्तमानभविष्य, भविष्यभविष्य वगैरे पोटभेद आहेत त्याचें आहे. मुख्य क्रियापदाचें वर्तमान, भूत, किंवा भविष्य काळाचें धातुसाधित विशेषण घेऊन दुसरें क्रियापद त्याला जोडावयाचें असतें. संयुक्त काळाचा विचार बाजूस ठेवला तर मुख्य वर्तमान, भूत, व भविष्य असे तीन काळ राहतात त्यात प्रथम वर्तमान आला असावा ह्यात वादच नाहीं. आदि मनुष्यासमुद्धा आपल्या समोर होणाऱ्या गोष्टींचा परिणाम जास्त भासला असला पाहिजे आणि त्याच गोष्टी व क्रिया त्यानें व्यक्त केल्या असाव्यात. वर्तमानकाळानंतरची भूतकाळची कल्पना. भूतकाळ दाखविण्याचे पूर्वी निराळे प्रकार होते. भूतकाळात Aorist सगोदरचा, नंतर Perfect, लिट् आणि नंतरचा Imperfect संस्कृतमध्यें एक भूतकाळ धातूच्या द्विरुक्तीनें दाखवितात. शब्दाची द्विरुक्ति किंवा अभ्यास केला म्हणजे साहजीकच बोलणाऱ्याकडे ऐकणाऱ्याचें लक्ष्य लागतें व बोलणाऱ्याच्या बोलण्यात जोर येतो बहुवचन दाखविण्याकरता देखील शब्दाची द्विरुक्ति करीत क्रियापदाचीं आणखीहि कांहीं रूपें चकरित इत्यादि द्विरुक्तीनें साधतात द्विरुक्तीचाच संक्षिप्त प्रकार 'अभ्यास' आहे " बडवून मारलें " ह्या वाक्यात 'बडवून बडवून' मारलें ही झाली द्विरुक्ति आणि " ब–बडवून मारलें " ह्यामध्यें अभ्यास केला. अर्थ दोहोंचा तोच. दुसरी भूतकाळ दाखविण्याची तऱ्हा म्हणजे धातूमधील स्वर दीर्घ करावयाचा. स्वरच जर धातूमध्यें नसेल तर दुसरा एकादा स्वर प्रथम लावायचा. संस्कृतमध्यें उरलेल्या दोन्ही भूतकाळात हाच प्रकार आहे. क्रियापदांना प्रथम " अ " आगम लावतात. इंग्लिश spit ह्याचें spat होतें काहीं वेळेस धातूच्या पुढें कांहीं शब्द जोडतात, ed, walked इ. इ. ह्यानंतर भविष्यकाळ भविष्यकाळाचीं रूपें संस्कृतमध्यें सहाय्यकारी " अस्, भू, तृ, " ह्याचीं वर्तमान काळाचीं रूपें घेऊन साधतात. काळानंतरचे अर्थ. क्रियापदाच्या रूपात अर्थ फारसा फरक करीत नाहींत. अर्थाला क्रियापदाचा 'अर्थ' म्हणण्यापेक्षा, सर्व

वाक्याचा अर्थ म्हणणें जास्त सयुक्तिक दिसेल. अर्थ म्हणजे बोलणाऱ्याच्या बोलण्यातील एक विशेष खोंच. किंवा त्याच्या मनातील एक विशिष्ट इच्छा असते. कोणत्याही प्रबल खोंचेशिवाय किंवा हेतूशिवाय जर साध्या रीतीनें वाक्य उचारलें तर स्वार्थ होतो त्यातच आज्ञा, इच्छा वगैरे दाखविली तर आज्ञार्थ होईल. त्याच्याहीपेक्षा जास्त जोरानें वाक्य उचारलें तर विध्यर्थ होईल. सकेतार्थ आणि सशयार्थ असे दोन आणखी क्रियापदाचे अर्थ मानले आहेत. पण ते क्रियापदाचे किंवा वाक्याचे अर्थ न होता काहीं विशिष्ट शब्दाचे होतात व त्या शब्दाच्या अर्थाची छाया त्या वाक्यावर पडते. अर्थाच्यानतर प्रयोगाचा विचार येतो. प्रयोग म्हणजे वाक्यातील क्रियापदाचा इतर शब्दांशीं सबध पाहणें होय. व हा सबध पाहण्यात क्रियेच्या फलाकडे पाहावयाचें असतें कर्मणि प्रयोग काहीं प्रथम नव्हता, कारण सर्वच धातु अकर्मक किंवा कर्तरि अर्थाचे होते. कर्मणि प्रयोगानें जें साधावयाचें तेच सस्कृत भाषा बोलणारे लोक आत्मनेपदी धातू योजून साधीत असत, व परस्मैपदी धातु घेऊन कर्तरि प्रयोग साधीत असत. पुढें मात्र हा फरक हळू हळू नष्ट झाला असावा.

वरील पैकीं काहीं गोष्टींचा पुन्हा येथें निर्देश त्याच्या महत्वाच्या मानानें केला पाहिजे. विभक्तींची सरमिसळ सस्कृत, ग्रीक, लॅटिन वगैरे आर्यभाषात झाली आहे एक विभक्ति कधीं कधीं दुसऱ्या विभक्तीची कामगिरी करते. सस्कृतमध्यें षष्ठी विभक्ति प्रथमेशिवाय कोणत्याही विभक्तीचें काम करते. " शेषे षष्ठी " ह्या सूत्राचा तोच अर्थ आहे. ग्रीक भाषेमध्यें चतुर्थीबद्दल पचमी येते आणि पचमीबद्दल चतुर्थी घातली तर चालते कधीं कधीं उचारसाम्यामुळें एक विभक्ति दुसरीबद्दल वापरली तर चालते विभक्तींचीं रूपें झाल्यावर म्हणजे काहीं काहीं कधींही उपयोगात आणलीं जात नाहींत केवळ निरुपयोगी होतात द्विवचनाच्या रूपाची एकवचनाच्या किंवा अनेकवचनाच्या रूपाइतकी जरुरी भासत नाहीं त्यामुळें सस्कृतशिवाय इतर सर्व भाषातून द्विवचन पार वगळलें आहे इतकेंच नव्हे तर सस्कृतशीं निकट जी पालिभाषा तींमध्यें सुद्धा द्विवचन आणि चतुर्थी वगैरे विभक्तींना अजिबात फाटा दिला आहे. त्याचें तरी कारण नेहमींच्या बोलण्यात त्या रूपाची

जरूरी लागत नाहीं इंच—एकीकडे पाली वगैरे भाषात विभक्तींची रूपें होता होईल तों कमी करण्याकडे प्रवृत्ति झालेली दिसते, तर दुसरीकडे विभक्तींचीं रूपें सारखीं वाढविलीं जात आहेत. फिनीश आणि तुर्की लोकांच्या भाषेत विभक्ति पुष्कळच आहेत. त्याचा उपयोग आहे. शब्दांमध्यें असण.रे संबंध अतिशय बारकाईनें दाखविता येतात.

विभक्ति पुष्कळ असणें भाषेच्या प्रगतीच्या दृष्टीनें चागलें किंवा वाईट हा प्रश्न निराळा आहे. तुर्की किंवा फिनी भाषेत शब्दाचे संबंध बारकाईनें दाखविता येतात म्हणून ह्या दोन भाषा ग्रीक, संस्कृत, पाली, प्राकृत वगैरे भाषांपेक्षा पुढें सरसावल्या आहेत कीं काय ? पुढें आहेत असें मानलें तर बाकीच्या महत्त्वाच्या बाबतींत त्यांचें जें रानटी स्वरूप दिसतें त्याची वाट काय ? ह्याचा निष्कर्ष एवढाच कीं जरी आर्योद्भव भाषेत विभक्तींची सरमिसळ करण्याची प्रवृत्ति आहे तरी त्याच्या नाहींसे होण्यानें होणारी उणीव दुसऱ्या बाजूनीं भरून काढली आहे. विभक्ति प्रत्ययाचीं दुसरीं रूपें क्रियाविशेषणें आहेत. मराठींत तृतीयेच्या ' नें ' प्रत्ययानें क्रियाविशेषणें बनविता येतात. " झपाट्यानें आला. " " तो मोठ्यानें ओरडला. " संस्कृतमध्येंही तोच प्रकार आहे. सुख, सुखेन, सहसा, हेल्या, हीं त्याचीं उदाहरणें होत. विभक्तींच्या प्रत्ययापासून क्रियाविशेषणें झालीं व क्रियाविशेषणावरून शब्दयोगीअव्ययें बनलीं. पूर्वीं अस्तित्वात असलेल्या सामुग्रीवरून क्रियाविशेषणें आणि शब्दयोगी-अव्ययें यांची उत्पत्ति आहे. एका शब्दाची मूळ जात बदलून तो अगदीं दुसऱ्या जातीचा बनणें ही क्रिया फार सावकाश होते. तिला फार काळ लागतो. ह्यावरून मागें जावयाचें म्हटलें तर प्रत्यक्ष नामें, विशेषणें आणि क्रियापदें देखील दुसऱ्या शब्दाचीं रूपें असावींत आणि सध्याचें त्याचें रूप प्राप्त होण्यास पुष्कळ काळ लोटला असावा असें मानणें प्राप्त होतें.

सर्वनामें भाषेमध्यें बऱ्याच अगोदरच्या स्थितीमध्यें प्रचलीत असावींत असें वर सागितलेंच आहे त्यांची उत्पत्ति नामाच्याही पूर्वीची असेल. सभोंवारच्या वस्तूचे निदर्शक शब्द अथवा नामें हुडकून काढण्याची जरूरी लागली असावी हें खरें आहे पण त्याच्याही पूर्वीं भोंवतालच्या वस्तुपेक्षा-ही अत्यंत निकटचा पदार्थ—ज्याच्याशीं संबंध म्हणजे अखंड तिन्ही

काळ येत असतो, असा तो स्वतः मनुष्य उत्पन्न झाल्याबरोबर दुसऱ्या वस्तूमध्यें आणि त्याच्यामध्यें परत्व अपरत्व या भावनेची जाणीव त्यास असली पाहिजे. स्वत सबधीं निदर्शक शब्द हे एक प्रकारचें सर्वनाम आणि स्वत शिवाय पुढें येणारीं माणसें किंवा पदार्थ म्हणजे 'तू' या वर्गातील असल्यामुळें तेंही एक पुरुषवाचक सर्वनाम. जरी दुसऱ्या इतर सर्वनामाबद्दल आपणास काहीं खात्रीनें सागता आलें नाहीं तरी पुरुषवाचक सर्वनामें प्रत्यक्ष नामापेक्षा अगोदर उत्पन्न झालीं हें निर्विवाद. धातु अगोदरचे व तज्जन्य नामें नतरचीं असें धरून जरी चालले तरी " दयामि, भवामि, अस्मि," या क्रियापदाच्या रूपात सर्वनामाचा अवशेष उघड दृष्टीस पडतो. अहम्मि =आमि=मि हे प्रत्यय भाषेच्या दृष्टीनें झालें. उपसर्जनीभाषेच्या दृष्टीनेंही सर्वनामाचे अवशेष प्रत्ययामध्यें–तेही क्रियापदाच्या रूपात दिसतात. उदाहरणार्थ, अभरम्, भवेयम्, अकरवम् अतारिषम् इत्यादि. कधीं कधीं मराठी भाषेत जो, जी जें, हीं सबधीं सर्वनामें वाक्यात गाळलेलीं आपण पाहतों. " मी मनुष्य पाहिला तो हा." या वाक्यात " जो " हें सर्वनाम गाळलें आहे असें तरी म्हणावें किंवा 'तो' हें जें सर्वनाम आहे त्यामध्यें दोन्ही सर्वनामाचे धर्म आहेत–तो=जो–तो असें म्हणावें, सबधीसर्वनामाची हीच मजा आहे. त्याची गोष्ट इतर शब्दाप्रमाणें नाहीं. उभयान्वयी, क्रियाविशेषण अथवा शब्दयोगी ह्यापैकीं एकाची उत्पत्ति दुसऱ्यापासून आणि त्या दुसऱ्याची उत्पत्ति प्रत्ययापासून आणि प्रत्ययाची उत्पत्ति सर्वनामापासून अशी परपरा लागते. सर्वनामात सुद्धा एक सर्वनाम दुसऱ्यास प्रसवतें.

व्याकरणाच्या भाषेत "प्रत्यय क्रियापदाना लागले आहेत" असें आपण म्हणतों. पण ती दृष्टि बाजूस ठेवून केवळ भाषाशास्त्राच्या दृष्टीनें जर त्याकडे पाहावयाचें झालें तर 'प्रत्यय' "क्रियापदापुढ ठेवले आहेत" असें म्हटलें पाहिजे. भाषेमध्यें क्रियादर्शक (Phenomena) शब्द असतील तर ठीकच पण काहीं भाषा अशा आहेत कीं हे क्रियादर्शकही शब्द नसल्यामुळें त्याचें काम इतर शब्दानीं भागवावें लागतें. वाटेल त्या शब्दाचा क्रियापदासारखा उपयोग होतो. अमका एक शब्द क्रियापद आहे असें

सदर्भावरून ताडावें लागतें. चिनी भाषेंत हाच प्रघात आहे. क्रियापदें नाहींत. शब्दांच्या जातीकडे पाहावयाचें नाहीं. वाक्याचा अर्थ तर पूर्ण केला पाहिजे. तेव्हा त्या आपत्तीचा स्वीकार करून जड भागवावी लागते. इतक्या लाब चिनीभाषेकडे जा कशाला ? खुद्द संस्कृत भाषेंतसुद्धा हाच प्रकार कधीं कधीं दृष्टीस पडतो. क्रियापदें आहेत, धातु आहेत, तरीसुद्धा नामें, विशेषणें, ह्याचा उपयोग वाक्यात क्रियापदाप्रमाणें केला जातो व मग काहींतरी 'अस्ति' वगैरे पद अध्याहृत समजून निरवानिरव करावी लागते. अर्वाचीन भाषेमध्यें नामें व क्रियापदें असा कायमचा भेद केला आहे. पण त्यामध्यें हीं सर्वनामाचीं अविशिष्ट रूपें प्रत्यय म्हणून शब्दापुढें लागतात. व त्यामुळें त्या शब्दाचा " क्रियापदें " म्हणून एक वर्ग झाला आहे. प्रथम क्रियापदामध्यें निराळ्या जाती नव्हत्या. एक प्रकारचे अकर्मक धातु होते. सकर्मक, कर्मणि भावे, किंवा प्रयोजक हे भेद मागाहून आले. अकर्मक धातूना अर्थाची पूर्तता करण्याकरता कर्माची जरूरी लागत नव्हती. जीं काहीं क्रियापदें होतीं तीं सर्व अर्थपूर्ण होतीं. व त्याना दुसऱ्या कसल्याही शब्दाची जरूरी लागत नव्हती. सकर्मक आणि अकर्मक क्रियापदापैकीं अगोदरचीं कोणतीं असा प्रश्न निघाला तर अर्थात् अकर्मक म्हणून उत्तर द्यावें लागेल. भाषेमध्यें असा एक काळ असावा कीं त्यावेळेस अकर्मकच तेवढीं क्रियापदें वापरीत असत. अर्थपूर्णता ही एक चीज पर्यासारखी आहे. काहीं शब्द आज जे अर्थ पूर्ण आहेत त्याच्यातला अर्थ कालपरत्वें नाहींसा होतो आणि तो पूर्ण करण्यासाठीं निराळ्या शब्दाची योजना करावी लागते. मग त्याना तुम्हीं कर्में म्हणा किंवा अर्थपूरक शब्द म्हणा. अर्थपूर्णतेची शब्दावरून उडून जाण्याची प्रवृत्ति असते. ती जसजशी अकर्मक क्रियापदावरून उडून दूर जाऊ लागली तसतशी अर्थ पूर्ण करण्यासाठीं कर्मासारखे शब्द वापरण्याची जरूरी भासू लागली. अशीच सकर्मक धातूची उपपत्ति लावतात. ते काहीं आपोआप उत्पन्न होत नाहींत. उत्पन्न होताना एकतर धातूच्या मूळच्या अर्थांत बराच फरक पडतो, आणि दुसरें विभक्तींच्या प्रत्ययाचा अर्थ आणि संबध थोडे तरी कमी होतात. संस्कृत 'या' धातूचा अर्थ जाणें आहे पण त्यापुढें जर द्वितीयेतले कर्म आलें तर मूळचा अर्थ फार नाहींसा होऊन

" प्रार्थना करणें, विनंति करणें" असा अर्थ होतो. पाणिनीच्या धातुपाठांतील धातूंकडे जर पाहिलें तर असें दिसून येईल की, पाठांतील पुष्कळशा धातूंना मूळचेंच सकर्मकत्व होतें. त्यामध्यें 'कर्मणे' अर्थ होता. कांहीं अकर्मक क्रियापदांच्या पुढें द्वितीया विभक्ति चालते. " अधिशीङ्स्थासांकर्म " किंवा "उपान्वध्याङ्वसः" वगैरे सूत्रें आहेत ह्याच्या मुळाशीं काय आहे ? सर्व धातु अकर्मक किंवा Neuter verbs अशीं होतीं. व त्याचा अवशेष ह्या धातूंत त्या त्या उपसर्गांच्या संगतींत राहून गेला. वस्तुस्थिति तर आढळली. व्याकरणदृष्ट्या तर त्याची सुसंगती लागेना. अशा पेचांत सांपडल्यामुळें अशीं वैयक्तिक सूत्रें बांधून वाट काढली आहे.

धातूंच्या जातीपैकीं सकर्मकाच्या अगोदरचे अकर्मक धातु असले पाहिजेत हें अर्थाकडे पाहून आपण ठरविलें. त्या अकर्मक धातूंपैकीं सुद्धां अगोदरचे कोणते आणि मागाहून आलेले कोणते व त्याचप्रमाणें सकर्मक धातूंतही अगोदरचे कोणते व मागाहून आलेले कोणते अशी वर्गवारी लावतां येण्यासारखी आहे. इतर भाषांत धातूचीं रूपें काय असतील तीं असोत. संस्कृतमधील धातूंत मात्र हा धागा बरोबर लावता येतो. आद्य धातु ठरवितांना एकंदर धातूंची जातवारी काढली पाहिजे. १ इ=जाणें सारखे एकस्वरी धातूचा पहिला वर्ग. २ दुसऱ्या वर्गांत एक स्वर आणि एक व्यंजन असणारे अद्=खाणें ह्यासारखे धातु येतील. ३ तिसऱ्या वर्गांत एक व्यंजन आणि एक स्वर—दा=देणें सारखे येतील. काळाच्या दृष्टीनें हे तीन प्रकारचे धातु अनुक्रमें पहिले, दुसरे, व तिसरे ठरतील. तिघानंतर—व्यंजन+स्वर+व्यंजन—तुद् सारखे ( ४ ) उत्पन्न झाले असावेत. व शेवटीं ज्यामध्यें संयुक्त व्यंजनें यादेत असे धातु तयार झाले असावेत. त्याचीं सर्वांचीं उदाहरणें अनुक्रमें खालीलप्रमाणें होतील—

१ स्वर—उदा० इ. इत्यादि.
२ स्वर + व्यंजन उदा० अद् इत्यादि.
३ व्यंजन + स्वर उदा० दा इत्यादि.
४ व्यंजन + स्वर + व्यंजन उदा० तुद् इत्यादि.

५ व्यंजन + व्यंजन + स्वर — उदा० द्रु इत्यादि.
६ स्वर + व्यंजन + व्यंजन — उदा० अर्द् इत्यादि.
७ व्यंजन + व्यंजन + स्वर + व्यंजन— उदा० स्वप् इत्यादि.
८ व्यंजन + व्यंजन + स्वर + व्यंजन + व्यंजन—उदा० स्यन्द् इत्यादि.

अगदीं दोघरीं जाग्, दरिद्रा, चकास् सारखे धातु उत्पन्न झाले असावेत. प्रयोजक, साहाय्यकारी, किंवा नामधातु ह्या सर्वांची उत्पत्ति सर्वांच्या मागून असली पाहिजे. कारण हीं सर्व दुसऱ्या मूळ धातूपासून किंवा नामापासून साधित आहेत. भाषेच्या मूळ स्वरूपात असे साधित धातु असणें शक्य नाहीं. हा सर्व पसारा नंतरचा आहे.

क्रियापदांचे प्रकार सांगितल्यानंतर त्यांच्या प्रत्ययाकडे लक्ष जातें. प्रत्यय बनविताना पुष्कळ गोष्टींकडे लक्ष असलें पाहिजे. प्रत्ययापासून क्रियेचा काळ कळतो. नंतर कर्त्याचें लिंग, वचन, हीं क्रियापदाच्या रूपावरून कळून येतात. वर्तमान, भूत, भविष्य किंवा त्यांचे बारीकसारीक पोटभेद यांची उत्पत्ति संस्कृत मधील " लकारा " वरून झाली हें खरें, तथापि सर्वच्या सर्व " लकार " हुबेहुब नक्कल म्हणून घेतले नाहींत. संस्कृत मधून मराठींत येताना पाली, प्राकृत, अपभ्रंश, अशा कितीतरी चाळण्या होत्या. सहा लकारांपैकीं कांहीं गळाले आणि कांहींमध्यें विनाकारण बारीकसारीक भेद शिरले. पाणिनी वगैरे वैयाकरणांनीं लकारांवर बरीच चर्चा केली आहे लकारांपैकीं वर्तमानत्व म्हणजे काय तर जी क्रिया आरंभिली आहे परंतु संपली नाहीं ती वर्तमानत्वांत आहे असें समजावें, असले पुष्कळ मुद्दे विचारांत घेतले आहेत, पण त्यांचा संबंध संस्कृतशीं असल्यामुळे मराठी भाषेच्या दृष्टीनें ते अप्रस्तुत आहेत. क्रियापदाच्या पूर्ण रूपांत एक धातूचें आणि दुसरें प्रत्ययाचें अशीं जीं दोन अंगें असतात त्यांना त्यांचे स्वतःचे निराळे अर्थ आहेत. ' क्रियेचें फल ' आणि ' क्रिया ' ह्या दोन गोष्टी धातूच्या रूपावरून समजतात आणि प्रत्यया वरून वर सांगितलेल्या दोन गोष्टींचे आश्रय समजतात. क्रियेच्या फलाचा आश्रय आणि क्रियेचा आश्रय हे प्रत्यय दाखवितो. फलाच्या आश्रया लाच व्याकरणांत कर्म अशी संज्ञा आहे. आणि क्रियेच्या आश्रयाला कर्ता म्हणतात. प्रत्ययापासून कर्ता, कर्म, काळ, वचन ह्या गोष्टी

कळतात. हे सारेही शब्द गुणदर्शक आहेत. कर्त्यांवरून क्रियेचा गुण, कर्मावरून क्रियेच्या फळाचा गुण, वचनावरून अकर्मक धातूंच्या बाबतींत कर्त्यांचा आणि सकर्मकांच्या बाबतींत कर्मांचा गुण आणि पुरुष काळ हा क्रियेचा गुण असे निदर्शक हे शब्द आहेत.

---

## प्रकरण ६ वें.

—:०:—

### वर्णप्रक्रिया अ—स्वरप्रक्रिया.

स्वर म्हणजे आवाज आणि प्रक्रिया म्हणजे फरक, आवाजामध्ये होणारे फरक, हा स्वरप्रक्रियेचा सर्वसाधारण अर्थ झाला. कोणत्याही शब्दाचा अथवा वर्णाचा उच्चार आवाजाशिवाय होत नाहीं. आवाज उच्चाराच्या मुळाशीं आहे. आपणास स्वराचा हा अर्थ घेऊन चालावयाचें नाहीं. कारण तो पदार्थविज्ञानशास्त्राचा विषय होईल. भाषाशास्त्र व तत्परत्वें वाङ्मय यांशीं त्याचा यत्किंचितही संबंध येणार नाहीं. व्याकरणात स्वर आणि व्यंजन असे जे वर्णाचे दोन प्रकार आहेत, त्यांपैकीं व्यंजनेतर 'स्वर' हा अर्थ प्रस्तुत प्रसंगीं अभिप्रेत असून त्यांविषयीं जे फरक आहेत त्या फरकाबद्दल विचार करावयाचा आहे. स्वरप्रक्रिया हा शब्दप्रयोग आचार्यपाणिनींच्या अष्टाध्यायींत आला आहे. परंतु तेथें त्यांनीं त्याची निराळ्या अर्थानें योजना केली आहे. वेदाची कोणतीही ऋचा चालत्या सुरांत म्हणावयाची असते. सुरात नानाप्रकारचे फरक करावे लागतात. ऋचा म्हणण्याचा प्रकार एक विशेष असल्यामुळें त्यांतील शब्दांचा उच्चार करतांना एकच सूर कायम ठेवावयाचा नसतो. त्यामध्यें आरोह, अवरोह, स्तंभन करावें लागतें. व आवाजाच्या निरनिराळ्या परिस्थितीमुळें उदात्त, अनुदात्त, स्वरित अशीं स्वरास नांवें प्राप्त होतात. या विषयाचा विचार पाणिनींनीं " स्वरप्रक्रिया " प्रकरणांत केला आहे. मराठींत अशली काहीं आरोह अवरोहाची भानगड नसल्यामुळें त्यांच्या विचाराकडे लक्ष पोहोंचविणें अप्रस्तुत होईल. आपणांस फक्त स्वरांतील फरक पाहावयाचे

आहेत. मराठी भाषेत उपयोगांत येणाऱ्या शब्दांत जे स्वरव्यंजनांचे एकीभूत मिश्र सांपडतें त्यापैकीं अ, आ. इत्यादि स्वरांत कालाकालांत एका पोटभाषेतून दुसरींत जातांना .किंवा अपभ्रष्ट रीतीनें बदलतांना होणारे फरक ह्या अर्थानें " स्वरप्रक्रिया " हा शब्द वापरला आहे. शब्दांमध्यें स्वराशिवाय दुसरे कसलेही फरक होत नाहींत असें नाहीं. व्यंजनांतही फरक होतात. फरक होणें म्हणजे दीर्घाचें ऱ्हस्व होणें एवढेंच नव्हे तर वर्णत्याग, वर्णागम, स्वराच्या गुणामध्यें व स्वरूपामध्यें होणारे फेरबदलही 'फरक किंवा प्रक्रिया' ह्या सदरांत येतात. मराठीमध्यें स्वर विरहित व्यंजनें फारशीं नजरेस येत नाहींत व त्या दृष्टीनें त्यांच्याही प्रक्रियेकडे आपणास लक्ष्य पोहोंचवावें लागेल.

स्वराच्या पूर्वस्वरूपाबद्दल मागें विवेचन आलेंच आहे. स्वर उत्पन्न करण्याची प्राण्याची यातना, त्यांत मनुष्याच्या स्वरांत सांपडणारी अपूर्वता, स्वर उत्पन्न करण्याचीं साधनें व निरनिराळ्या स्वरांचा—वर्णांचा योगशास्त्राप्रमाणें मानवी शरीरांत असलेल्या षट्चक्रापैकीं निरनिराळ्या चक्राशीं येणारा संबंध ह्या सर्व गोष्टी मागें भाषेच्या उत्पत्ति प्रसंगीं सांगितल्याच आहेत.

सर्व स्वर कंठाजवळ असलेल्या एका पोटदबदली चक्रापासून निघतात. स्वरसंख्या कितीही मानली तरी सर्व स्वर सारख्या किंमतीचे नाहींत हें उघड आहे. त्यामध्यें संयुक्तस्वर आणि साधे स्वर अशी विभागणी आहे. साधे स्वर अ, इ, उ आणि ह्यांच्या मिश्रणानें किंवा दीर्घीभवनानें संयुक्त स्वर उत्पन्न होतात. अ, इ, उ हे तीन स्वर स्वतंत्र आहेत. कांहीं वर्षांपूर्वीं हे तीन स्वर देखील एकाच स्वराचीं तीन रुपांतरें आहेत असें समजलें जात असे. अ ह्या आदिस्वराचीं इ आणि उ अशीं रुपांतरें होतात. पण ही चूक आहे असें नंतर आढळून आलें. व ही चूकही संस्कृत भाषेंतील स्वरप्रक्रियेची ज्यावेळेस त्यांनीं तुलना केली त्यावेळीं त्यांना कळून आली. त्यानंतर आदिस्वर एकटा 'अ'च नसून त्याच्या जोडीस 'इ' आणि 'उ' हे बसविले. मराठीमध्यें 'ऋ' आणि 'लृ' शिवाय करून बाकीचे सर्व स्वर आहेत. 'ऋ' आणि 'लृ' येतात, परंतु संस्कृतमधून येतात. संस्कृतमधील एखादा शब्द जशाचातसा जर मराठींत आला तर ऋ, लृ

स्वरही मराठींत त्या शब्दापुरते सापडतात, असें म्हणायला हरकत नाहीं. मराठींतील स्वरप्रक्रियेची नीट कल्पना येण्यास संस्कृतची स्वरप्रक्रिया आपणांस थोडीफार पहावी लागेल. कारण, दोन्ही भाषांचा संबंध किती निकटचा आहे हें सांगायला नको.

संस्कृत भाषेंतील प्रक्रियेकडे फार पूर्वींही लोकांचें लक्ष गेलें होतें. वेदांवर जीं स्वतंत्र प्रातिशाख्यें म्हणून व्याकरणें आहेत त्यामध्यें स्वरप्रक्रियेचा विचार बराच केला आहे. स्वराचे उच्चार काय, त्यामध्यें फरक कसे पडतात, असल्या मुद्याचा उहापोह त्या त्या वेदापुरता त्यांनीं केला आहे. त्याच्या पुढचें स्वरप्रक्रियेवरचें पुस्तक यास्काचार्यांचें " निरुक्त " हें होय. ह्या ग्रंथाचें एकदर भाषाशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्व फार आहे. स्वराचे फरक व त्यांचीं कारणें व आणखीही इतर बाबी ठोकळ मानानें प्रातिशाख्यापेक्षा जास्त सरळ व शास्त्रशुद्ध अशा रीतीनें ह्या ग्रंथात दिल्या आहेत. त्याच्या पुढील काळात तसलींच महत्त्वाचीं दोन पुस्तकें लिहिलीं गेलीं. एक प्रख्यात " अष्टाध्यायी " व दुसरें त्यावरचेंच पतजलीनें लिहिलेलें " महाभाष्य ". मराठीच्या व्याकरणकारानीं ह्या गोष्टीचा विचारच केला नाहीं. हा दोष प्राकृत वैयाकरणातसुद्धा सापडतो. त्यांनीं स्वरप्रक्रियेचे नियम दिले आहेत हे खरें, पण त्या फरकाच्या मुळाशीं असलेल्या कारणाचा अगदींच उलगडा केलेला नाहीं. तद्वतच मराठी व्याकरणकाराची स्थिति आहे. भाषाशास्त्रावर उभारलेलें, तर्कशास्त्रास संमत असलेलें, यास्क, पाणिनी पतजली, हेमचंद्र, वररुचि वगैरे संस्कृत व प्राकृत वैयाकरणींपरंपरा मानणारें आणि विदेशी वाक्प्रचाराना मान न तुकविणारें, व्याकरण अद्याप मराठींत व्हावयाचें आहे प्रत्यक्ष दामल्यांच्या शास्त्रीय म्हणविणाऱ्या व्याकरणाची ही स्थिति, मग इतराची गोष्ट कशाला ! दामल्यांच्या व्याकरणासुद्धा संस्कृतशीं परिचय यथायथाच दिसतो.

स्वरांचें उत्पत्तिस्थान व सख्या झाल्यानंतर स्वर आणि व्यंजनें ह्याच्या एकीभवनानें, मिश्रणानें व सान्निध्यानें शब्दाचें जें एक स्वरूप बनतें त्याकडे पाहू. आपणास शब्दाच्या अर्थाकडे लक्ष द्यावयाचें नाहीं. अर्थांत होणारे फरक पुढें 'शब्दार्थप्रक्रिया' ह्या सदराखालीं नमूद करण्यात येतील.

आपला सध्याचा विषय शब्दाचें बाह्य स्वरूप व त्याचाही एक प्रकार-स्वर विशिष्ट स्वरूप हा आहे अंत स्वरूप नव्हे.

शब्दाच्या उच्चारामध्यें फरक दोन वेळा पडणें शक्य आहे. एका मनुष्याच्या उच्चारामध्यें काहीं विवक्षित कारणामुळें फरक पडतो किंवा एका मनुष्यानें शब्द उच्चारल्यानंतर त्याची प्रतिकृति किंवा छाया दुसऱ्याच्या कानावर कोणत्या स्वरूपात आदळेल–ऐकणारा मनुष्य तो शब्द कोणत्या स्वरूपात ऐकेल किंवा ऐकल्यानंतर दुसऱ्यास सांगताना तो मनुष्य कोणत्या रूपानें सांगेल अशा दोन किंवा तीन तऱ्हांनीं शब्दाच्या उच्चारात फरक पडणें शक्य आहे एक तर शब्द नीट उच्चारला पाहिजे, दुसरें, त्याची प्रतिकृति दुसऱ्याच्या कानावर हुबेहुब उठली पाहिजे, आणि तिसरें, त्या दुसऱ्यानें त्याचा रिपोर्ट तिसऱ्यास नीट शुद्धीवर राहून अगदीं जसा ऐकला असेल तसा दिला पाहिजे कारणें जरी भिन्न आहेत तरी परिणाम एकच मुखातील स्नायूंचा दोष व ऐकणाऱ्याच्या कानाचा दोष हीं कारणें अगदीं जवळचीं व उघड उघड दिसणारीं आहेत काहीं वेळेस एकाद्या परिणामाची कारणमीमांसा करता येत नाहीं कारणाचा शेवें वासही येत नाहीं दूर कोठेंतरी अदृश्यस्थळीं राहून परिणामाचीं सूत्रें हालविण्याचें काम करणारीं काहीं कारण असतात व अशाचा पत्ता बरोबर लावून त्याच्या खाचाखुणा बरोबर पटविणें हें एक संशोधनकार्य आहे आणि तें काहीं सामान्य नव्हे

कोंकणातील लोकाचें बोलणें बरेंच सानुनासिक असतें 'देवळान्त' असें कोकण्या म्हणेल तर देशावरील मनुष्य घाटाप्यासरखा 'देवळात' असा निरनुनासिक शब्द उच्चारून मोकळा होईल बोलताना शब्दाना हेलकावे देणें किंवा प्रत्येक शब्दाच्या शेवटीं हेल काढणें हे कोंकणी मनुष्याच्या बोलण्यातील विशेष आहेत फ्रान्स देशातील लोक नाकात बोलतात इंग्लंड वगैरे थंड देशातील लोक तोंडातल्या तोंडात बोलतात. हा जो वाणींत दोष येतो तो येतो कोठून? इतर सर्व माणसाच्या मुखातील रचनेसारखीच त्याच्या मुखात एकंदर रचना असते. बदल जो होतो तो स्नायूंच्या हालचालींत होतो व त्याचा दुसरें विशेष काहीं कारण नसून ज्या देशात ते लोक राहतात त्या देशाचें हवामान हेंच कारण धरलें

पाहिजे. पेजावांतील लोकांचें बोलणें बरेंच फ् फ् फ् मिश्रित असतें. थंडी-मुळें सारखे कुडकुडत असल्यामुळें तोंड पूर्णपणें उघडण्याकडे त्यांची प्रवृत्ति नसते. कांहीं कांहीं गावढळ लोकांच्या बोलण्यात प वर्ग येत नाहीं ह्याचें कारण काय ? हवेमुळें त्याना तोंड मिटता येत नाहीं. तोंड सारखें उघडेंच ठेवतात. आणि औष्ठ्यवर्ण तर ओठ जवळ जवळ आणल्या खेरीज उच्चारले जात नाहींत. कांहीं मारवाडी देशावर येतात. त्याच्यापैकीं बहुतेकाना 'र' म्हणता येत नाहीं. ह्याचें कारण 'र' उच्चारण्यास जी एक मुखातील स्नायूची विशेष हालचाल लागते ती त्याना त्याच्या देशातील हवेमुळें करता येत नाहीं. कांहीं गुजराथी ब्राह्मण पाणी भरण्यासाठीं दक्षिणेंत येतात. त्याना 'च' उच्चारता येत नाहीं. जेथें जेथें 'च' येतो तेथें त्याचा उच्चार ते 'स' करतात. 'चाकवत' शब्द असेल तर ते 'साकवत' म्हणतील. घाटावरचा मनुष्य तर सहज ओळखला जातो. त्याच्या बोलण्यात अशी एक गोच असते कीं, ती कांहीं केल्या झाकली जात नाहीं. आवे, चाल्ले, ( कानले ), दाणे, इत्यादि, घावण, वाल्याव, मन—चहिण—असे कांहीं उच्चारण्याचे निरनिराळे प्रकार आहेत. हवेनें किंवा भौगोलिक परिस्थितीनें केलेले भाषेवर परिणाम आणखी पुष्कळ ठिकाणीं दृग्गोचर होतात. डोंगराळ प्रदेशात राहणाऱ्या लोकामध्यें 'त'वर्गातील कठोर व्यञ्जनाचा भरणा जास्त सापडतो. नैदामध्यें किंवा समुद्राच्या आसपास राहणाऱ्या लोकामध्यें दन्त्य व्यजनें सापडतात. नद्यांच्या किंवा डोंगराच्या योगानें हवामानामध्ये फार फरक होतात व त्याबरोबर भाषेमध्येंही होतात. ह्याचीं चांगलीं उदाहरणें म्हणजे युरोपमध्यें आस्ट्रिया—हंगेरी आणि आपल्या इकडे नेपाळ हे दोन देश होत. नेपाळ हिमाद्रीच्या पायथ्याशीं आहे. व त्यामध्यें लहान मोठे टेंकडयावजा पर्वत पुष्कळच आहेत. त्यामुळें ह्या एवढ्याशा प्रदेशात कमींत कमी ३६ निरनिराळे भाषेचे प्रकार आहेत. ह्यापैकीं कांहीं प्रकाराचे आणि दक्षिणे कडील द्राविडी भाषेचें बरेंच साम्य आहे व त्याचीं कारणेंही निराळी आहेत. हंगेरीमध्यें भाषेंतच नव्हे तर इतर सर्व बाबतींत इतका कांहीं विविधपणा भरला आहे कीं त्यास एक लहानसें जग म्हणणेंच यथार्थ होईल. इतक्या निराळ्या धर्मांचें आणि पंथाचें, निराळ्या भाषांचें,

निराळ्या जातींच्या लोकांचें एक राष्ट्र बनलें कसें हें एक कोडेंच आहे आणि परवांच्या युद्धाच्यावेळीं इंग्रेजींचे पाय प्रथम गळले म्हणावें तरी कारण हें वैचित्र्यच असावें असो सध्या आपणास येवढेंच पाहणें आहे कीं डोंगर, नद्या यामुळें इवेवर परिणाम होतात आणि त्यामुळें भाषेवरही होऊं शकतात. असे फरक फार प्राचीनकाळीं संस्कृत भाषेमध्यें घडून आलेले दिसतात. पाणिनीच्या अष्टाध्यायींतील धातु पाठामध्यें दोन प्रकारचे धातु सांपडतात कुड्–कुण्ड्, चप्–चम्प् बद्–बन्द्, शुध्–शुन्ध्, डप्–डम्प इत्यादि धातु समानार्थीच आहेत यावरून अनुमान एकच निघतें—पाणिनीनें ज्या संस्कृत भाषेचें व्याकरण लिहिलें ती संस्कृत भाषा बोलणाऱ्या लोकांमध्यें दोन जाती असल्या पाहिजेत हवेच्या योगानें एका जातीच्या बोलण्यात सानुनासिकत्व आलें आणि दुसऱ्या जातीच्या बोलण्यात तें आलें नाहीं

कांहीं वेळेस असें होतें कीं दुसऱ्या जातीच्या किंवा भाषेच्या लोकांशीं संबंध आल्यामुळें शब्दांच्या मूळ उच्चारांत फरक होतो आर्यलोक हिंदुस्थानांत आले त्यांचे स्वत चे कांहीं वर्णोच्चार होते त्यांचा एतद्देशीय भिल्ल, कोंड, द्रविड इत्यादि जातींच्या लोकांशीं संबंध आला आणि त्यामुळें पुष्कळ शब्दांचा अपभ्रंश विचित्र उच्चारांत होऊं लागला ते अपभ्रंश दुसऱ्यांनीं तर वापरलेच, पण खुद्द आर्यांनीं मनांत कांहीं किंतु न धरतां त्या अपभ्रंश उच्चारांना आपलेसे केलें आर्यांची संस्कृति जबरदस्त तर होतीच व तीमुळें भिल्ल वगैरे लोकांना मुकाट्यानें त्यांच्या पुढें मान वाकवावी लागली व भाषेमध्यें फारसा फरक झाला नाहीं मूळच्या लोकांच्या भाषेच्या संसर्गानें पूर्वींच्या आर्य भाषेंत नसलेले सर्व 'मूर्धन्य' उच्चार आले व आर्य भाषेंत इतर वर्गांतील उच्चाराबरोबरचें स्थानही पटकावून बसले वेदामध्यें 'प्रउग' 'तितऊ'सारखे देशी शब्द किंवा पाणिनीच्या अष्टाध्यायींत जो एक निराळाच वर्ग त्याला बनवावा लागला आहे व ज्याची शास्त्रीय उपपत्ति 'पृषोदर' वगैरे प्रकरणांतील सूत्र बांधून लावावी लागली ते सर्व शब्द अनार्यांच्या भाषेशीं आलेल्या संसर्गाचें फळ आहे सध्यासुद्धा हा प्रकार चालू आहे संस्कृत भाषा जिला म्हणतात तीसुद्धा वारंवार अपभ्रष्ट होत आहे. ही बोली असतांना स्वरोच्चारामध्यें

वर्णत्याग—वर्णागम—वर्णविपर्यय इत्यादि प्रकार होत असत. स्कध—कध—खादा. स्पश—पश, स्था—उत्था पाणिनी ह्या सर्वांना मुलोप म्हणेल. परतु हा वर्णत्याग आहे आणि त्याला कारण उच्चारणाऱ्या लोकांचा आळस किंवा निष्काळजीपणा होय.

दुसऱ्या सस्कृतीच्या लोकांशीं सबध आला म्हणजे त्यांच्या भाषेंतील शब्द सर येतातच पण उच्चारही केवळ त्याच्या अनुकरणानें भाषेमध्यें येतात शब्दाचा एक साधारण सहज असा उच्चार असतो आणि त्या भाषेंत जन्मलेल्या लोकाना तो उच्चार सहज अकृत्रिम रीतीनें करता येतो, परतु तोच उच्चार जर परभाषेच्या अवास्थात दुर्दैवान आला तर त्याचा सहजपणा नाहींसा होतो व त्याच्या ऐवजीं कृत्रिमपणा येतो 'हैद्राबाद' हा साधा उच्चार आहे परतु इग्रजाच्या अनुकरणान त्याचा, हैद्राबाद असा होतो. 'मद्रास' ह्या शब्दाच्या उच्चाराची सीव गत खडकी जाऊन त्या ऐवजीं त्याचा उच्चार 'करकी' होतो 'वडोदरा' उच्चार जाऊन 'बडोदा' येतो व काहीं दिवसानीं तोही जाऊन बॅरोडा—ब्यारोडा उच्चार त्याची जागा पटकावितात खानदेशी लोक 'स' बद्दल 'ह' घालतात किंवा सुरतेचे गुजराथीही 'स'बद्दल 'ह' वापरतात ह्याचें कारण होषाबाहीं भिल्लाच्या भाषेशीं सबध येतो हें होय

काहीं यजुर्वेदीय ब्राह्मणात अद्यापि देखील 'न' चा 'ण' करणें आणि 'ण' चा 'न' उच्चार करणें हें शुद्ध म्हणून समजतात मराठ्याची स्थितिही अशीच समस्त अक्षरें व्यस्त करणें, स्वर दीर्घाचा ऱ्हस्व किंवा ऱ्हस्वाचा दीर्घ करणें, उच्चार सौकर्याकरता कोणत्याही दिशेनें प्रयत्न करणें इत्यादींकडे बोलणाऱ्याची प्रवृत्ति असते ह्या प्रवृत्तींचें बीज कशात आहे ? मनुष्यामध्यें " श्रम होताहोईलतों कमी करावयाचे " ही एक प्रवृत्ति आहे ह्या प्रवृत्तींतच त्याचें बीज आहे एकाद्या व्यक्तीच्या किंवा समाजाच्या भाषेंत सापडारे फरक आपणास इवेकडेही लावता येणार नाहींत, किंवा जातीजातीच्या मिलाफामुळें ते होतात असेंही आपणास म्हणता येणार नाहीं त्या फरकाचें कारण जरा त्याच्या पलीकडे आहे. मनुष्याच्या मेंदूच्या विशिष्ट भागात अदृश्य हालचाल होत असते. त्यामुळें मुखातील अवयवावर परिणाम होतो व त्यामुळें वर्णोच्चारामध्यें फरक झालेला आपणास आढळन

येतो. कांहीं लोकांना 'र' म्हणता येत नाहीं, त्याबद्दल ते 'य' म्हणतात. कांहींना 'क' वर्ग म्हणता येत नाहीं. त्याबद्दल ते 'ट' वर्गाचा उच्चार करतात. आणि मजा ही कीं त्या व्यक्तीला स्वतः आपण 'क' वा 'ट' उच्चार करतों हें समजत नाहीं. त्याची ही खात्री असते कीं, आपण वर्णोच्चार बरोबर केला. ऐकणारास तर 'ट' ऐकूं येतो. मुखांतील अवयवाची हालचाल ही 'ट' ला योग्य अशीच असते. पण खुद्द त्या व्यक्तीला तिचा पत्ता नसतो. आपण उच्चार बरोबर केला ह्याच समाधानांत तो असतो. मेंदूच्या विशिष्ट भागांत झालेल्या फेरानें उच्चारांत फरक पडल्याची ह्याच्याशिवाय दुसरींही कांहीं स्पष्ट उदाहरणें आहेत. वरील उच्चारांतील फरक त्याच कारणानें पडतो एवढें ध्यानांत ठेवलें पाहिजे. दारू वगैरे कांहीं मादक पदार्थ घेतला म्हणजे अमल चढतो आणि मेंदूच्या नेहमींच्या व्यवहारांत भयकर उत्पात होतात व दुसऱ्यास भोंवणारी कृत्यें त्या अमलाखालीं असलेल्या मनुष्याच्या हातां-तोंडाकडून केलीं जातात. चांगला सभ्य व सुबोध बोलणारा मनुष्य जरी असला तरी जर तो घोड्यावर असेल तर त्याचें एकदर देहमान जाऊन कांहीं अनन्वित कृत्यें तो करील. त्याचें नेहमींचें बोलणें तेंच बरळणें होतें. त्याच्या बरळण्यांतून एकही शब्द नीट ऐकूं येत नाहीं.—नीट समजत नाहीं.—नीट उच्चारला जात नाहीं. दुसरें उदाहरण झोंपेंत बरळणाऱ्या माणसाचें. ह्याचाही मेंदू ठिकाणावर नसल्यामुळें वर्णांच्या उच्चारांत फरक आढळून येतो. त्याप्रमाणें वेड्या मनुष्याचें. कधीं कधीं चांगल्या मनुष्याचेंही असें होतें. समजा कीं, एकादा मनुष्य वर दिलेल्या कोणत्याही सदरांत येत नाहीं तरी पण अन्य कारणानें त्याचा मेंदू ठिकाणावरून नाहींसा होऊन त्याच्या वर्णोच्चारामध्यें बिघाड होतो. आपलें देहमान जरी आपल्या जवळ असलें तरी आपण नेहमीं शुद्धीवर असतोंच असें नाहीं. कधीं एकाद्या विचारामध्यें गर्क असतों. किंवा कधीं एकाद्या आकस्मिक दुःखाच्या आघातानें इतके निश्चित पडतों कीं भोंवतालच्या परिस्थितीबद्दल इतकीही शुद्ध आपणास नसते. अशा स्थितींत कधीं कधीं वर्णोच्चारांत फरक पडण्याचा संभव असतो. भीतीनें गांगरून जाऊन आपली बोबडी वळते. तेव्हां तर उच्चारांत कितीं तरी फरक पडतात. अर्धांग वाताचा झटका

आला म्हणजे मेंदूच्या विशिष्ट भागात कायमपणा रहात नाहीं. आणि त्यावा व उच्चारास उपयोगी पडणाऱ्या मुखातील अवयवांचा संबंध आल्यामुळें वर्णोच्चारातही कायमपणा रहात नाहीं. आजारामध्यें होणाऱ्या घातात किंवा दातखिळी बसून वर्णोच्चाराच्या शक्तीचा ऱ्हास होतो त्याची ही उपपत्ति असीच.

ह्या कारणानें एकदर मार्गेत काहीं फारसा फरक पडत नाहीं व त्या दृष्टीनें त्याचें महत्त्वही फारसें नाहीं. तरी पण वर्णोच्चारातील फरकाचें सें एक कारण आहे हें विसरता कामा नये

आतापर्यंत फरक होण्याचीं तीन कारणें सांगितलीं त्यावरून लक्षात आलें असेल कीं स्वर प्रक्रियेमध्यें दोन प्रकार असू शकतात त्यापैकीं एक तर आपणास उघडच दिसतो. मुखातील वर्णोच्चाराच्या अवयवाच्या विशिष्ट हालचालींत बिघाड झाला म्हणजे उच्चारात बिघाड होतो दुसरा प्रकार जरी आपणास दिसत नाहीं तरी कमी महत्त्वाचा नाहीं. ज्या ज्या वेळेस आपण शब्दोच्चार किंवा वर्णोच्चार करतों त्या त्या वेळेस मुखाच्या स्नायूमध्यें जशी हालचाल होते तशीच आतर (मानस शास्त्राच्या) सृष्टींत सुरू होते. व ह्या अंत सृष्टींतील हालचालीमुळे देखील स्वरोच्चारामध्यें फरक होतात

फरक होण्यास परिस्थिति काय असावी लागते व फरकाचे प्रकार किती हे झाल्यानंतर त्यापैकीं काहीं विशिष्ट आणि प्रमुख कोणते हा साहजिकच प्रश्न येतो. त्याला उत्तर देण्यापूर्वी एक दोन गोष्टींचा खुलासा करणें भाग आहे.

भाषा बोलताना बोलण्याची गति असते व ती सर्वांची सारखी नसते कोणी जलद बोलतात, तें इतकें कीं ऐकणारास आपली गति त्यांच्या बरोबर ठेवण्यास फार कठीण होतें काहीं लोक सावकाश बोलतात व त्याबद्दल त्यांना जन्मभरीत सजा मिळते दोन्ही.ी अवगुणच. भाषाशास्त्राच्या दृष्टीनें दुसरा म्हणजे सावकाश बोलणें हा काहीं इतका अवगुण समजला जाणार नाहीं. परंतु घाईनें बोलणें हा मात्र अवगुण समजला पाहिजे, कारण घाईनें बोलणाऱ्या लोकांना बोलतां बोलतां पुष्कळ शब्द खाण्याची सवय असते जसें काहीं एकादें कुत्रें मार्गें

लागल्याप्रमाणें हे सारखे पडत असतात. पळतां पळतां . पायांतला जोडा किंवा डोक्यावरची टोपी पडली तरी त्यांचें त्यांना भान नसतें. तद्वतच कांहीं पुढच्या मागच्या शब्दांचा लोप झाला तरी त्याकडे त्यांचें लक्ष नसतें. बोलतांना झालेल्या घाईनें होतें काय, तर प्रत्येक शब्दाचा अथवा वर्णाचा अवयव उच्चारण्यास जितका वेळ मिळावयास पाहिजे तितका न मिळाल्यामुळें हा सर्व घोंटाळा उडतो. घाईघाईत शब्दाचे कांहीं अवयव स्पष्ट उच्चारले जात नाहीत. कांहींचा लोप होतो; कांहीं पुढचे मागें व मागचे पुढें असा विपर्यय होतो. जोडाक्षर किंवा त्या सारखेंच उच्चारण्यास कठीण अक्षर उच्चारण्यास कांहीं श्रम करावे लागतात. आणि श्रम होतां होईलतों कमी करावयाचे ही तर प्रवृत्ति. उच्चार सुकर करण्यास एखादा वर्ण त्यामध्यें घालावा लागतो.

मराठीमध्यें ऋ आणि ऌ खेरीज करून संस्कृतचे सर्व स्वर आहेत. एखादा शब्द जसाचा तसा संस्कृतमधून आला तर ऋ आणि ऌ स्वर मराठीमध्यें त्या स्वरापुरते येतात. आतां त्या स्वरांत फरक काय होतात तें पाहूं.

जोडाक्षराच्या पूर्वींचा 'अ' दीर्घ होतो. काव्यामध्येंही मात्रा मोजतांना हा नियम 'अ' संबंधानेंच नव्हे तर इतर सर्व स्वरांना दीर्घ मानतांना गुरु धरतात. जोडाक्षर विभक्त होतें त्यावेळेस स्वरागम होतो. उदाहरण—अन्त्र=आतडें; कृत्ति=कातडें; 'अ'-चा कधीं 'इ' होतो. क्षणभर खिणभर.

'इ' आणि 'उ'चा 'ए' आणि 'ओ' होतो=सिंदुर—शेंदूर; मिथुन—मेहुण, पुस्तक—पोथी, तुण्ड=तोंड इत्यादि.

दीर्घ 'ई' आणि 'ऊ' ऱ्हस्व होतात. उच्चारणारे लोक ऐदी असल्यामुळें रोजच्या व्यवहारांत भाषा बोलतांना शक्य तितके श्रम कमी करणें हेंच ध्येय असल्यामुळें उच्चारामध्यें दीर्घांचे ऱ्हस्व तर नेहमींच होतें. संस्कृतमधील प्लुत उच्चार तर पार नाहींसा झाला आहे. 'ई' आणि 'ऊ' कधीं कधीं 'ए' आणि 'ओ' होतात. ताम्बूल—तांबोळी; 'अ' आणि 'ई' व 'अ' आणि 'ऊ' मिळून ऐ आणि औ होतात.

मलीन—मैल; महिषी—म्हैस; बलीवर्द—बैल.

स्वरागम—पातळ–पाताळ, कीर्ति–किरत, बगाळ.

स्वरत्याग=अरण्य–रान, अरघट्ट=रहाट, अभ्यंतर–भींतरीं, आगमानें येणारा स्वर कधीं प्रथम येतो तर कधीं मध्यें येतो. आरबी आणि फारशी भाषेंत हा स्वर प्रथम येतो. स्कूल–इस्कूल, इस्क्रू, स्त्री–अस्तुरी.

शब्दामध्यें हा फरक भाषेच्या पहिल्या पहिल्या दिवसांतही होत असला पाहिजे, कारण हा फरक आपल्या इकडील प्राचीन व्याकरण-कारांना कळला होता. यास्काचार्यांनीं या फरकावर कांहीं पानें खर्ची घातलीं आहेत. याला स्वरभक्ति म्हणत असत. इन्द्र शब्दाचें इंदर, 'ब्राह्मण' चें 'बिरामण' 'प्रकार' चें 'परकार', 'भस्मन्' चें 'भसम' 'विप्र'चें 'विपर' अथवा इपर, 'मद्र'चें 'मदर' इत्यादि सर्व स्वरभक्तीचीं उदाहरणें होत.

शब्दाच्या अंतीही स्वरागम होतो, पण तो अन्त्य स्वराच्या जातीचाच असतो. नामाच्या संबुद्ध स्वरूपामध्यें हा प्रकार आढळतो. 'राम' याचें संबोधन रामा. शेवटचा उच्चार प्लुत केला पाहिजे. इकारान्त शब्दाला शेवटीं 'आ' आगम होतो, हरि चें हरे किंवा हऱ्या. हे आपणास विजातीय स्वर आलेसे दिसतात पण खरे ते विजातीय नसून एकमेकांचे ऱ्हस्व किंवा दीर्घ होत. स्पष्ट सांगावयाचें म्हणजे 'गुणवृद्धि' फरकानें ते बद्ध झालेले आहेत.

गुण आणि वृद्धि हे स्वरप्रक्रियेंतील अतिशय महत्त्वाचे फरक आहेत. खुद्द पाणिनी आचार्यांना या चमत्काराच्या खऱ्या कारणाचा उलगडा झाला नाहीं. त्यांनीं नुसतें "वृद्धिरादैच्" असें सूत्र बांधून आपल्या कार्यास आरंभ केला. पण कारणमीमांसा केली नाहीं. प्रसिद्ध संशोधना-चार्य आणि वैयाकरणी राजवाडे यांनीं आपल्या "गुण आणि वृद्धि" या निबंधात त्यासंबंधावर जास्त प्रकाश पाडला आहे. स्वराचे वेदपूर्वकालीन उच्चार काय होते, त्यामध्यें पाणिनीय कालापर्यंत कसे कसे व काय काय फरक पडत गेले व सध्या प्रचलित असलेल्या उच्चारामध्यें व त्यामध्यें कितपत साम्य व तफावत आहे हें त्यांनीं आपल्या निबंधात उत्तम रीतीनें दाखविलें आहे. स्वरोच्चारामध्यें गुणवृद्धि व तद्विरुद्ध संप्रसारण रूपानें ज्याप्रमाणें इकडील भाषामध्यें फरक होतात त्याप्रमाणें तिकडील

रोमॅन्स भाषांमध्यें ही होतात. नांवांत फक्त भेद. परिणामांत नाहीं. आपण ज्यांना गुणवृद्धि, संप्रसारण म्हणतों तर ते त्यांना Dipthong, Ablant, Umlaut, अशीं नांवें देतात. गुण, वृद्धि, संप्रसारण, इत्यादि फरक येण्याची पात्रता अ, इ, उ, ( ऋ आणि लृ ) ह्या स्वरांत आहे. इत्यार्थे—येथें; 'भिन्द'चें 'भेण्ड'; 'तुण्ड'चें 'तोण्ड'; 'मुण्ड'चें 'मोण्ड'—यांत होणें ह्या उर्वांत व अन्याय इतर शब्दांत गुणवृद्धींचें प्राधान्य दिसून येतें. गुणवृद्धीच्या नंतर स्वरसंबंधी दुसरी महत्त्वाची प्रक्रिया संधीच्या रूपानें दृष्टीस पडते. राजकारणांत Mandate म्हणून एका ह्या अर्थी एक शब्द रूढ आहे. एकाद्या मोठ्या राष्ट्राचा Mandate खालीं दुसरें लहानसें राष्ट्र सांपडलें म्हणजे त्याचें स्वत्व नाहींसें होतें. त्याला त्याचें स्वातंत्र्य उरत नाहीं. त्याचप्रमाणें संधीच्या बाबतींत स्वरांची स्थिति आहे. एक मोठा जबरदस्त स्वर असतो. त्याच्या Mandte सत्तेखालीं दुसरा स्वर सांपडतो आणि आपलें सर्वस्व गमावून बसतो. त्या मोठ्या स्वरूपांत आपलें स्वरूप विलीन करून टाकतो किंवा जरा धडपडण्याचें सामर्थ्य असलेंच तर त्या परिस्थितीच्या उभारांत थोडासा फरक करतो. स्वराचा काय किंवा व्यंजनाचा काय संधि करणें म्हणजे स्वर व्यस्त उच्चारण्यानें जे काहीं अडथळे होतात ते दूर करणें होय. कोणीकडून तरी उच्चार सोपा झाला म्हणजे झालें, स्वरसंधि सर्व मार्गेत आहेत. प्रत्यक्ष गुण, वृद्धि, Diptnong, Ablant, Umlaut हे सर्व कोणत्याना कोणत्याप्रकारचे स्वरसंधिच होत. संधीस निरनिराळीं नांवें मिळालीं एवढेंच. संधीमुळें कधीं कधीं वर्ण एका प्रकारांतून दुसऱ्या प्रकारांत उलट सुलट उड्या घेतात स्वरांचीं व्यंजनें व व्यंजनाचे स्वर होतात. त्यांच्यांतल्या त्यांत एकमेकांचा शेजार एकमेकांना भोंवतो. ह्याचें उत्तम उदाहरण व्यंजन संधींत मिळतें. एकाच शब्दांत र् किंवा ष् च्या पुढें न् आला तर ण् करावा. " रषाभ्या नो णः समानपदे " असें सूत्र बांधून पाणिनीनें त्याची वासलात लावली. विसर्गाच्या पुढें त्, थ्, द्, ध्, किंवा च्, छ् आले तर विसर्गामध्यें असेच फरक होतात. कधीं एक वर्ण दुसऱ्यास खाऊन टाकतो आणि झालेलें नुकसान अन्यत्र आपल्या पाठीमागून येणारा स्वर दीर्घ करण्यानें भरून काढतो. 'र्' च्या पुढें र् आला तर एक दुसऱ्यास

खाऊन टाकतो आणि पाठीमागचा स्वर दीर्घ होतो. 'तक्र'चें ताक, 'अग्नि'चें आग ह्या नियमानें होतात. उच्चार सोपा करावयाचा हा हेतु. तो तरी श्रम जितके वांचतील अशा रीतीनें साधावयाचा. हीच प्रवृत्ति सर्व फरकाच्या मुळाशीं सांपडेल.

बोलण्याच्या गडबडींत स्वर जातातच, पण त्याबरोबर व्यंजनांचाही लोप होतो. संस्कृतांत गण, प्रत्यय, इत्यादिकांचें प्राबल्य जास्त असल्यामुळें हा प्रकार चांगला पाहाण्यास मिळतो. मराठींत तसें विशेषसें नाहीं. हाच शब्द पहा—'विशेषसा.' ह्यामध्यें दोन शब्द आहेत. 'विशेष' एक आणि 'असा' दुसरा. ह्यांत 'अ'चा लोप झाला आहे. "गेलों होतों" असे दोन पृथक् शब्द असतां घाईंत पुष्कळ लोक दोन्ही पूर्ण उच्चारीत नाहींत. "गेल्तों" असें त्याचें रूप होतें, गुरें-राखी ह्या दोन शब्दांबद्दल गुराखी हा एक शब्दच रूढ होतो सुके-केळें ह्याबद्दल सुकेळें असा एकच शब्द येतो. ह्या संबंधांत मजेचें उदाहरण मुलांच्या खेळण्यांत दिसून येतें. "काळे राळे गोरे राळे" असा एक शब्दसमुच्चय मुलांनीं तयार केला आहे, किंवा आज कित्येक पिढ्यानुपिढ्या चालत आलेला आहे. मुलें आपल्या सोबत्यास हा शब्दसमुच्चय म्हणावयास सांगतात आणि तो फार घाईंत म्हणावयाचा असतो तेव्हां म्हणणाऱ्याची जी कांहीं त्रेधा उडते व त्यामुळें इतर मुलांमध्यें जो कांहीं हशा पिकतो तो कांहीं विचारूच नये. 'ळ'च्या जागीं 'र', 'र'च्या 'ळ' किंवा सर्वच 'ळ' किंवा सर्वच 'र' अशी विचित्र वर्णपरंपरा घाईंत बाहेर पडते. बोलण्यांत जर घाई केली तर उच्चाराच्या दृष्टीनें अनर्थवर्णपरंपरा कशी होते त्याची ह्या उदाहरणावरून कल्पना येईल. कधीं वर्ण विपर्यय-पुढचा मागें किंवा मागचा पुढें अशी स्थिति होते फाटक-फाकट, चिकटणें चिटकणें, डोमकें—डोकमें, वाणारशी—वाराणशी, इत्यादि पुढच्या परिशिष्टांत आणखीं उदाहरणें आणखी दिलीं आहेत.

तोंडांतून वाजवीपेक्षां जास्त जर वारा गेला तर वर्णोच्चारांत फरक होतो. आपण बाहेरील हवा आंत घेतों आणि सोडतों हवा आंत जी घेतों ती बाहेर येतच असते, पण बाहेर येतांना तिचा उपयोग करून घ्यावयाचा असतो. व तो निरनिराळे स्वर काढण्यांत करून घेतां येतो.

प्रत्येक वर्णोच्चाराच्या वेळीं हवा सारखीच बाहेर पडत नाहीं. प्रत्येक वर्णोच्चाराला निरनिराळें हवेचें प्रमाण लागतें. कठोर व्यंजनांस कमी, मृदु व्यंजनास त्या त्याच्यापेक्षां जास्त, त्याच्यापेक्षां सघोष व्यंजनास जास्त हवा लागते व त्याप्रमाणें ते उच्चारतांना फुफ्फुसास लागून असलेली पोकळी लहान मोठी होत असते. ती पोकळी केवळ बोलणाऱ्याच्या लहरीप्रमाणें अवास्तव रीतीनें कमी अधिक होऊं म्हणेल तर वर्णोच्चारामध्ये बिघाड झाल्यावांचून राहणार नाहीं. " ढोधा " शब्द उच्चारतांना बेताची हवा बाहेर सोडावयाची तिच्यापेक्षां जर जास्त सोडली तर 'ढोधा' शब्द बाहेर पडेल व अर्थाचा अनर्थ होईल. मागें दीर्घाचें ऱ्हस्व करण्याचा एक प्रकार दिला आहे. त्याच्या अगदीं उलट हा प्रकार आहे. उच्चार 'उ' असेल आणि जर जास्त वारा सोडला तर त्या 'उ' चा दीर्घ 'ऊ' किंवा त्याचाही दीर्घ 'ओ' उच्चार बाहेर पडेल.

शब्द काय किंवा वाक्य काय प्रत्येकाला त्याच्या उच्चाराच्या दृष्टीनें एक " तोल " असतो. आणि उच्चारतांना तो तोल सांभाळावा लागतो. तोल सावरून धरण्यासाठीं कधीं कधीं तराजूमधील जास्त वजन काढावें लागतें किंवा तो बरोबर येण्यासाठीं जास्त वजन घालावें लागतें. कोणी कडून तरी काटा मध्यें राहिला कीं काम झालें. म्हणजे वर्णोच्चार नीट केल्याचें श्रेय मिळतें. आगम कसा करतात हें पुढील उदाहरणावरून कळून येईलच, उ —तुमुल—तुम्बळ, कमल—कम्बळ, वानर—वान्दर, फक—फकस्त; शिवस्न—इत्यादि.

वर्णोच्चारातील फरकाचा व त्याच्या कारणाचा येथपर्यंत विचार झाला. स्वरप्रक्रिया व व्यंजनप्रक्रिया हे दोन विषय अतिशय निगडीत आहेत स्वरप्रक्रियेस फारसें ऐतिहासिक महत्त्व दिलें जात नाहीं. तें व्यंजन-प्रक्रियेस देतात. आर्यभाषा जर एक आणि ती जर दोन्ही पौर्वात्य आणि पाश्चिमात्य भाषांची जननी समजावयाची तर एका भाषेंत 'फ' व्यंजन सांपडतें, त्याचेंच दुसऱ्या भाषेंत 'प' रूप होतें. त्याचप्रमाणें 'त्'चें ह् किंवा द् व 'व्'चें भ्, किंवा प् होतें ह्याचीं कारणें आणि स्वरप्रक्रियेचीं कारणें एकच आहेत. व्यंजनाच्या फरकाच्या बाबतींत अमका एक फरक केव्हां पासून होऊं लागला हें साधारण ढोबळ मानानें सांगता येतें. स्वर व्या

स्थानापासून निघतात त्या स्थानाचा दोनदा भ्रश झाला' असें पाश्चात्य भाषेत मानतात. ग्रिम्मनें शोधून काढलेला नियम, त्याच्यात व्हरनीयरनें केलेली दुरुस्ति, संस्कृतामध्यें 'क' वर्गाबद्दल 'च' वर्ग अभ्यासात येणें व त्याचा 'इ' वगैरे स्वरांशीं संबंध (Palatal Law), त्याचप्रमाणें पॉटनें काढलेला मूर्धन्यावद्दलचा नियम वगैरे सर्व नियम sound-shifting वर अवलंबून आहेत.

भाषेच्या एकंदर वाबतींत कालवशात् इतके जर फरक होतात व फरक होणें हा जर भाषेचा खरा जिवतपणा आहे तर एक हजार वर्षांपूर्वीची भाषा अमकी हीच असें निश्चयानें कसें सांगता येणार ! कोणतीही भाषा घ्या. तिच्या मूळ स्वरूपात स्वरप्रक्रिया, शब्द, वाक्यरचना, किंवा विशिष्ट शब्दक्रम-निरनिराळे प्रत्यय ह्या सर्वांमध्यें स्थिर, कायमचें असें जर कांहीं रहात नाहीं तर ती भाषा अमक्या इसकापासून सुरू झाली असें तरी कसें म्हणता येईल ! भाषा ओळखता यावयाची नाहीं एवढीच आपत्ति येऊन थांबणार नाहीं तर कांहीं वर्षांपूर्वींचा जुना लेख आज कळणार नाहीं. असें झालें तर कोणत्याही राष्ट्राजवळ फारसा जुना असा इतिहास सांपडणार नाहीं जुनें म्हणून कांहीं मिळावयाचें नाहीं. मिळालें तरी समजावयाचें नाहीं. मध्य अमेरिकेमध्यें अशी एक भाषा आहे असें म्हणतात. तिचा तपास कांहीं पाद्री लोकांनीं लावला आहे. ती भाषा इतकी बदलत जाते कीं गेल्या पिढींतील मनुष्यानें केलेलें व्याकरण वर्तमान पिढीतील माणसास कुचकामाचें ठरतें. या विधानांत थोडीशी अतिशयोक्ति असावी समजा एका कुटुंबामध्यें आजा, बाप, नातू अशा तीन पिढ्या आहेत. भाषा जर इतकी चंचल समजली तर प्रसंग हा ओढवेल कीं, आजाची भाषा नातवास समजावयाची नाहीं व उलट याची त्याला समजणार नाहीं आजाच्या किंवा नातवाच्या मनांतील भाव एकमेकास व्यक्त करण्याकरता परंपराप्राप्त भाषा सोडून देऊन दुसऱ्या नेत्रपल्लवी अथवा करपल्लवी भाषेचा आश्रय करावा लागेल. मध्य अमेरिकेंतील ह्या भाषेचें उदाहरण एका टोकाचें झालें फरक भाषेत होतात हें खरें पण कांहीं स्थळें अशीं असतात कीं, तीं अगदीं निश्चल राहून केवळ त्याच्या अस्तित्वावरूनच ती ही हीच अशी भाषेसंबंधीं खात्री देता येते.

कांहीं वेळेस असें होतें कीं, भाषेचीं निरनिराळीं अंगें, उपांगें असतात त्यांतील एकांत जर फरक झाले तर दुसरें उपांग अगदीं स्थिर असतें. त्याच्यांत जर वचलल आलें तर तिसरें स्थिर राहतें. स्वराच्या उच्चारांत जर फरक झाले तर शब्दांत कांहीं होणार नाहींत. शब्दांत जर झाले तर वाक्यरचना किंवा प्रत्यय जसेचे तसे राहतील. ते हलले तर स्वर आपले उच्चार बदलणार नाहींत शिमी (Semitic) भाषेंतील कांहीं कंठ्य स्वरांचा असीरियन म्हणून (Non-Semitic) भाषेशीं संबंध आल्यामुळें लोप झाला, त्याला ४००० वर्षें झालीं. परंतु अरबी भाषेमध्यें ते अद्याप सांपडतात. ह्या कारणावर भाषेचें स्थैर्य ठरवितांना फारसा भर देऊन चालत नाहीं. भाषा शिष्टसंमत किंवा ग्रांथिक झाली म्हणजे किंवा व्याकरणानें तिची एकंदर हालचाल बांधून टाकली म्हणजेच स्थिर राहते. बोलींमध्यें ग्रांथिकापेक्षां जास्त फरक होतात. ह्याचें चांगलें उदाहरण म्हणजे संस्कृत भाषेचें. वेदांची भाषा इतकी जुनी जरी असली तरी तिला ग्रांथिक स्वरूप प्राप्त झाल्यामुळें तिच्यामध्यें आणि हजारों वर्षांनीं तिच्यापासून दूर असलेल्या लौकिक (Classical) संस्कृतमध्यें इतकें भिन्नत्व दिसत नाहीं.

भाषा म्हणजे एक सामाजिक संस्था आहे. समाजाचें जें आचरण, जी वागण्याची तऱ्हा, सवयी, रूढी ती सर्व भाषेंत चित्रित झालीच पाहिजेत. समाज कितीही सुधारक असला तरी त्याच्या जीवनक्रमांत घरणीकंपाप्रमाणें अनपेक्षित, अचाट व विचित्र असे फरक होत नाहींत फरक होतात ते आस्ते आस्ते होतात, आणि समाज कितीही सुधारणेच्छु असला तरी सुधारणा करतांना मार्गांत प्रतिबंध न येतील अशा रीतीनें कोणाच्याही स्वास्थ्यास धक्का न देता, औषधाची कडु गोळी तर द्यावयाची पण तीच जरा साखरेंत घोळून द्यावयाची, अशा रीतीनें आपल्या जीवनचरित्रांत—सवयींत फरक घडवून आणतो व ह्यामुळें भाषेंत त्या सर्वांचें प्रतिबिंब पडतें म्हणून भाषेची स्थिति हीच. एस्किमो लोकांची भाषा अतिस्थिर आहे, ह्याचें कारण हेंच, कीं त्याच्या जीवनक्रमाचा जो एक किता एकदां घातला आहे तोच पुनः पुनः गिरवाटण्यांत त्यांना फार प्रेम वाटतें, व थोडेसें सुद्धां त्यापासून बाजूस जाणें त्यांच्या स्वभावास खपत नाहीं.

दुसरी गोष्ट अशी कीं, एकादी भाषा घेतली तर तिच्या पोटभाषा पुष्कळ असतात. त्या सर्वांतील मध्यवर्ती जी असेल तिच्यात फरक होत नाहीत. दुसऱ्या भाषेशीं किंवा संस्कृतीशीं संबंध आला म्हणजे फरक होण्यास मदत होते. मध्यवर्ती भाषेचा तसा संबंध येत नाही व त्यामुळें तिच्यात फरकही होत नाहीत. काहीं वर्षांपूर्वी पैठणच्या मराठीस किंवा सध्या पुण्याच्या मराठीस ' नमुनेदार ' मराठी म्हणतात तें, यामुळेंच. पुण्याच्या मराठीच्या चारी बाजूस मराठीच बोलणाऱ्याचा गराडा असल्यामुळें तिच्यात फारसे फरक होत नाहीत. तीच गोष्ट नागपुरी मराठीची किंवा खानदेशी मराठीची नाहीं. कारण हिंदी आणि गुजराथी तिला शाहारण्याकरता जवळी टपून बसल्या आहेत. भाषेपासून पोटभाषा उत्पन्न होणें याचें मूळ कारण वर्णप्रक्रियाच होय.

---

## प्रकरण ७ वें.

—०:—

## शब्द–अर्थ प्रक्रिया.

भाषेचा मूळ घटक शब्द कोशात यणारा शब्दच. व्याकरणाचा प्रपंच शब्दाचाच भाषेंत शब्दाशिवाय काहीं दुसरें सापडणार नाहीं फरक होणार तो शब्दातच. अर्थ समजतो तो शब्दाच्या साहाय्यानें. खुणानीं परिपूर्ण अशी स्पष्टवी किंवा नेत्रस्पर्शी भाषेची असदानी संपल्यानंतर शब्दाची भाषा सुरू होते कोणताही शब्द ध्वनि–समुहाचा बनलेला असतो. ध्वनि उत्पन्न करण्यात मुखातील स्नायूंचा संबंध येतो. ध्वनीमध्यें स्नायूंच्या हालचालीनें फरक होतात. शब्दाच्या ध्वनींत किंवा आवाजात होणारे फरक बाह्य स्वरूपाचे असतात. बाह्य स्वरूपातील फेरबदलाचा विचार " स्वरप्रक्रिया " सदराखाली येतो. स्वरप्रक्रिया केवळ शब्दाच्या अवय

बात दिसून येते. मानसशास्त्रात सांगितलेल्या मनाच्या क्रियेचा तेथें संबंध येत नाहीं. कोणताही शब्द आपण जेव्हा उच्चारतों तेव्हा बाहेरच्या मुखातील स्नायूंच्या हालचालींबरोबर आत मनामध्यें हालचाल होते. प्रथम मानसशास्त्राच्या नियमाप्रमाणें चळवळ सुरू होते त्याचा आपणास माग मूसही नसतो, पण त्याचा परिणाम मात्र दिसून येतो. अमूक एका शब्दाला अमूक अर्थ समजावा असा संकेत मानसशास्त्राच्या नियमानेंच होतो शब्द आणि तन्निर्दर्शक अर्थ ह्यांचें साहचर्य आत मनास किंवा बुद्धीस प्रतीत होतें. व ज्याप्रमाणें मुखातील स्नायूंवर नाना प्रकारचीं कारणें आपला प्रभाव चालवितात तद्वत मानसशास्त्रप्रधान भाग, उ मन किंवा बुद्धि ह्यावर कोणत्या तरी कारणाचा प्रभाव चालतो व वरील कारणानें ज्याप्रमाणें शब्दाच्या उच्चारात फरक होतो व त्यायोगे माषा, उपभाषा, प्रांतिक भेद उत्पन्न होतात, तद्वत ह्या मानसशास्त्राच्या प्रदेशात झालेल्या फरकानीं शब्दाच्या अर्थांत विकृति होते फरक इतके होतात कीं, कांहीं शब्दाचे अर्थ मूळ अर्थाच्या अगदीं विरोधी बनतात शब्दाच्या बाह्य स्वरूपातील फरक इंद्रियविज्ञान किंवा ध्वनिशास्त्राच्या कोटींत जातात तसे अर्थांतील फरक मानसशास्त्राच्या कोटींत येतात.

शब्दाचें महत्त्व मार्गेत किती तरी आहे शब्द आहेत तर भाषा आहे. शब्द मात्र सार्थ पाहिजेत अर्थाशिवाय जर शब्द असतील तर ते भाषा होऊ शकत नाहींत, नुसते ध्वनि होतील. नुसत्या उच्चारास कोण महत्त्व देतो ? उच्चारात अर्थ असतो म्हणून त्याला महत्त्व उच्चाराला अगदींच महत्त्व नाहीं किंवा भाषेत त्याला कांहींच किंमत नाहीं असा अर्थ नाहीं. अर्थाचें वाहन म्हणून उच्चारास मानावयाचें व त्याच दृष्टीनें त्याचें महत्त्व अभिप्रेत अर्थ एकाच्या म्हणजे बोलणाऱ्याच्या मुखापासून ऐकणाऱ्याच्या कानापर्यंत मार्ग आक्रमण करीतोंपर्यंत उच्चार वाहन म्हणून बसतो ध्वनीस किंवा शब्दास बुद्ध लोक अनित्य समजतात तें ह्या मुळेंच एवढेंच नव्हे तर प्रत्येक क्षणाक्षणास एक ध्वनि नाश पावतो आणि त्याच्या जागेवर दुसरा उत्पन्न होतो व तो तिसऱ्यास उत्पन्न करतो अशा तऱ्हेनें ते प्रत्येक क्षणीं शब्दाची उत्पत्ति व त्याचा विध्वंस मानतात, उच्चार जरी नाहींसा होतो तरी त्यानें आणलेला अर्थ आपला बरोबर ठसा ऐकणाऱ्याच्या बुद्धीवर काय

मचा उठवितो. मीमांसक शब्द जो नित्य मानतात तें वेदाच्या पावित्र्यामुळें व वेदाशीं असलेल्या त्याच्या समानार्थकत्वाच्यामुळें तर खरेंच परंतु त्या त्यांच्या मनात हीही एक गर्भित गोष्ट असावीशी वाटते. तें कांहीही असो. शब्दाला अर्थ वाहण्याची पात्रता असते म्हणूनच त्याला मान, नाहीं तर वेड्याचें किंवा दारूच्या किंवा तसल्याच एखाद्या पदार्थाच्या अमला खालीं असलेल्या माणसाचें बरळणें, त्याला कोणीही किंमत देत नाहीं. कारण त्याचा उपयोग काय ? तात्त्विक दृष्टीनें रामानुजी विशिष्टाद्वैती लोक ह्या बरळण्यातही परमार्थ भाषा आहे असें समजून सत्यत्व प्रस्थापित करूं लागतील पण आपणास त्याकडे वेदाच्या दृष्टीनें पाहावयाचें नाहीं.

शब्दाचे अर्थांच्या दृष्टीनें तीन प्रकार ठरतात. कांहीं शब्दाचा अर्थ रूढीनें कायमचा ठरविलेला असतो त्याना रूढ असें म्हणतात उदाहरणार्थ गो, अश्व, कर्ण वगैरे शब्द. कांहीं शब्द असे असतात कीं, त्याचा अर्थ त्यांच्यातील धातूच्या व्युत्पत्तीच्या अर्थाप्रमाणें असतो त्याना यौगिक असें म्हणतात ते शब्द म्हणजे पाचक, लोहार, विणकरी असले होत. तिसऱ्या वर्गांत हीं दोन्ही तत्त्वें येतात. त्या शब्दाच्या अर्थांत व्युत्पत्ति किंवा धात्वर्थ आणि रूढीन त्याच्यावर लादलेला अर्थ हे दोन्ही दिसून येतात उदाहरणार्थ पङ्कज, साप. ह्याना योगरूढ असें नाव देण्यात येतें. ह्या तिन्हीशिवाय नैयायिकानीं आणखी एक चौथा प्रकार मानला आहे. त्यामध्यें " उद्भिद " सारख्या शब्दाचा समावेश त्यानीं केला आहे व त्याना नाव यौगिकरूढ म्हणून दिलं आहे व्युत्पत्ति देणं किंवा काढण्याचा प्रयत्न करणें म्हणजे शहाण्या लोकाच्या बुद्धीचे खेळ आहेत खरा ह्या सर्व प्रकारात स्वतंत्र असा एकच प्रकार राहतो व तो रूढ शब्दाचा होय बाकी राहिलेल्या सर्व प्रकारात व्युत्पत्तीचा संबंध येतो तेव्हा असले शब्द उत्पन्न करणें न करणें व्याकरणकाराच्या किंवा व्युत्पत्तिशास्त्रविशारदाच्या ताब्यात जाऊन बसत धातूना किंवा नामाना प्रत्यय लावून वाक्यात त्याना एकमेकाशीं जोडून अर्थाची उभारणी ज्या प्रमाणें करतात तद्वतच ह्या शब्दाचें आहे. प्रत्यय व धात्वर्थ ह्याची जोड घालून शब्दाला अर्थ द्यावयाचा 'पंक' शब्द रूढ वर्गांतला आहे त्यापुढें एक 'ज' हा धात्ववशेष ठेवला म्हणजे 'कमळ' ह्या अर्थी एक निराळा शब्द तयार होतो अशा

रीतीनें तयार झालेला अर्थ केवळ रूढ शब्दाच्या साहाय्यानें सांगता येईल. पण हें जितकें थोडक्यात झालें तेवढ्यात होणार नाहीं. रूढ शब्दांत देखील व्युत्पत्ति - पाहावयाची कीं नाहीं हा निराळाच मुद्दा आहे व त्याचें विवेचन व त्याचा निरुक्तांत आलेला उल्लेख हे इतरत्र दिलेच आहे.

भाषेची उत्पत्ति सांगताना ध्वनींच्या नाना प्रकारांवर निरनिराळे अर्थ कसे लादले जातात हें सांगितलेंच आहे वस्तू वस्तूमधील साम्य, वैषम्य, अनुकरण, काहीं तरी विशिष्ट गुण वगैरे काहीं मुद्दे आहेत व त्यामुळेंच शब्दावर अमूक एक अर्थ लादला जातो. शब्द ध्वनींच्या रूपानें व्यक्त होईंतोंपर्यंत मानसशास्त्राच्या ताब्यात असतो व मनात किंवा बुद्धीच्या क्षेत्रात मोठी खळबळ उडवून देतो. आपली गडबड दृष्टीच्या समोर होत नस त्यामुळें ह्या विषयाकडे विद्वानांचें जितकें लक्ष्य जावयास पाहिजे तितकें गेलें नाहीं. भाषेच्या स्वरप्रक्रियेनेंच सर्व भाषाशास्त्रवेत्यांचीं मनें व्याक्षेप करून घेतलीं होती. आपल्याकडे आचार्य पतंजलीच्या व्याकरण-महाभाष्यांत शब्दाचा आणि शब्दाच्या अर्थाचा बराच विचार केला आहे. आपणास उपयोगीं आहे तेवढेंच त्यांतील शब्दावरचें त्यांनीं केलेलें व्याख्यान देतों. "त्यांनीं शब्दाच्या दोन जाती मानल्या आहेत एक वेदांतील शब्द व दुसरे भाषेंतील लोकांच्या व्यवहारांतील शब्द. शब्द म्हणजे काय ? उदाहरणार्थ, "बैल" असं म्हटलें तर बोध काय होतो ? वशिंड, शिंगें, कान, चार पाय असलेला एक पदार्थ–प्राणी म्हणजे शब्द अशी जर त्याची व्याख्या केली तर ती कोणासही पटणार नाहीं. कारण त्या वर्णनाचा पदार्थ "शब्द" नसून तो एक पदार्थ आहे. त्याचें हालणें, चालणें, मान हालवणें वगैरेंना जर आपण बैल शब्द मानू लागलों तर तेंही चालावयाचें नाहीं, कारण त्या सर्व क्रिया आहेत त्याचप्रमाणें गुणाबद्दल. ह्यापैकीं कोणासही शब्द म्हणता येणार नाहीं तर मग शब्द कोणता ? व शब्द कशास म्हणावें ? जो उच्चारल्यानंतर आपणास वशिंड, शिंगें, कान, शेपूट वगैरे अवयव असणाऱ्या प्राण्याची कल्पना एकदम उभी राहाते त्या उच्चारास शब्द म्हणावें किंवा उच्चारानंतर काहीं स्वर उत्पन्न होतात, त्या स्वराच्या एकीभवनानें जर एखाद्या पदार्थाची, अथवा क्रियेची किंवा गुणाची इत्यादिकांची प्रतीति झाली, जर त्यापैकीं

एकादी कल्पना मनश्चक्षूपुढें तावडतोब उभी राहिली तर त्या उच्चारास अथवा त्या स्वरास शब्द म्हणावें. शब्दाला म्हणजे वर्णांची अपेक्षा असते अशी काहीं गोष्ट नाहीं. स्वर, व्यंजनें ह्यांच्या मिश्रणानें शब्द बनतो हें खरें, पण त्यांच्याशिवाय बनणारच नाहीं असें नाहीं. एका लांब एकतानी सुरास सुद्धा " शब्द " म्हणता येईल. गाय हंबरते. तिचा भाव तिच्या वासरास प्रतीत होतो. तर त्या हंबरण्यासही शब्द म्हणतां येईल. घोड्यापुढें त्याचा मालक गेला म्हणजे दाण्याच्या अपेक्षेनें तो घोडा फुरफुरतो. त्या फुरफुरण्यात व्यंजनें अथवा स्वर कोठें असतात ? पण ज्याअर्थी घोड्याची खाण्याबद्दलची प्रबल इच्छा मालकास प्रतीत होते त्याअर्थी त्याला ' शब्द ' म्हणता येईल. शब्द म्हणजे स्वर अथवा स्वरसंयोग. शब्दशास्त्राच्या अभ्यासाचा उपयोग काय ? उपयुक्ततेच्या दृष्टीनें त्या अभ्यासांत काहीं तथ्य आहे किंवा कसें ? फायदे बरेच आहेत. पहिला आपलें जुनें वाङ्मय तोंडी असो अथवा लेखी असो, तें राखलें जातें. त्याचा नाश होत नाहीं. कारण शब्दाच्या साम्राज्यात सापडल्यामुळें त्याची चांगली काळजी घेतली जाते. काहीं काहीं शब्दाचा अर्थ जर पटत नसला तर त्यांमध्ये फरक करता येतो. त्रास बराच वाचतो. अर्थाबद्दल खात्री होते. बुकींचे शब्द धान्यातून खड्यासारखे बाहेर काढता येतात. शब्द काय दाखवितो ? सर्व जाती दाखवितो, किंवा जातींतील शब्द दाखवितो; खरें पाहिलें तर शब्द दोन्ही दाखवितो, जाती व जातींतील व्यक्तीही. एवढेंच नव्हे, शब्दाची व्याप्ति इतकी आहे कीं, त्यामध्यें सात खंडाची पृथ्वी, तिन्ही लोक, चारवेद, यजुर्वेदाच्या शंभर शाखा, सामवेदाच्या शंभर, अथर्ववेद, सूत्रें, ब्राह्मण इत्यादि इत्यादि सर्वांचा अंतर्भाव होतो. "

शब्दासंबधीं पातंजल महाभाष्यात आलेली कल्पना वर दिली आहे. ती आणि काहीं पाश्चात्यांची शब्दाची कल्पना बऱ्याच जवळ जवळ येतात. त्यांच्या मतें आपल्या मनात पदार्थांबद्दल ज्या काहीं कल्पना किंवा जे काहीं विचार येतात ते व्यक्त होतात ते शब्दाच्या रूपात होतात. तेव्हा शब्द म्हणजे वर्ण समुच्चय केवळ नव्हे तर कधीं कधीं एका स्वरास शब्द म्हणावें लागेल. कधीं कधीं शब्दसमुच्चय, एकाद्या वर्णावरचा आघात, आवाजातील विराम ह्या सर्वांना " शब्द " ह्या संज्ञेनें संबोधलें पाहिजे. वर दिलेल्या भाष्यातील

शब्दारच्या व्याख्यानात ज्या रीतीनें विचार केला आहे. तो घेऊन आपणास जरा निराळ्या रीतीनें शब्द व अर्थ ह्यांच्या साहचर्याचा विचार करावयाचा आहे. शब्दाची व वस्तूची जी आपण सांगड घालतों ती समाजाच्या संकेतानेंच घालतों हे खरें पण तोच संकेत करताना क्रिया कशाप्रकारची होते हें पाहणें मोठें मनोरंजक आहे. प्रत्येक उत्पन्न झालेल्या व माणसाशीं संबंध आलेल्या वस्तूला तद्दर्शक स्वरव्यंजनमिश्रित ध्वनि पाहिजे त्याच्याशिवाय व्यवहार शक्य होत नाहीं व अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे प्रत्येक वस्तुदर्शक शब्दात त्याला अन्वयर्थक धातू असलाच पाहिजे असें नाहीं आचार्य यास्कानीं असाच कोटिक्रम केला आहे व तो ह्याच बाबतींत थोडासा लगडा वाटतो गवत ह्याअर्थी 'तृण' शब्द आहे. गवताची काडी टोंचते म्हणून तसल्या काडीस 'तृण' ही संज्ञा आली स्थाणु म्हणजे खांब उभा राहण्याची कल्पना आहे म्हणून व खांब उभा राहतो म्हणून त्याला स्थाणु म्हणावयाचें अशा सन्देचे धातू हुडकावयाचे म्हटलें तरी प्रत्येक शब्दात धातू सापडेलच असें नाहीं धातू पुष्कळात सापडतील, नाहीं असें नाहीं परतु काहीं थोडे जरी राहिले तरी वरील सिद्धांताच्या विरुद्ध पुरावा देण्यास पुरे होतील शिवाय ह्यात दुसरी एक गोम आहे ती ही कीं, टोंचते म्हणून जर काडीला 'तृण' म्हणावयाचें तर दुसऱ्या पुष्कळ तसल्याच अणकुचीदार टोंचणाऱ्या वस्तू सापडतील त्याना 'तृण' ह्या शब्दानें का संबोधावयाचें नाहीं ? व एक काडी अणुकुचीदार असेल व तिला 'तृण' हें नावही सार्थ होईल पण सर्वच तृण टोंचणारें कोठें असतें ? खांब उभा राहतो म्हणून स्थाणु म्हणावयाचें तर माणूस जर उभा राहिला तर त्याला स्थाणु का म्हणू नये ? अचल उभ्या स्थितींत राहणाऱ्या वस्तू थोड्या का आहेत ? व त्या सर्वांना स्थाणु म्हणावयाचें कीं काय ? ह्यावरून "संकेत" म्हणून मान्य करावा लागेल व काहीं शब्द अव्युत्पाद्य ठरणारच मुख्य गोष्ट एवढीच ध्यानात ठेवावयाची कीं, वस्तूला अन्वर्थक नाव देण्याच्या वेळेस वस्तूतील मुख्य गुण प्रामुख्यान डोळ्यापुढ उभा राहतो व दिलेल्या नावात त्याचा ठसा उमटतो नामकरणाच्या वेळेस नाव म्हणजे सर्वच बाजूनीं सार्थ असत असं नाहीं व विशेषनामात तर ही विसंगतता फार दिसून येते. नाहीं तर "नाव सोनी व हातीं कथलाचा वाळा" अशी

म्हण पडली नसती. दिवा शब्द घेतला. दिपवणारी, उजेड पाडणारी (दीप्–प्रकाशने) तीच एक वस्तू नव्हे. सूर्य, अग्नि, चंद्र हे तेजाचे प्रचंड गोल असतांना व दिपवण्याची किंवा उजेड पाडण्याची त्यांच्यामध्यें शक्ति असतांना त्यांना कोणी " दिवा " म्हणत नाहीं. बरें, दिवा तरी नेहमीं प्रकाश देतो असे नाहीं. दिवा मालविल्यावर प्रकाश कोठे असतो ? व तशा स्थितींतही दिव्याला दिवा म्हणतात. तेव्हा एकाद्या शब्दांत अन्वर्थक धातू सांपडला तरी त्या अर्थाप्रमाणे त्याच्यांत गुणाचें वास्तव्य असतेंच असें नाहीं व म्हणूनच एवढ्यापुरतें का होईना शब्दावरचा संकेत कबूल केला पाहिजे. ह्या उदाहरणांवरून भाषेत थोडासा उणेपणा असतो हें दिसतें. शब्द व अर्थ यांचें साहचर्य कितीही जुळविण्याचा प्रयत्न केला तरी ततोतंत तें साहचर्य कांहीं जुळत नाहीं. शब्द म्हणजे अर्थाला किंवा त्याच्याही पलीकडच्या विचाराला अडकविलेल्या खुणा आहेत. त्या खुणावरून वस्तूचा बोध करून घ्यावयाचा असतो. कधीं त्या खुणा कमी पडतात व कधीं जास्त होतात. व्याकरणांतील सामान्य जातीचीं जेवढीं नामें म्हणून आहेत त्याची ही स्थिति. " भाव " वाचकनामें त्यातल्यात्यात निनचूक अर्थ दाखवितात. पृथ्वी म्हणजे विस्तार असलेली. कांहीं दृष्टीनें ' पृथ्वी ' शब्दात अव्याप्ति किंवा अतिव्याप्ति दिसेल; परंतु ' पृथ्वीत्व ' म्हटलें म्हणजे त्यांत व्याप्ति बरोबर असते. नैय्यायिक आपल्या ग्रंथात व्याख्या देताना वस्तुदर्शक शब्दाचे भाववाचक नामच योजतात व त्याचा उद्देश हाच म्हणजे अव्याप्ति व अतिव्याप्ति टाळण्याचा असतो. गाईस गाय तिच्या स्वरूपामुळेंच म्हणावयाचें असें नाहीं तर गायपणा तिच्यात आहे म्हणून म्हणावयाचें, असाच भाव पुढील वाक्यांत दिसून येतो, " न हि गौः स्वरूपेण गौर्नाप्यगौः, गोत्वाभिसंबधात्तु गौः "

शब्द व अर्थ याची सांगड अशा उघड व सरळ रीतीनें घातली म्हणजे शब्दाला एक प्रकारची वृत्ति प्राप्त होते व तिलाच आलंकारिक " अभिधा " वृत्ति म्हणतात. अर्थाच्या दृष्टीनें आद्य शब्द अभिधावृत्ति-मयच असले पाहिजेत. परंतु भाषा काय किंवा तद्‌घटक शब्द काय त्यांना मानवसमाजाच्या कह्यात वागावें लागतें. मनुष्यस्वभाव असा आहे कीं, तो दोन गोष्टींची तुलना करीत असतो. वस्तूंवस्तूतील साम्य-

समनाय-संबंध तुटवून काढीत असतात व ह्या प्रयत्नानेंच निराळे शब्द तयार होतात. मूळची सरळ व प्रत्यक्ष अशी जी शब्दाची अभिधावृत्ति ती नाहींशी होते आणि तिच्या जागीं 'लक्षणा' म्हणून निराळीच एक वृत्ति अथवा शक्ति येते. शब्दाचा मूळ अर्थ असतोच पण तत्सदृश दुसऱ्या अर्थाची व त्या शब्दाची सांगड बांधतात व तो मूळ शब्द लाक्षणिक बनतो. शब्दाच्या लक्षणावृत्तीच्या मुळाशीं अभिधाशक्ति असते. सरळ अर्थ कांहीं वेळेस कमी पडतो, त्यास बाध येतो, मुख्यार्थानें कल्पना जर बरोबर समजली गेली नाहीं तर ती समजण्यासाठीं त्या मुख्यार्थालाच संलग्न असा रूढीनें मान्य केलेला व कांहीं तरी जास्त गुण दाखविणारा जो अर्थ घ्यावा लागतो त्यालाच लाक्षणिक अर्थ समजतात. मुख्यार्थ व लाक्षणिक अर्थ ह्यामध्यें साम्य व नातें पुष्कळ असतें. अर्थाची पूर्तता करण्यासाठीं शब्दाचा मूळ अर्थ कधीं कधीं सोडावा लागतो व दुसरा अर्थ घ्यावा लागतो. "कुशल" शब्द घेतला. कुश-ल म्हणजे कुश ह्या नांवाचें गवत चांगल्या तऱ्हेनें तोडणारा, हा त्याचा मूळ अर्थ पार कोठें नाहींसा झाला कोण जाणे. हल्लीं तो शब्द "तरबेज" ह्या अर्थी समजला जातो. तसेंच संस्कृतमधील दुसरें उदाहरण—गंगायां घोषः—गंगेवरची गवळ्याची वस्ति, गौळवाडा, गंगेच्या पाण्यावर वस्ति करणें अशक्य आहे. तेव्हां "गंगायां" ह्याचा सरळ अर्थ सोडलाच पाहिजे व तात्पर्यार्थास जुळणारा दुसरा अर्थ घेतला पाहिजे. "सभेत चार पांच डोकीं होतीं" यांत नुसत्या 'डोकीं' शब्दाला काय अर्थ आहे ? खालच्या धडाशिवाय डोकें असणें शक्य नाहीं. तेव्हां "डोकें" शब्दाच्या मूळ अर्थांत तात्पर्यासाठीं दुसऱ्या अर्थांची भर टाकावी लागते.

अभिधाशक्तीचा थोडासा प्रदेश सोडून दिला तर भाषेंतील सर्व प्रांत लक्षणेनें व्यापला आहे. लक्षणेचें प्राबल्य भाषेंत विलक्षण असतें. कधीं कधीं लक्षणेवर पुन्हा लक्षणा लादतात. आद्य मानवाच्या ताब्यातील भाषेचा झुळझुळ वाहणारा पहिला ओघ लक्षणेमुळेंच विराट-स्वरूप धारण करतो. भाषेची व्याप्ति लक्षणेनें वाढते. अलंकारातील रूपकक्रिया जी आहे ती बऱ्याच अर्थी लक्षणाक्रियाच असते. रूपकावर रूपक पुन्हा त्याच्यावर रूपक अशीं भाषेंत शब्दाच्या व अर्थांच्या

मानतात सारखी घडामोड चालू असते. वस्तू डोळ्यापुढे दिसल्याबरोबर तिच्यातील एखादा गुण प्रामुख्याने माणसाची दृष्टि आपल्याकडे ओढून घेतो मनुष्यही त्याच्या परिचयातल्या वस्तूशीं तिचा संबंध लावण्याचा प्रयत्न करतो हेतु हा कीं, परिचयातील गोष्टींशीं तिचा एकदा संबंध जोडला म्हणजे त्या नव्या वस्तूची विस्मृति पडू नये साम्य हुडकून काढण्याची व तदनुरूप नामकरण करण्याची क्रिया एका क्षणात होते. कांहीं दिवस नव नामाभिधान रूपकस्थितींत किंवा लक्षणास्थितीत राहतें व त्याचा प्रघात सारखा चालू असल्यावर, त्याचा बोलण्यांत सराव झाल्यावर त्या लक्षणेची लक्षणा म्हणून मूळ प्रकृति नाहींशी होते आपण म्हणजे लाक्षणिक अर्थ बोलतो आहोंत असें आपणास वाटत नाहीं इतका सहज तो कारभार होऊन जातो रूपकयोजना किंवा लक्षणायोजना सर्व भाषांत सारखी चाललेली असते. रानटी समाजाची भाषा जरी घतली तरी कोणत्याना कोणत्या रूपानें लाक्षणिक अर्थाचे शब्द तिच्यात असणारच भाषेची ही लक्षणासंपत्ति भाषेच्या सुधारणेबरोबर वाढत जाते. शब्दांत किंवा भाषेत लाक्षणिक अर्थ बोलण्याची कितपत व कशाप्रकारची शक्ति आहे ह्यावरुन भाषा बोलणाऱ्या लोकांची बुद्धिमत्ताही अजमावता येते लाक्षणिक अर्थ किंवा रूपक एकाच मार्गानें येतात असें नाहीं प्रत्येक धंदेवाल्याची निराळीच भाषा असते त्या त्या धंद्याचे निरनिराळे रूपक–प्रधान शब्द बनतात. "त्यानें त्याची खूब कणिक तिंबली" हें वाक्य त्यानें त्याला मारलें ह्या अर्थी आहे, पण "कणिक तिंबणें" ही सूपशास्त्रातील क्रिया आहे, कुंभाराची "मडकें मडवण्याची" क्रिया दुसरीकडे लाक्षणिक अर्थानें घतली आहे एखादी गोष्ट याला अधिकाऱ्यानें केली म्हणजे तिजविषयीं कुरकुर रहात नाहीं, एतदर्थदर्शक "माळाराने कान टोंचले म्हणजे चालते" हा वाक्प्रचार चालू आहे. कुंभारापासून "कुंभाराची सून" व ती केव्हातरी उजाडल्यावर येणारच कोणीही दडवून चालावयाचं नाहीं, उघडकीस आल्याशिवाय रहाणार नाहीं, एतदर्थी रूढ आहे. "कारकुनासारखा का सारखे कागद घासतोस" हें त्या कारकुनाच्या पेशावरुन उचललें आहे.

कधीं कधीं एखादा शब्द सबंध इतिहासाच्या इतिहास पुढें उभा करतो. अमका एक कर्ण, जमदग्नि, भीम, दुर्योधन आहे असें आपण म्हणतों, त्या वेळेस त्या पुराणप्रसिद्ध व्यक्तींचे गुण समोरच्या व्यक्तींत अगदीं थोड्या प्रमाणानें का होईना असतात हीच कल्पना मूळ असते. ह्याच प्रकारचे पुष्कळ शब्द आहेत उदाहरणार्थ ' सिंह ', शिवाजीचा ' तानाजी ', गडाचा 'सिंह', 'गुरुाचार्य', असे पुष्कळ प्रयोग आपण वापरतों व त्या वेळेस मूळ अभिधार्थाचा सोडून देऊन दुसऱ्या अर्थाचा अवलंब करतों. कधीं आपल्या शरीराच्या अवयवाचे शब्दप्रयोग ह्याच अर्थानें वापरतों. नाक म्हणजे शरीराचा प्रमुख अवयव. ' पुणें महाराष्ट्राचें नाक आहे. " नाकाच्या सुस्थितीवर जसें शरीराचें सौंदर्य अवलंबून असतें तसें पुण्याच्या सुस्थितीवर महाराष्ट्राचें सौंदर्य आहे. " तानाजी शिवाजीचा उजवा हात होता. " उजव्या हाताचें ज्याप्रमाणें शरीरास महत्त्व तसें तानाजीचें महत्त्व शिवाजीस वाटत असे. तोंड माणसास असतें. पण लक्षणेनें घराचें तोंड , फणसाचें तोंड, बाटलीचें तोंड इत्यादि प्रयोग वापरतों. कधीं सजीव मनुष्य प्राण्याच्या भावना, कल्पना, क्रिया, हालचाल वगैरे इतर प्राण्यांना किंवा निर्जीव प्राण्यांना लावतों किंवा उलट त्यांच्या क्रिया आपणास लावतो- " डोंगर कसा टधकारतो " "आम्रवृक्ष आपणास जसा काहीं बोलावतो ', "शेत आम्हास जेवू घालतें" इत्यादि प्रयोग आपण वापरतो, " टधकारणें, बोलावणें, जेवू घालणें " इत्यादि क्रिया सजीव प्राण्यांच्या बाबतींतच शक्य आहेत. पण कधीं कळत, कधीं न कळत, सहज आपण त्यांचा उपयोग करतों. " पाषाणास काहीं पाझर फुटत नाहीं, तो मनुष्य अगदीं ठोंब्या, दगड आहे. " वगैरे उलट तऱ्हेनेंही आपण शब्दप्रयोग करतों. मनुष्यास जर दया येत नसली तर पाषाण म्हणतों. पाझर फुटणें म्हणजे दया येणें, उत्पन्न होणें. ' पाझर फुटणें ' ह्यात लक्षणा आहे. पाझर ह्यांत पाण्यास फुटतो ' फुटत ' ह्या शब्दांतही लक्षणा आहे. " फुटत " म्हणजे स्पष्ट नजरेस पडत ( स्फुट पासून ). " दया येणें ' हाही लाक्षणिक प्रयोग आहे. ' येणें जाणें सजीव माणसाच्या संबंधानें वापरतात, तेव्हां दयेवर सजीवत्वाचा आरोप केला आहे. मागील वाक्यांतील " प्रयोग व आरोप " हे शब्द लक्षणायुक्त

आहेत कसें तें पहा प्रयोग-प्रयुज्-एकास एक मिश्रविणें ह्या अर्थी आहे आरोप-ह्यात रुह धातूचा प्रयोजक उपयोग आहे रुह् म्हणजे उगवणें, रोपय म्हणजे लावणें, हा झाडाझुडपासंबंधीं प्रयोग आहे पण त्याची योजना वरील अर्थानें करतों फार लाव वसाला ? शेवटचा "करतो" हा शब्दही लाक्षणिक आहे ' करण " ह्या क्रियापदाला नेहमीं कांहीं तरी उपादान कारण लागतें उपादान कारणासह जी क्रिया तिला ' करणें " क्रियापद लावायचें, पण सर्व ठिकाणीं उपादान कारण आहे कीं नाहीं ह्याचा कोण विचार करतो ?

"विचार" शब्दाची तीच गत "चर्" म्हणजे हालणें, विचार म्हणजे हालणार्‍या सजीव अशा प्राण्यासंबंधीं आपण वापरतों पण त्याचें भिन्न रूप करून "विचार" शब्द बुद्धीशीं जोडला गेला मीं "विचार केला" ह्यात नीट पाहिलें असता सर्वच शब्द लाक्षणिक आहेत. आणखी कांहीं प्रकारचा उदाहरण देतो तो ' साडू ' आहे. माणसाची त्याला काय "किंमत" ? त्यानं व्यूह ' रचला " त्याचा व्यूह "ढास-ळला " गोष्टीचा ' थांग " लागत नाहीं. चोराचा " थांग " समुद्राचा "थांग" निघत नाहीं तो ' टेंभा ' मिरवितो त्याची "पळी" ठमलली, त्याच तोंड "फुलें." तोंड "कामेपल" दिव्यांनीं रस्ते "फुलले" इत्यादि इत्यादि वरील प्रयोगात अवतरणात दिलेले सर्व शब्द लाक्षणिक आहेत आणखी हे पुष्कळ वाढविता येतील.

शब्दात लक्षणा इतकी कांहीं दडून बसते किंवा इतका कांहीं दोघाचा एकजीव होतो कीं साध्या अनभिज्ञ माणसाच्या नजरेस अगदीं येत नाहीं शब्दाचें मूळ स्वरूप व त्यावर लक्षणेनें लादलेला भार हुडकून काढण्यास चांगलाच व्युत्पत्तिशास्त्रज्ञ माणूस लागतो व नुसता व्युत्पन्न असून चालत नाहीं तर त्याला इतिहास पुराण, ग्रंथ इत्यादिकांची मागलीच माहिती असावी लागते भाषेच्या वापरात लक्षणेची कामगिरी मोठी आहे भाषेच्या आद्य स्वरूपात भाषा म्हणजे केवळ अस्थिमय सापळ्याप्रमाणें असते तिच्यात मांस रुधिर वगैर घालून तिला गुटगुटित आकार देण्याची कामगिरी लक्षणा करते भाषेच्या व्यवहारात लक्षणेच्या वर लक्षणेचे थर पडतात जमिनींतील थरावर थर पडलेले जातीमनार स्पष्ट

घरण जसें भूगर्भ शास्त्रेत्त्याशिवाय होत नाहीं, तसेंच लक्षणेचे घर इति हासाशिवाय स्पष्ट केले जाणार नाहींत. भाषेतील सर्व अलंकार लक्षणेवर उभारलेले आहेत. दुसरे कोणी आलंकारिक अतिशयोक्ति भाषेच्या मुळाशीं ठेवतात हें खरें आहे. पण अतिशयोक्तीच्या मुळाशीं सुद्धा लक्षणा असते. अभिधा, लक्षणा ह्या दोन शक्तींसारखीच शब्दाची तिसरी एक शक्ति आहे. तिला "व्यंजना" म्हणतात ही शक्ति काव्याचा आत्मा समजतात. काव्य व्यंग्यार्थप्रधान असलें तरच त्यात विशेष गोडी आहे आणखी काहीं शब्दाच्या शक्ति-अर्थ दर्शविण्याचे प्रकार खाली सांगता त्याचें आणि व्यंजनाशक्तीचें वरच साम्य आढळून येईल. खालीं येणारे प्रकार एकएकट्या शब्दाच्या अर्थांत क्रिया इच्छेत होणाऱ्या चमत्कारा पैकीं आहेत व व्यंजनाशक्तीचा त्या वेळेस आपण विचार करता त्या वेळेस संयोग, विप्रयोग, साहचर्य, विरोधिता, अर्थ, प्रकरण, लिंग, सांनिध्य ह्यापैकीं कोणत्या तरी का होईना, सवधानें निगडित झालेल्या इतर शब्दाचा विचार करावयाचा असतो. एकएकट्या शब्दाचा ह्यापैकीं कोणत्याही गोष्टीशीं जसा संबंध येईल तसा सांगण्यात येईल.

मनुष्याचा स्वभावच असा आहे कीं, वाईट असेल तें टाळावयाचें आणि चांगलें असेल तेवढेंच जवळ करावयाचें वाईटास चांगला पोषाख चढवून त्याचा वाईटपणा होताहोईतों कमी करण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति असते. वाईटाचा उच्चार करणेंसुद्धा सभ्यतेच्या विरुद्ध होते समाजात सभ्यतेचे नियम पाळावे लागतात. तेव्हा सभ्यतेस पोषकच बोलावे लागतें गोष्ट खरी जरी असली तरी तिच्या मूळ भेसूर, अपथ्य स्वरूपात सांगितली किंवा उच्चार केला तर कानाला, जिभेला किंवा मनाला चरचरीत लागते. तशी चरचरीत लागू नये म्हणून प्रिय भाषेंत सांगावी लागते. औषध कडू तर असतेच पण दिलें तर पाहिजेच. तेव्हा कडूपणा कमी करण्या साठीं साखरेत घोळून, तिचीं पुटें चढविलीं म्हणजे काम होते. उदाह रणार्थ, "पडणें." कोणी मोठा मनुष्य घोड्यावरून पडला म्हणून "रावसाहेब पडले" असें कोणी म्हणत नाहीं तर "रावसाहेब घोड्यावरून खालीं आले" असें म्हणतात. दुसरें तसलेंच उदाहरण "मरणें" ह्या क्रियापदाचें. मरणाची बातमी वाईट, पण सांगितली

पाहिजे. ' अमका तमका मेला " म्हणणें कांहीं चुकत नाहीं पण थोडेसें असभ्य, ग्राम्य मात्र समजलें जाईल. तेंच सांगणें झालें तर " अमका निवर्तला, अमक्यास देवाज्ञा झाली, अमका स्वर्गवासी किंवा वैकुंठवासी झाला " इत्यादि तीच वाईट बातमी सांगण्याचे सभ्य प्रकार आहेत. मोठ्या मनुष्यानें चुकी-घोडचुकी केली तरी त्यांची एक नजरचूक अथवा भूल झाली असें म्हणतात. " दिवा घालविणें किंवा मालविणें " म्हणणें सभ्य समजत नाहींत. " दिवा थोर करणें; दिव्याला निरोप देणें " हीं वाक्यें त्याच्यापेक्षां जास्त सभ्य आहेत; तसेंच कुंकवाच्या करंड्यातील कुंकू संपलें असलें तर चांगल्या घरंदाज सुवासिनी " कुंकू संपलें " असें कधींहि म्हणणार नाहींत हातातील बांगडी फुटली असेल तर ' बांगडी फुटली " असें कधींहि म्हणणार नाहींत, तर त्याबद्दल " कुंकू वाढलें " " बांगडी वाढली " असें म्हणतील. " शौच " शब्द तसाच आहे. मूळचा त्याचा अर्थ स्वच्छता; पण सध्या आपण तो शब्द कोणत्या अर्थानें वापरतों हें सर्वांना माहीत आहेच.

कधीं कधीं कालांतरानें आपोआपच एखाद्या ग्राम्य शब्दाचा ग्राम्यपणा नाहींसा होतो. अर्थाकडे बारकाईनें पाहिलें तर सभ्य, शिष्ट माणसाच्या तोंडांतून उच्चारले जाऊं नयेत असे ते शब्द असतात. पण रोजच्या उपयोगांत आल्यामुळें त्यांच्या मूळच्या ग्राम्य स्वरूपाकडे कोणी नजर देत नाहीं. " गुलाम, भोसडीचा, भांचोद, मादरचोद " हे व असलेच शब्द ह्या प्रकारांत येतात. " त्याची खरड काढली, त्याची चांगली तासडपट्टी केली. " वगैरे वाक्यांतील शब्दशः अर्थ जर पाहिले तर किती अश्लील आहेत. परंतु नेहेमीच्या रोजच्या उपयोगानें त्यामध्यें अश्लील असें कांहींच दिसत नाहीं.

कधीं चांगल्या शब्दांचा चांगुलपणा नाहींसा होतो. " राजमान्य राजेश्री " ह्याच्या मूळच्या अर्थाकडे सध्या कोण पहातो ? " रामराम " " उधो उधो केली " ह्या वाक्याचा प्रकार तसाच आहे. मूळच्या अर्थाचा पार विसर पडून गेला आहे व सध्यां ते शब्द केवळ औपचारिक होऊन बसले आहेत. संस्कृत भाषेंतील " असुर ". शब्दाची फार मजेदार हकीकत आहे. " असुर " ह्याचा मूळ अर्थ देव, शक्तिमान् ( असुर्यम्=

सामर्थ्य, वेदांतील अर्थ ) असा आहे. आर्य लोकांची एक टोळी मूळ घरा-पासून इराणाच्या टप्यांत कांहीं भांडणामुळें फुटली. ह्यांनीं असुर–देव ह्याअर्थी शब्द उचलला व त्याचें अहुर ( उदा–अहुर मझ्द ) असें रूपांतर केलें. हिंदुस्थानांत जे आर्य आले त्यांनीं इराणांत फुटलेल्या आर्यांच्या देवाची चेष्टा आरंभिली. ती इतकी कीं " असुर " शब्दाचा मूळचा अर्थ " देव " पार घालवून त्याला अगदी विरोधी " राक्षस " असा अर्थ दिला आणि दुसरा " सुर " म्हणून शब्द मूळ शब्दांतील प्रथमच दिसणारा नञर्थक ' अ ' काढून " देव " ह्या अर्थी तयार केला. अशी त्या शब्दाची हकीगत आहे. शब्दाच्या अर्थांत होणारा फरक जाणण्यास इतिहासाची किती मदत होते हें ह्यांवरून कळेल.

शब्दाच्या अर्थांत आपल्यां पुष्कळ तऱ्हेची हालचाल होते. कधीं अर्थसंकोच होतो; तर कधीं अर्थवृद्धि होते. कधीं त्याची अव्याप्ति दिसते, तर कधीं त्याची अतिव्याप्ति होते. इंग्लिश भाषेंतील अलंकारांत सिनेक्डोकी व मिटॉनिमि असे दोन प्रकार आहेत. Part for the whole अथवा Whole for the part; असा त्या दोन्ही प्रकारांत उपयोग करतात " सभेंत चाळीस डोकीं होतीं, " डोकीं हा शब्द शरीराचा एक अवयवदर्शक आहे. पण त्याचा अर्थ डोकीं असणारीं माणसें इतका आहे. आपल्याकडेसुद्धां आपण सामान्यासाठीं विशेष आणि विशेषासाठीं सामान्य घालतों, व अर्थान्तरन्यास साधतों. ( संस्कृत काव्यांतील वाक्यांचा अर्थान्तरन्यास येथें अभिमत नाहीं, ) शब्दाचाच अर्थान्तरन्यास समजला पाहिजे हें उघड आहे. ही अर्थसंकोचाची किंवा वृद्धीची क्रिया आपणास किती नकळत होते हें सांगता येत नाहीं. अर्थसंकोचाचीं उदाहरणें प्रथम देतों. पाखरू, पक्षी, हे दोन्ही एका अर्थाचेच शब्द आहेत त्याचा अर्थ पंख असणारे प्राणी. पण पाखरू म्हणजे लहान पक्षी आणि पक्षी म्हणजे मोठा पक्षी असा त्यामध्ये भेद झाला. निर्वाण शब्द मोक्ष, स्वर्ग, आत्यंतिक सुख ह्याअर्थी आहे पण त्याचा उपयोग संकुचित अर्थानें होतो. बुद्धधर्माप्रमाणें बुद्धानुयायी लोकांचेंच फक्त राखून ठेवलेलें अतिउच्च स्थान ह्या अर्थानेंच फक्त त्याचा उपयोग होतो. " पार्थिव " म्हणजे पृथ्वीचा, पृथ्वीसंबंधीं, पण " राजा " पृथ्वीवर

राज्य करणारा एवढाच अर्थ त्यांत आला आहे. " गाठोडें " म्हणजे वाटेल तें गुंडाळून ठेवलेलें. पण " तो गाठोडें बाळगून आहे " ह्या वाक्यांत गाठोडें म्हणजे वाटेल त्याचें न ठरवा पैशाचें किंवा दागिन्याचेंच एवढा अर्थ अभिप्रेत असतो. " त्याचे जवळ पुष्कळ सोनें आहे. " म्हणजे तो सोन्याच्या पुष्कळ लगी जवळ बाळगून असला आहे असा ह्या वाक्याचा अर्थ नसून " त्याचे जवळ दागिने पुष्कळ आहेत " एवढाच अर्थ त्याचा होतो. मी ' शहरांत ' किंवा ' गांवात ' जाणार आहे. ' गावांत ' किंवा 'शहरांत' म्हणजे 'जवळच्या मोठ्या शहरात.' सांईजी म्हणजे स्वामीजी मालक, पण हल्लीं तो शब्द एकादा ' बैरागी ' ह्या अर्थी रूढ आहे. हो आमचा ' काळ ' आहे. वाटेल तो काळ नव्हे तर ' अन्तकाळ ' ह्या अर्थी तो शब्द चालू आहे.

ह्या सारखाच दुसरा प्रकार म्हणजे कांहीं शब्दात अर्थाची वाढ होते हा होय. एकादा शब्द जितका अर्थ दाखवितो त्याच्यापेक्षां जास्त अर्थ घ्यावा लागतो. गोसावी म्हणजे गोस्वामी—गाईचा धनी; पण हल्लीं कशाचाही धनी असला तरी याला गोसावी म्हणतात. " पैसेवाला " म्हणजे नुसते पैसे किंवा नाणें जवळ आहे असा अर्थ नव्हे तर पैसा, अडका, सोनें दागिने, जमीनजुमला वगैरे सर्व अर्थ त्यांत येतो. " पानपत्रावळ " ह्या मध्यें पान आणि पत्रावळींशिवाय दुसऱ्या पुष्कळ गोष्टींचा समावेश होतो. समाहारद्वंद्व म्हणून जेवढे शब्द आहेत तितक्या सर्वांत अर्थाची वाढच झालेली असते. 'पितर' म्हणजे आजपर्यंतचे सर्व वाडवडील.'पितरौ', 'दम्पती,' ' नरौ ' वगैरे एकशेषद्वंद्व ह्यापैकींच होत. गोठा म्हणजे गाई बांधण्याचें ठिकाण; पण त्यांत म्हैशी, घोडे जरी बांधले व जरी गाय एकही नसली तरी त्याला गोठाच म्हणतात. बायको असते एकच पण तिला ' मंडळी ' म्हणतात. उदा० ' आमची मंडळी आहेत का ? ' गंगा, भागीरथी इत्यादि पावित्र्य दर्शक शब्द एका विशिष्ट नदीचीं नावें आहेत. परतु आपल्या गावाजवळच्या नदीचा व नदी नसेल तर ओढ्या-चाही त्या शब्दानें चुकून निर्देश करतात. पाणिनीच्या धातुपाठांत गत्यर्थ धातू जे गोवले आहेत त्यांच्या मुळाशी हीच वृत्ति आहे. त्यांना दाखवि-

ऐरया गमनाच्या अर्थांत थोडे वारकिसारीक भेद आहेत. पण त्यांना एकाच अर्थी, गत्यर्थ–गमने–ह्या अर्थी गोंवले आहेत.

अर्थसंकोच किंवा अर्थवाद का व्हावी ? ह्याला कारण एवढेंच कीं, शब्द आणि अर्थ ह्या दोहोंमध्यें असयारें समीकरण कोणत्या तरी बाजूस कमी पडतें. शब्द आणि अर्थ हे दोन्ही समसमान नसतात. म्हणून इतका फरक पडत जातो. कधीं अर्थ कमी पडतो तर कधीं व्यापून उरतो. शब्दाच्या अर्थांत खळबळ होण्याचीं निरनिराळी कारणें आहेत. एकाच अर्थाचे पुष्कळ शब्द दुसऱ्या भाषेंतून किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळे आले तर मग कांहीं तरी करून त्याच्या अर्थांत कांहीं तरी भेद करावा लागतो. उदाहरणार्थ माता, आई, माई हे एकाच अर्थाचे शब्द आहेत. माता शब्दात जरा जास्त आदर, व मान दाखविला जातो. आई शब्द द्राविडी भाषेंतून आला आहे. पण जास्त प्रेमळ व घरगुती असल्यामुळे रोजच्या व्यवहारात जाऊन बसला आहे. माई शब्दाचा अर्थ तोच, पण रूढीनें तो शब्द सापत्न मातोश्रीसबंधीं वापरतात. कार्य, काम, काज, कज्जा इत्यादि सर्व शब्द व्युत्पत्तीच्या दृष्टीनें एकाच अर्थी आहेत. पण वापरण्यात थोडाथोडा फरक केला जातो. हृदय म्हणजे अंतःकरण, पण त्यापासूनच निघालेल्या ' हिय्या ' शब्दाच्या अर्थांत फरक केला आहे. ' पुस्तक ' निराळे आणि ' पोथी ' निराळी. स्नान म्हणजे अघोळ करणें व न्हाण म्हणजेही अंघोळ करणें. पण एका शब्दाबद्दल दुसरा शब्द चालत नाहीं. " मार्ग सापडला " ह्याचा एक अर्थ, तर " माग सापडला " ह्याचा दुसराच अर्थ-(उदा • चोराचा माग सापडला ) मनस्, मनुष, मति, मनन, मन्यु—सर्व शब्द एका मन्–मनने धातूपासून येतात. पण त्यांच्या अर्थांत फरक आहे. मनस् म्हणजे मन, मति म्हणजे बुद्धि, मनन म्हणजे एकसारखा विचार, मन्यु म्हणजे राग, असे निरनिराळे त्यांचे अर्थ निघतात. गाभारा, गाभ, गाभा या तीन शब्दांचें मूळ एकच, पण अर्थ मात्र भिन्न झाले आहेत. घराचा किंवा देवळाचा गाभारा, जनावराचा गाभ व फळाचा गाभा, इतक्या भिन्न अर्थानें शब्द उपयोगात आणतात. एकाचा दुसऱ्याशीं अगदीं संबंध येत नाहीं. उच्चार जितका जितका सारखा होत जाईल तितका त्याच्या अर्थांत फरक पडल्यावाचून रहाणार नाहीं. कारण कोणत्याही शब्दानें आल्हादी

असून निरुपयोगी बनावें हें मानवी स्वभावास खपत नाहीं. प्रत्येक शब्दानें आपलें काम बजाविलें पाहिजे. काहीं सुद्धा वाया जाता उपयोगी नाहीं. बोलणाऱ्याच्या स्वभावासच शब्दाच्या अर्थात झालेला घोटाळा खपत नाहीं. म्हणूनच बोलणारा एकस्वरूपाच्या किंवा समस्वरूपाच्या असलेल्या पुष्कळ शब्दांत भेद पाडीत असतो.

शब्दाच्या अभिधाशक्तीनें दाखविलेला शब्दाचा अर्थ जर योग्य नसत नसेल तर, त्याला जर कोणत्याना कोणत्या बाजूने बाध येत असेल तर त्याच्या जवळचाच, त्याच्याशी संबंध असलेला व समाजांतील सामान्य रूढीनें मान्य केलेला अर्थ स्वीकारावा लागतो. " अमका बैल आहे " असें वाक्य घेतलें तर त्यांत तच आढळून येईल. बैल म्हटल्याबरोबर त्याला लगेच चार पाय, वशिंड, शेपूट आहे का नाहीं, हें पाहाण्यास धावायचें नाहीं. तर बैलाचे जे स्वाभाविक सर्व दोष ते त्या माणसांत आहेत एवढेच समजावयाचें. ह्या दोषांच्या साम्यामुळेच शब्दाचा अर्थ लाक्षणिक होतो. बैल शब्दाशीं साम्य साधताना मनांत क्रिया कांहीही होवो. कोणी म्हणतात कीं, माणसांतील जाड्य, मान्द्यादि गुणांचीच लक्षणा होते. दुसरे म्हणतात कीं, बैल शब्द उच्चारल्याबरोबर बैलाच्या गुणांचीच प्रथम प्रतीति होते, व त्याचा माणसावर आरोप होतो. किंवा गुणसाम्य आढळलें म्हणून बैलाचाच अर्थ अभिप्रेत आहे असें तिसरेही मत आहे. तें कांहीही असलें तरी शब्दाचा अर्थ बदलतो हें खास व त्यास कारण लक्षणा कधीं कधीं लक्षणेची कारणें ढळढळीत दिसतात तर कधीं त्याचा नुसता आभास होतो.

साम्याधारावर तयार झालेली लक्षणा कधीं कधीं तर फार अनावर होते, व तिचा प्रभाव प्रत्येक भाषेत दृग्गोचर होतो. शब्दाच्या स्वरूपांतही ह्यामुळें गडबड होते, व ती " स्वरप्रक्रिया " प्रकरणांत नमूद केलीच आहे. शब्दाच्या अर्थांत साम्यानें किती फरक होतो तो लक्षणेच्या प्रकारांत आपण पाहिलाच आहे. आणखीही कांहीं उदाहरणें देतों. ह्याच मूळ मनुष्यस्वभावांतच आहे. मनुष्य इतर बाबतींत कितीही कर्तव्यक्षम, चपल, उद्योगी असला तरी भाषेच्या बाबतींत त्याच आळसानें बरेंच पछाडलेले असते. प्रक्रिया जी होते ती केव्हांही बोलणाऱ्याच्या आळसामुळें होते. इतरही पुष्कळ कारणें आहेत, नाहींत असें नाहीं. आळस, हलगर्जीपणा

कांहीं कमी नाहीं. वर्णत्याग होतो तो आळसामुळें. आपला भावार्थ दुसऱ्यास समजला, गरज सरली मग येथ मेला तरी त्याची कोणी फिकीर करीत नाहीं. प्रत्येक मनुष्य वैय्याकरणी नसतो. भाषेनीं विमत भावार्थ समजून देण्याच्यापुरतीच व तेवढ्यापुरतेच भाषेचे नियम पाळावयाचे, अशी साधारण माणसाची प्रवृत्ति असते. एका शब्दासारखा दुसरा शब्द बनविणें, एका क्रियापदाच्या रूपासारखें दुसऱ्या क्रियापदाचें रूप बनविणे, एका वाक्यासारखें दुसरें वाक्य बोलणें—हीं सर्व त्याच प्रवृत्तीचीं चिन्हें होत. सहजासहजीं कामें होतात तर जास्त तसदी घेतो कोण! लहान मुलात असल्या गोष्टी पाहतों 'धरला' हें रूप जर होतें त्याच धर्तीवर मुलें "मरला" हें रूपही बनवणार. "दूध प्यालास का? असें विचारलें तर मूल म्हणतें "दूध प्याला" व्याकरणाच्या नियमाप्रमाणें 'मरला' बद्दल 'मेला' किंवा 'प्याला' बद्दल 'प्यालों' पाहिजे हें कांहीं तें मूल जाणत नाहीं. त्याला तर गोंधळ मुलाच्या भाषेत किती तरी होतो. मुलाच्या वाक्यात भाषेसंबंधी जे नियम असतात किंवा वडील माणसांच्या उच्चारणावरून जे येतात, त्या नियमांच्या साहाय्यानें सर्व रूपें, नव शब्द मुलें तयार करीत असतात. मुलांच्या भोवतीं जे ऐकून येत तें त्यांच्या भाषेत ऐकून येणार. कानडी लोक मराठी बोलू लागले म्हणजे आपल्या कानडी भाषेच्या धर्तीवर "तो काम केला" असा प्रयोग करतात, पारशी लोक दक्षिणी लोकास चेष्टेनें "अरे तात्या न्हालास काय? किंवा पाहिलास काय?" असा प्रयोग करतात ह्याला कारण म्हणजे ह्या वाक्यांशीं त्यांच्या स्वतःच्या भाषेतील प्रयोगाचें असलेलें साम्य होय. अन्यभाषीयांचेंच केवळ असें होतें असें नाहीं तर साम्यसंबंधामुळें चुकीचे प्रयोग चांगल्या शिष्टांच्या बोलण्यांतही येतात. "मला तें काम होत नाहीं" ह्या वाक्यांत दोन प्रयोगांची छाया पडलेली आहे. ते प्रयोग हे—"मला तें काम करवत नाहीं" हा एक व "माझ्याच्यानें तें काम होत नाहीं" हा दुसरा. त्याचप्रमाणें "तो जावेसें म्हणतो" ह्यांतही दोन प्रयोगांची छाया पडली आहे एक "त्याला जावेसें वाटतें" आणि दुसरा "तो जाऊं म्हणतो."

कधीं एका शब्दाचा कांहीं अर्थ असतो. पण त्याचा तो अर्थ जाऊन

5832

त्याच्याकडे वाक्यातील संबंध दाखविण्याची एक विशेष कामगिरी येते. उदाहरणार्थ 'अधिक' शब्द. अधिक शब्दाचा मूळ अर्थ 'जास्त,' पण त्याकडे तुलना करण्याची कामगिरी येते. संस्कृतमधील उपर, अधर, अन्तर्, वरीयस्, ईयस्, इष्, इत्यादि सर्व शब्दांचा उपयोग विशेषणाचा 'तर-तम' भाव दाखविण्याकडे करतात त्यांच्या मूळच्या अर्थाचा पत्ताच नाही. सध्या ह्या विवक्षित कामगिरीमुळेच त्या शब्दांना महत्त्व आलें आहे विभक्तिप्रत्ययाऐवजी शब्दयोगी अव्यय घालण्याची प्रवृत्ति यामुळच पडली आहे "घरीं" बद्दल "घरामध्ये" "गावाहून" बद्दल "गावा पासून" "त्याच्यापेक्षा," "त्याच्याकरता," इत्यादि उदाहरणे आहेत. "असे" "असत" हीं मूळचीं रीतिभूतवाळाचीं स्वतंत्रधातूचीं स्वतंत्र रूपें आहेत पण इतर धातूचा रीतिभूत दाखविण्यासाठीं साहाय्यकारी धातूप्रमाणें त्याचा उपयोग करतात.

आधिभौतिक शास्त्रात प्रत्यहीं निरनिराळे शोध लागतात त्याचा भाषेवर परिणाम झाल्यावाचून रहात नाही. भाषेतील शब्दसंपत्ति त्या शोधामुळें वाढते. राजकारणात उलथापालथ झाली म्हणजे, समाजात खळबळ झाली म्हणजे, किंवा धर्मांत मतमतांतराचा जनजाड झाला म्हणजे त्या सर्वांचें शब्दसंपत्तीत प्रतिबिंब पडत भौतिकशास्त्रात पाश्चात्य परिभाषेला अनुरूप अशी दुसरी परिभाषा उत्पन्न कर ण्याचे प्रयत्न मराठी भाषेत चालले आहेत नितके शब्द मराठीत नवीन नेणार मुसलमानी राजे आले त्यानीं "बंदोबस्त, गुलाम, गिरफ्तार, बेशरम, बरदास्त, मुरू, दुकानदार' इत्यादि नवीन शब्द आणून सोडले इंग्रजाच्या अमदानीत "मास्तर, रेल्वे, पेनसिल, पोष्ट, इस्पतळ,' इत्यादि नवीन शब्द आले. द्राविडी लोकाचा आणि मराठी बोलणाऱ्याचा संबंध आला ह्यामुळे "गाडी, कोलती, रोड ( जोवाच काड ), गुण्ड, नीन ( घोड्यावर घालतात तें ), अड्डा, आणणा इत्यादि शब्द त्याच्या मार्फत आले अशा नानाविध कारणानीं नवे शब्द कित्येक येतात व जुने कित्येक नाहींसे होतात वेदातील कित्येक शब्द संस्कृतात आले नाहींत "वेदी, दर्वी, आग्रदी, होता, प्रतिहर्ता, पुरोडाश" इत्यादि वेदातील शब्दांचा पुढच्या संस्कृतात पत्ताच नाही त ह्यामुळ

वेद इतके दुर्गम झाले आहेत. ज्ञानेश्वरींतील कित्येक शब्दांचा अर्थ आपणास कळत नाही. " मवला, एकवळी, रसोम, राउवें, रामस्य, आदिम, आइणा, आसणूक, अडव, वटवें " इत्यादि पुष्कळ ज्ञानेश्वरींतील शब्द सध्याची मराठी बोलणाराला अगदीं परिचित नाहींत. सोपे सोपे समजले जाणारे नामदेवाचे अभंगात पुष्कळ अपरिचित शब्द सापडतात. त्यापैकीं कांहीं देतों. हुतें, गोदरी, बोगर, निर्भुरें, लास, वारखा, झाजर, जरूर, दुरजा ( मायेचा ), दुरावा ( कामधेनु ), इत्यादि इत्यादि. असे पुष्कळ शब्द नाहींसे झाले आहेत, भाषेच्या शब्दसंपत्तींत जुन्या नव्या शब्दांचें सारखें ' जा, ये ' चाललेलें असत. संसारात जीवनव्यवहार्थ सर्वांची धडपड चाललेली आपण पाहतों. कोणी जन्मतात, कोणी मरतात, कोणी आपल्या प्रतिकृति उत्पन्न करतात व जगरहाटीचा गाडा पुढें चालू ठेवतात. तसें भाषेतही अर्थ दाखविण्याकरता शब्दांची धडपड चाललेली असते. कोणी शब्द जन्मतात, कोणी मरतात, कोणी आपल्या जागीं दुसरे उत्पन्न करतात. बोलणारा व ऐकणारा ह्या दोहोंमध्यें शब्द म्हणजे एक विनिमयाचें साधन आहे बोलणारा यातील विचाराकडे लक्ष देतो तर ऐकणारा शब्दाच्या बाह्य स्वरूपाकडे म्हणजे उच्चाराकडे लक्ष देतो. बोलणाऱ्याच्या मनापुढें कल्पना उभी राहते ती व्यक्त करण्याची इच्छा उत्पन्न होते व त्याप्रमाणें ध्वनि बाहेर उमटतो, ऐकणाऱ्याच्या मनात असें कांहीं होत नाहीं. शब्द म्हणजे भाषेच्या तोंडावरच्या खुणा आहेत, व शब्दाचा अर्थ हा भाषेचा विचार आहे मनुष्याच्या अंतःकरणातील विचाराची गुह्यगुप्त उकलणें जितकें कठीण आहे तितकेंच शब्द ज्या अर्थाला वाहतात त्या अर्थाची गुप्तगुप्त उकलणे कठीण आहे.

शब्दात काव्य असतें शब्दात इतिहास असतो. शब्दात नीतिमत्ता असते थोडक्यात सांगावयाचें म्हणजे शब्दात समाजाची सर्व अंग प्रतिबिंबित झालेलीं असतात आद्य मानवाची भाषा काव्यमय होती असें म्हणतात. वेदाच्या ऋचांमध्यें असली पुष्कळ काव्यमय भाषा दिसते कालिदासादि प्रासादिक कवि काव्यमय शब्दांचा उपयोग करतात हिमालय, दशरथ, इत्यादि व्युत्पत्ति दाखविणारे शब्द, कर्ण, गांगेय, कालियामर्दन, नरकासुर इत्यादि पुराणाचा अनुसंधान असलेले शब्द, स्वर्लोक, जपा-

पुष्प, नलिनी इत्यादि रम्य पुष्पांची नांवें, ललना वगैरे उच्चारण्यास कोमल असे शब्द—हे सर्व काव्यमय शब्द होत. निर्वाण, अर्हत्, सूत्र, इदुर फाकडा, भवानि इत्यादि शब्दांत इतिहास आहे नीतिमत्तेचे शब्द मागे आलेच आहेत.

कधीं कधीं आपली सामाजिक, राजकीय किंवा धार्मिक मतें शब्दांत प्रतिबिंबित होतात. आपले राग, तिरस्कार वगैरे विकार शब्दांवर उमटलेले असतात. इंग्लिश राजकारणांत Whigs (व्हिग्ज) व Tories (टोरीज) असे दोन शब्द वापरीत असत. प्रथम एका पक्षानें दुसऱ्या पक्षाचा उपहास करण्यासाठीं हीं नांवें एकमेकांस दिलीं. पुढें त्यांच्यांतली निंदाव्यंजकता नाहींशी झाली ही गोष्ट निराळी. आपल्या इकडेही मवाळ व जहाल हे दोन शब्द असल्या प्रकारचेच आहेत प्रागतिक लोकांस त्यांचेविरुद्ध असलेले लोक मवाळ म्हणतात. उलट प्रागतिक राष्ट्रियांस जहाल म्हणतात ब्राह्मण असेल तर व त्याच्याबद्दल मनांत आदर असेल तर त्याला देव म्हणतील, त्याच्याबद्दल आदर नसेल तर त्याला भटुरगा किंवा पळिपंचपात्र्या वगैरे म्हणतील कुणबी असेल तर त्याला कुणबट, नागव्या, लंगोट्या म्हणतात पारशास "कागडा" मुसलमानांस "लांडा" ख्रिस्त्यास "सायबा" वगैरे निंदाव्यंजक असेच शब्द धर्माच्या संबंधांतही आहेत जैनांस आदरानें 'तिर्थंकर' 'अर्हत्' म्हणतात नाहींतर तुच्छताव्यंजक 'क्षपणक' किंवा 'ताडावरचे केंस उपटल्या' वगैरे शब्दप्रयोग आहेत

व्याकरणांतील शब्दांच्या आठ प्रकारांपैकीं एकाप्रकारच्या शब्दाबद्दल दुसऱ्या प्रकारचा शब्द वापरतात विशेषणाचा नामाप्रमाणें उपयोग करतात किंवा उलट नामाचा विशेषणाप्रमाणें उपयोग करतात भाववाचकनाम सामान्यनामाप्रमाणें किंवा उलट सामान्यनाम भाववाचकनामाप्रमाणें उपयोग करतात कधीं कधीं सकर्म क्रियापद अकर्मक होतात, व अकर्मक क्रियापदें सकर्मक होतात अशी सारखी उलाढाल चाललेली असते बुद्धा, सिंगल (cup) स्पेशल (चहा) मूर्ख, शहाणासुर्तो इ० विशेषणाचा नामाप्रमाणें उपयोग करतात "सभेंत सर्व बुद्धिमत्ता एकवटली होती" ह्या वाक्यांत भाववाचक नामाचा सामान्य नामाप्रमाणें उपयोग केला आहे जुने शब्द जसे नाहींसे होतात तसे त्या शब्दांचे प्रत्ययही नाहींसे होतात वेदभाषेत

" सर्तवे, कर्तवे " अशीं क्रियापदांचीं तुमन्तें साधीत असत. पण पुढच्या संस्कृतांत तीं लुप्त होऊन गेलीं. जुन्या मराठींत " देणेंचिया, तेयाचीं, येटिया मजलागोनि, एयामाजि, पुसली, असेली " असलीं रूपें येत असत. तसलीं सध्याच्या मराठींत सांपडत नाहींत.

असे शब्द किंवा प्रत्यय नाहींसे झाले; कांहीं शब्दांत मूळचा अर्थ नाहींसा झाला, व त्याच्या जागीं दुसरा आला, काहीं शब्दांना एकापेक्षां जास्त अर्थ प्राप्त झाले, असे पुष्कळ प्रकार झाले तरी भाषेस कमीपणा येत नाहीं. उलट ही सर्व भाषेच्या जीवंतपणाचीं लक्षणें होत व जीवंत प्राण्यामध्यें ज्याप्रमाणें बाल्य तारुण्य वार्धक्य अशीं अवस्थान्तरें किंवा रूपांतरें किंवा अस्ति. जायते, विपरिणमते इत्यादि षड्विकार त्याला लागतात तद्वत भाषेचें आहे. ह्या सर्व प्रकारांनीं भाषा जास्त फोंफावतच जाते. वर्णप्रक्रिया व शब्दार्थप्रक्रिया ह्या दोन्ही प्रकरणांत सांगितलेल्या चमत्कारांनीं भाषेंत हळू हळू फरक पडत जाऊन तिच्यापासून पोटभाषा कशी उत्पन्न होते हें पुढील प्रकरणांत आपण पाहू.

---

## प्रकरण ८ वें.

—:o:—

### भाषा आणि पोटभाषा

बोलण्यांत असलेली भाषा जीवंत असते. सजीव प्राण्यास ज्याप्रमाणें अस्ति, जायते, वर्धते, विपरिणमते इत्यादि षड्विकार होतात तसे भाषेलाही सहा प्रकारची विकृति होते. एका भाषेपासून पुष्कळ उपभाषा किंवा पोटभाषा उत्पन्न होतात. मागे स्वरप्रक्रिया व शब्द अर्थ प्रक्रिया ह्या दोन प्रकरणांत भाषेच्या बाह्य व अंतस्वरूपांत विकृति कशी होते हें सविस्तर सांगितलें आहे. इतके फेरबदल होऊनही भाषा एकमेकांस समजली म्हणजे काम भागलें. भाषा समाजाच्या ताब्यांत असते. समाजाचें स्वरूप

ज्या कारणांनीं बदलते त्याच कारणांनीं भाषाही बदलते व बदल झाले म्हणजे त्याना पोटभाषा किंवा प्रांतिक भेद म्हणण्याचा प्रघात आहे. पोटभाषासुद्धा लहानशा का होईना पण समाजाची असते, व्यक्तीची नसते. प्रत्येक व्यक्तीचा तोंडवळा जसा दुसऱ्या व्यक्तीच्या तोंडवळ्या सारखा नसतो तसा प्रत्येक व्यक्तीचा आवाजही दुसऱ्या व्यक्तीच्या आवाजासारखा नसतो. शिवाय प्रत्येक व्यक्तींत तिचे कांहीं तरी वैशिष्ट्य असतेच. प्रत्येक माणसाची बोलण्याची तऱ्हा निराळी, स्वर काढण्याची तऱ्हा निराळी. यापैकीं प्रत्येकामुळें जर निरनिराळ्या पोट भाषा उत्पन्न होऊं लागतील तर जितक्या व्यक्ति तितक्या भाषा म्हण-ण्याचा अनवस्था प्रसंग येईल. पोटभाषेच्या व्याख्येची व्याप्ति इतकी वाढवून चालावयाची नाहीं. भाषेंत व्यक्तींचें व्यक्तीत्व तर उमटतेंच पण समाजाच्या मोठ्या ठशापुढें इतकें तें टिकत नाहीं. भाषेवर उमटणाऱ्या ह्या मोठ्या ठशाला पोटभाषा म्हणण्यास हरकत नाहीं. बाहेरची मोठी भाषा घेतली तर तींत एकजिनसीपणा असतो. तो कायम ठेवण्यास भाषा बोलणाऱ्या लोकांमध्यें सारखा व्यवहार होत असावा लागतो. हा व्यवहार जर होत नसेल किंवा कोणत्याही कारणानें ह्या व्यवहाराच्या मार्गांत अडथळे येत असतील तर त्या सब लोकांची भाषा जरी एक असली तरी त्यांत प्रांतिक भेद उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहींत जवळ जवळ असणाऱ्या उपभाषांमध्यें फारसें दृश्य असं अंतर दिसणार नाहीं. परंतु एक टोकाची एक पोटभाषा घेतली व दुसऱ्या टोकाची दुसरी पोटभाषा घेतली तर त्या दोन अगदीं पृथक् भाषा आहेत कीं काय असा भास झाल्याविना राहणार नाहीं. देशाच्या विस्तारामुळे फरक होतात. पर्वत, नद्या, राजकीय विभाग ह्यांनीं अडथळे उत्पन्न होऊन मुख्य भाषा पोटभाषांना प्रसवते. आर्यभाषा मूळ एक धरली तर आर्यांच्या उत्तर ध्रुवाजवळच्या प्रदेशांतील वस्तीच्या अकुंचित क्षेत्रामुळें तेथून निघता निघता कांहीं टोळ्या तिकडे गेल्या व कांहीं इकडे आल्या. अशाच पुष्कळ कारणें उद्भवलीं आणि त्या मूळच्या आर्यभाषेच्या निरनिराळ्या पोटभाषा उत्पन्न झाल्या. भाषेच्या जीवंतपणास कधीं खळ पडलाच नाहीं व त्यामुळें प्रांतिक भेदही सारखे उत्पन्न होत होते. लॅटिन, ग्रीक

लिथूनियन, जर्मन किंवा इकडे संस्कृत, इराणी ( झेंद अवेस्ता ) वगैरे सर्व भाषा मूळ उत्तरध्रुवाजवळच्या प्रदेशांत प्रचारांत असलेल्या आर्य-भाषेच्या पोटभाषाच समजल्या पाहिजेत. ह्याच्याही पलीकडे जावयाचें म्हणजे फार फार प्राचीन काळीं मानवी समाजाची एकच भाषा असावी आणि तिजपासून सेमिटिक, आर्य, तुराणी ह्या सर्वांच्या मूळ भाषा उत्पन्न झाल्या असाव्यात. हें म्हणण्यांत कल्पनाशक्तीचा थोडासा स्वैरसंचार दिसेल हें खरें आहे, पण अशी कल्पना करण्यास कांहीं हरकत नाहीं. आर्यांच्या टोळ्या जशा पुष्कळ देशांत पसरल्या तशा त्या मूळ लोकांतही फूट पडून निराळ्या तुकड्या पडल्या असाव्यात. पोटभाषा ह्या शब्दाचा हा अर्थही जरा जास्त व्यापक झाला. इतका जास्त अर्थ घेऊन चालावयाचें नाहीं व सद्यास्तही नव्हे. ग्रीक, लॅटिन, लिथूनियन, संस्कृत, प्राकृत ह्या सर्व भाषा आर्यान्वय असल्या तरी त्यांना पोटभाषा ( Dialect ) असें कोणी म्हणत नाहीं. एखादी पोटभाषा ज्या वेळेस मातृभाषेपासून फुटून निघू पाहते त्या वेळेस तिच्या त्या प्रथम स्थितीतील पोटभाषा म्हणण्यास हरकत नाहीं. पुढें कालांतरानें तीच पोटभाषा मुख्य भाषेच्या योग्यतेस चढेल आणि आणखी दुसऱ्या पोटभाषा प्रसविण्याची शक्ति तिला येईल ही गोष्ट निराळी. संस्कृतपासून पाली–शौरसेनी–मागधी–महाराष्ट्री–पैशाची ज्या वेळेस उत्पन्न झाल्या तेव्हा त्यांच्या अव्वल अमदानींत अगदीं पहिल्या दिवसांत त्या सर्व प्रांतिक भेद ( Dialects किंवा Provincialisms ) किंवा उपभाषाच समजल्या जात होत्या. स्वातन्त्र्य किंवा मुख्य भाषेचा मान किंवा पुन: पोटभाषा प्रसवण्याची पात्रता वगैरे गोष्टी त्यांना पुढें प्राप्त झाल्या. मराठी भाषेचें उदाहरण तसेंच आहे. महाराष्ट्रीपासून किंवा अर्धमागधीपासून किंवा त्याच्यापुढें नंतर सुरू झालेल्या अपभ्रंशापासून मराठी भाषा ज्या वेळेस निघाली त्या वेळेस पोटभाषा म्हणूनच निघाली. परंतु ज्या वेळेस बंगाली, पंजाबी, गुजराथी, हिंदी वगैरे भाषांबरोबर तिला उल्लेखण्याचा प्रसंग येतो त्या वेळेस तिला मुख्य भाषाच मानावी लागते. व तिच्या खानदेशी, नागपुरी, पुणेरी, व कोंकणी अशा पोटभाषा समजाव्या लागतात. खानदेशी, नागपुरी जरी नाहीं तरी कोंकणी व त्यांतल्यात्यांत दक्षिण कोंकणी ही

पोटभाषा निराळी स्वतंत्र भाषा ठरण्याचा योग दिसतो. सध्यां जरी तिला मराठीची पोटभाषा मानतात तरी कांहीं दिवसांनीं ती निराळी भाषा ठरेल.

भाषेपासून पोटभाषा निघतांना दरतऱ्हेची कारणें मध्यें येतात म्हणून सांगितलें. शब्दाच्या अर्थांत च केव्हां केव्हां व्याकरणाच्या योगानें रूढ झालेल्या शब्दसंबधांत फरक होतात. जुनें जाऊन नवें उत्पन्न होतें. हें जें नवें उत्पन्न होतें तें समजण्यास भाषेंत स्थैर्य पाहिजे. निसर्गनिर्मित किंवा मानवनिर्मित अडथळ्यानें उत्पन्न झालेले फरक बोलींत अर्थं शकतील. असले फरक लिहिण्याच्या भाषेंत येत नाहींत. भाषेला स्थैर्य येतें तें बोलींत दृग्गोचर होत नाहीं. बोलींत स्थैर्य नसतें, स्थैर्य जें आणतात तें त्या बोलीचें लिहिण्यांत रूपांतर करून आणतां येतें. ग्रांथिक भाषा फारशी बदलत नाहीं. ग्रांथिक भाषेंत क्षुल्लक प्रांतिक भेद नाहींसे करावे लागतात. सर्वांचा एक इतिहास, सर्वांना वाटणारा देशा बद्दलचा अभिमान, सर्वांना सारखेंच प्रिय असलेलीं राष्ट्रीय महाकाव्यें व आणखी असल्याच प्रकारच्या कांहीं गोष्टींच्या योगानें भाषेपासून पोटभाषा उत्पन्न होण्याच्या प्रवृत्तीवर थोडासा दाब बसतो. खालच्या लोकांना शब्दांचा नीट बरोबर उच्चार करतां येत नाहीं, 'बृहस्पतिवार' चा, बेस्तरवार 'ब्राह्मण' चा 'बिरामण,' 'ग्रहण' चा 'गिराण' 'नितंभर' 'दतंभर' असे निरनिराळे उच्चार होतात. अशा खोट्या उच्चारांना उपभाषा किंवा पोटभाषा मानतां येणार नाहीं. गांवढळ लोकांत असे दुरुच्चार किंवा अपउच्चार पुष्कळ सांपडतात म्हणून त्याची एक निराळीच पोटभाषा समजून चालावयाचें नाहीं. भाषा आणि पोटभाषा ह्या दोहोंत साम्य आणि वैषम्य असे दोन्हीं विरोधी प्रकार सांपडले पाहिजेत. पोटभाषा बोलणारे समाजही एकमेकांशीं संबद्ध असावे लागतात. देशाचा अभिमान, इतिहास, महाकाव्यें वगैरे वर सांगितलेल्या कारणांनीं मधील दुवे सांधले पाहिजेत. साम्य किंवा वैषम्य ज्या प्रमाणांत सांपडेल त्या प्रमाणांत मूळ मातृभाषेपासून पोटभाषेची झालेली फारकत अजमावता येईल. पुनः ज्या प्रमाणांत मूळ समाजांतच लढाई, दुष्काळ, आपसांतील कलह वगैरेंनीं उलथापालथ

होईल त्या प्रमाणांत त्यांच्या बोलींतही साम्य कमी होऊन वैषम्याचें प्रमाण वाढूं लागेल, व पोटभाषा मूळ भाषेपासून दूरची दिसेल. मनुष्य स्वभावालाच नवीन म्हणजे प्रिय वाटतें व पुऱ्याबद्दल तिटकारा येतो. बोली उत्पन्न करण्यांत हीच प्रवृत्ति बऱ्याच अंशीं कारणीभूत होत असते. बोलींतच ही प्रवृत्ति दिसते एवढें नव्हे तर एकाच भाषेतसुद्धां दिसून येते. जुने कागदपत्र किंवा ज्ञानेश्वरींतील किंवा पंचतंत्राच्या भाषांतराची भाषा पाहिली तर सध्यांच्या मराठी बोलणारांला ती कांहीं समजणार नाहीं असें आढळून येईल. भाषेमध्यें सारखा पालट झालाच पाहिजे. फेरबदल होणें हें भाषेचें मुख्य लक्षण आहे. इंग्लिशभाषेमध्यें पुराण इंग्लिश, चॉसरचें इंग्लिश, मध्यकालीन शेक्सपीयरचें इंग्लिश, व वर्तमान-कालीन इंग्लिश असे त्या एकाच भाषेचे कालाच्या दृष्टीनें भाग पडतात. व प्रत्येक भागात कांहीं विशिष्ट प्रकार व फरक सांपडणारच. शिवाय कॉर्नवाल इंग्लिश, यार्क इंग्लिश, लंडन इंग्लिश असे बोलीचे पोटभेद आहेत ते निराळेच. संस्कृत भाषेचे सुद्धां कालाच्या दृष्टीनें भाग पडतात. भाषा एकच पण कालांतरानें पोटभाषा विचारांत न घेता एकाच भाषेंत किती फरक पडतो हें दिसून येतें. वेदाच्या सूक्तांत संस्कृतचें एक रूप दिसतें, ब्राह्मण ग्रंथांत दुसरें, उपनिषदांत तिसरेंच, रामायण महाभारतादि ग्रंथांत निराळेंच व पुढील कालिदास, बाण, भवभूत्यादि प्रासादिक कवींच्या वाणींत निराळेंच रूप दिसतें. ज्ञानेश्वराची भाषा त्यांचा समकालीन नाम-देवाच्या अभंगांत दिसत नाहीं. त्या दोघांच्या भाषेपेक्षां निराळीच मराठी एकनाथ आपल्या भागवतांत लिहितात. दासबोधाची भाषा त्याहून निराळी आणि निबंधमाला व गीतारहस्य ह्या ग्रंथांतील भाषेचें ह्या सर्वांहून निराळेंच रूप दिसतें. एकाच भाषेंत अशीं नानाप्रकारचीं स्थित्यंतरें किंवा रूपांतरें दिसलीं तरी त्या त्या सर्व रूपांतरांत जो कायमचा भाषा-सरस्वतीचा ओघ दिसतो तो अखंड चाललेला असतो व त्यामुळेंच आपलें नक्की स्थान आपणास कळतें. भाषेचीं इतकीं जरी रूपांतरें झालीं तरी ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास, चिपळुणकर, टिळक इत्यादि सर्व ग्रंथकारांनीं भाषा एकच लिहिली आणि ती म्हणजे मराठी.

एक संस्कृति, एक धर्म, एकच राजकीय सत्ता, एकच सुधारणा

असल्यानें भाषेंत फरक होण्याचे थांबतात. परंतु त्यातच जर का बिघाड झाला तर भाषेचें स्वरूपही विकृत होईल. धरणीकंप झाला किंवा राजसत्ता ढासळली किंवा संस्कृतींत, शिकवणुकींत फरक झाला तर त्याचें पर्यवसान लोकांचा व्यवहार बदलण्यांत होतें, व तितपत त्या फरकाचें चित्र भाषेत उठल्यावांचून राहणार नाहीं.

कांहीं वेळां गावढळ लोकांच्या भाषेत जुन्या भाषेचे अवशेष सापडतात. लिथुनियन नांवाची एक युरोपमध्यें भाषा आहे. त्या लिथुनियन भाषेंत पूर्वीच्या आर्यभाषेचें स्वरूप अगदीं अविकृत स्थितींत सापडतें. तसें संस्कृतमध्यें सुद्धां सापडत नाहीं. मराठे कुणबी वगैरे लोकांत त्यो, रि, पगणें, पादणें वगैरे शब्द आढळतात. शिकलेले लोक शिष्ट शब्द म्हणून ते वापरीत नाहींत पण त्या शब्दांकडे पाहिलें तर अगदी वेदकालीन स्यत्, रि, पिग्, पर्द्, कुर्द् वैगेरे शब्द अपभ्रष्ट स्थितींत आलेले दिसतात. गावढळ भाषा टाकाऊ म्हणून सोडण्यांत अर्थ नाहीं. त्यामध्यें उपयोगी असें बरेंच सापडतें " गावढळ भाषा " हा शब्दप्रयोगच अगोदर मापक आहे. पाली, प्राकृत ह्या सर्व गावढळ भाषा समजल्या जात असत. त्यामुळे त्यांना अद्याप देखील बाल्यभाषा म्हणून संबोधतात दिवसादिवसानें त्यांतही सुधारणा होते, आणि पंडितांची भाषा होऊन बसते. व बाल्यपणा जाऊन तिला सर्वमान्यत्व येतें.

भाषेस स्वतःचें तिचें अस्तित्व कोठून येणार ? ती केव्हांही समाजाच्या आश्रयाआश्रयानें राहते. जर भाषा सारखी बोलली गेली तरच तिला जिवंत असें म्हणतां येणार. भाषेंतील जीवतपणा कायम राखण्यास भाषा नेहेमीं बोलली गेली पाहिजे. असें जरी आहे तरी तात्त्विक दृष्टीनें तिचा कायमपणा फार थोडा वेळ टिकतो. तो असा —उच्चाराच्या क्रियेच्या शेवटीं उच्चारलेल्या शब्दाचा लोप होतो व त्या मानानें भाषेचाही लोप होतो. असा प्रकार पुष्कळ वर्षानुवर्ष चालला होता. पुढें सुदैवानें तिला कायमपणा देण्याची युक्ति सुचली. दैववशात् लिहिण्याची कला सापडली व 'क्षणभंगुर' भाषेला कायमचें स्वरूप देतां येऊं लागलें. लिहिली जर नाहीं तर भाषा म्हणजे नामशेष होईल अशाला माग मुळींच नाहीं. कारण बास्क नांवाची भाषा व आफ्रिका व मध्यअमेरिकेंतील पुष्कळच

भाषा अशा आहेत कीं त्यांना लिपीचा म्हणून स्पर्श नाहीं. लिपीशिवाय भाषा जीवंत राहू शकते याबद्दल वाद नाहीं. वेदाच्या संस्कृत भाषेला तरी ख्रिस्तपूर्व १०व्या शतकापर्यंत लिपी कोठें माहीत होती ? किंवा दुसरा असाही अबाधित नियम आपणास बांधता येणार नाहीं, कीं भाषेनें लिखित रूपावर आल्यावरोवरच तिच्यांत चांगल्या प्रकारचें वाङ्मय प्रसवण्याची शक्ति येत नाहीं. ह्याला उदाहरण वेद, ब्राह्मण, उपनिषदें इत्यादि वाङ्मयाचें. भाषेच्या व्याकरणांत, शब्दकोशांत, व शब्दांच्या साहचर्यांत नियमबद्धता येते. इतकें लिपीचें महत्त्व मान्य केलें पाहिजे. लिपीनें भाषेत फारशी सुधारणा होत नाहीं. लिपीनें भाषेच्या अंगावर कांहीं मूठभर मांस चढत नाहीं. भाषेच्या अंगावर मूठभर मांस चढविण्याचें काम तिच्या पोटभाषा करीत असतात. पोटभाषा मूळ मातृभाषेपासून फुटणारे फाटे आहेत असें म्हणता येणार नाहीं. भाषारूपी भागिरथीचे निरनिराळ्या प्रांतांवर नेण्याकरतां काढलेले कालवे नाहीं हे नव्हत. कालव्यांतून पाणी सोडलें म्हणजे मूळ मातृनदींत पाण्याचा तुटवडा पडून खांडवे पडतात तसें पोटभाषांना मूळ भाषेचे कालवे किंवा पाट समजलें तर कालवे त्याप्रमाणें मूळ नदीची शक्ति हरण करतात त्याप्रमाणें पोटभाषा मूळ भाषेची शक्ति हरण करतात कीं काय ? भाषाभागीरथीचा ओघ पोटभाषा उत्पन्न झाल्यामुळें आटतो काय ? तसें कांहीं नाहीं एखाद्या भाषेपासून जर पोटभाषा निघाल्या तर मूळभाषा न आटतां, कम कुवत न होतां चांगली फोफावते. भाषा म्हणजे एक अश्वत्थ वृक्षच आहे. अश्वत्थ वृक्षास खालीं खोल अदृश्य जागेंत मुळ्या असतात. त्या पुष्कळ प्रकारच्या असून पुष्कळ ठिकाणीं आपआपल्या शक्तिप्रमाणें जमीनींच्या थरांथरांत चांगली जागा पकडून बसतात, व मूळ वृक्षास पोसण्याचें व वारा, पाऊस, तुफानास तोंड देण्यास शक्ति पुरविण्याचें काम अव्याहत करतात. भाषेचा आणि पोटभाषांचा संबंध अशा प्रकारचा आहे. समाजाच्या कोणत्या तरी कोपऱ्यांत पोटभाषा दबा धरून बसते आणि मूळ मातृभाषेस सारखी मदत करण्याचें व वर्णत्याग, लोप आगम वगैरे संकटास तोंड देण्यास सामर्थ्य तिच्या अंगीं उत्पन्न करते. एकाच अर्थाचा द्योतक शब्द प्रत्येक पोटभाषेंत निरनिराळ्या स्वरूपांत सापडतो. मूळ भाषेंत त्याच

अर्थी जो शब्द असतो त्याच्याच विकृति किंवा अपभ्रष्ट रूपें प्रत्येक पोट भाषेंत सापडतात. त्या शब्दाच्या विकृति झाल्याच पाहिजेत असें नाहीं. ह्या सर्व विकृति किंवा मूळ शब्दाचीं रूपांतरें उपयोगात आणता येतात. समजा, भाषेत एक नवी कल्पना आली आणि तिचा बरोबर समज पडण्यासाठीं योग्य असा त्या भाषेंत शब्द नाहीं. अशा स्थितींत मूळ भाषा पोटभाषेकडे येते व पोटभाषाही आपल्या जन्मदात्रीचें अशतः तरी ऋण फेडण्याचें श्रेय घ्यावें ह्या सद्बुद्धीनें त्या कल्पनेला बरोबर असा शब्द देते. शब्द कधीं अगदीं स्वतंत्र असतो तर कधीं एखाद्या शब्दाची विकृति असतो. गावढळ कुणब्याच्या भाषेंत—नाडा, सेंदूर, आसूड, सापत्या, कडवा, मुरगड इत्यादि शब्द आहेत. लहान मुलाच्या विजारीस नाडा किंवा नाडी घालतात. नाडा शब्द तेवढ्याच किंवा त्यापेक्षा मोठ्या दोरीस लावला पाहिजे. मोटेसाठीं जो दोर लागतो त्याला दोरच म्हणावयाचें कीं काय ? दोर म्हटले तर वावगें असें काहींच होणार नाहीं, पण त्याला निराळाच असा शब्द दिला आहे. त्याचप्रमाणें इतर शब्दांचें. पोटभाषा म्हणजे भाषेंतील प्रांतिक अथवा स्थानिक भेद. त्याना प्रांतिक अथवा स्थानिक बोली म्हणतात हें खरें आहे. हे प्रांतिक भेद किंवा बोली असूनसुद्धा काहीं काहीं धर्मांच्या स्वतंत्र बोली असतात. सट्टेबाजारात जाऊन जरा वेळ स्तब्ध राहून पाहिलें तर तेथें काय कारभार चालला आहे हें काहीं लवकर आपणास समजावयाचें नाहीं. कारण त्या भाषेत तो सऱ्याचा बाजार चालतो ती भाषाच अगदीं आपणास अपरिचित पडते. काहीं काहीं वेळेस उपरणें किंवा हातरुमालाच्या खालीं हाताचीं एकमेकाचीं बोटें मोडून मनांतील भाव व्यक्त करतात. कचेऱ्यातील कारकुनाची भाषा निराळी.' चकारी पकारी ' हे शब्द साध्या माणसास काहीं समजणार नाहींत. गंगेवर वावरणाऱ्या गंगापुत्राची भाषा निराळी. अशा तऱ्हेनें जितके म्हणून गण असतात त्या त्या गणाला त्याची गणभाषा किंवा पोटभाषा निराळी असते. ह्या गणभाषाना इतकें स्वातंत्र्य नसतें. ह्या सर्व गणभाषा आपापल्या परीनें मूळ मातृभाषेस पोसण्याचें काम करीत असतात. तें इतकें कीं मूळ भाषेचें सर्व जीवित त्याच्यावर अवलंबून असतें, एखाद्या भाषेला जर बळजबरीनें तिच्या

पोटभाषांच्या गोतावळ्यामधून एकदम उचलून दूरदिकडे नेऊन ठेवली तर गर्दीत तुटलें म्हणून घुम्न घुम्न ती भाषा मरून जाईल, ह्यात कांहीं वाद नाहीं. कारण तिच्या एकटीत प्राण नसतो. तरू उभारावयाच्या वेळीं मधील मुख्य सोट लागतोच पण नंतर मुख्य सोट नीट अथवा सरळ राहावा म्हणून बहु वांधून काढल्यानीं त्याला बाधा लागते व त्या जमिनांत भक्कम रोवलेल्या मुळ्यांना बाधा लागतात व अशा रीतीनें तरू डागून टाकला जातो. तसेंच भाषेचें आहे, तिला नागनी डावून टाकल्या शिवाय पोटभाषांच्या स्पर्शानीं बाधायी लागते, व म्हणूनच भाषा स्थिर राहू शकते व मग पसरल्याही सफटाने दाद देत नाहीं. पोटभाषांचें महत्त्व कांहीं कमी नाहीं. मूळ भाषेच्या इतकें नसेल कदाचित्, पण आहे तें कांहीं कमी नाहीं त्याचप्रमाणें त्याच्या उत्पत्तीविषयींही मूळ भाषेइतक्या पाठीमागें त्याना नेता येत नाहीं कारण आईच्या अगोदर मुलगा कधीं जन्मणार! जसजसें कालाच्या ओघात मागें मागे जाऊ, तसतसें पोट भाषांनीं मांडलेला पसारा किंवा त्यानीं पसरलेल्या जाळ्याचा गुंतागुंत कमी कमी होत जाऊन सर्व पोटभाषा मूळ मातृभाषेत लय पावतात किंवा तिच्याशीं एकरूप होतात. व नंतर एकच मातृभाषा आपल्या अविच्छिन्न स्वरूपात कायम दिसते वेदांतात ज्याप्रमाणें " एकं सत्, विप्रा बहुधा वदन्ति " असें अद्वैताविषयीं म्हणतात व त्याच्या एकत्वापासून जगाच्या व्यवहारातील किंवा लौकिकातील नानात्वाची उपपत्ति लावतात, त्याचप्रमाणें भाषेचें आहे. प्रथम भाषा एक असते पण कालांतरानें तिच्यापासून नानाप्रकार उत्पन्न होतात

पोटभाषेनें व्यापावयाच्या क्षेत्रास अमकीच एक मर्यादा असावी असें म्हणता येत नाहीं, व त्याचप्रमाणे बोलणाऱ्यांची संख्या अमकीच असली पाहिजे असेंही म्हणता येत नाहीं नेपाळमध्यें व मणीपूरच्या आसपास पोटभाषांचा इतका बजबजाट झाला आहे की, एकेका पोटभाषेचें क्षेत्र कांहीं कुटुंबापुरतेंच असतें बोलणारे लोक एककाळीं पुष्कळ असतील, लढाया किंवा दुष्काळ वगैरे कारणांनीं लोकवस्ती कमी कमी होत गेली असावी दुसरें उदाहरण हेब्यु भाषेचें. हेब्यु भाषेचें क्षेत्र इतकें संकुचित होण्याचें कारण त्या लोकांचा धर्म हेब्यु भाषा बोलणारे लोक धर्मवेडे

असल्यामुळें परंपरागत व धर्मपुस्तकांत सांगितलेल्या देशांतून बाहेर निघण्याच्या विरुद्ध होते व तेथेंच त्या ल्हानशा प्रांतांत तग धरून अद्यापपर्यंत आपल्या थोड्या वस्तिनिशीं राहिले आहेत. आणखी एक उदाहरण बास्क किंवा द्राविडी लोक यांचें. त्या लोकांतील ल्हवग्ये लोक नाहींसे झाल्यामुळें दुसऱ्या उच्चतर संस्कृतीच्या लोकांनीं त्यांना हाकून काढून रानोंवनीं दबा धरून रहावयास लावलें, म्हणून त्या भाषांचें क्षेत्र व लोकसंख्या ह्या दोन्हीही गोष्टी कमी कमी होत गेल्या. पोटभाषेचें क्षेत्र किंवा लोकसंख्या कमी होण्याचा हा जसा प्रकार आहे तसा त्यांच्या वाढीचाही आहे. भाषेचें क्षेत्र ज्या कारणांनीं वाढतें त्याच कारणांनीं पोटभाषांचेंही वाढणार. एकादी पोटभाषा बोलणारे लोक जर महत्त्वाकांक्षी गडबडे, जाज्वल्य संस्कृतीचे असतील तर ते येनकेनही दुसऱ्या लोकांवर भगडा बसवून त्या दुसऱ्या लोकांनीं व्यापलेलें क्षेत्र संकुचित करतील. परंतु कधीं कधीं हेही मानवी प्रयत्न निसर्गापुढें टिकत नाहींत. निसर्गाच्या रहाटीपुढे हे वायफळ ठरतात व पोटभाषाही आपापल्या प्रांतांत बोलणाऱ्यांच्या हातांत सुखानें नांदतात. भाषेंत काय किंवा पोटभाषेंत काय, मी मी म्हणणाऱ्या " शब्दसृष्टीच्या ईश्वराचे " देखील काहीं चालत नाहीं. प्रतिभासंपन्न कवि किंवा लेखक अगोदरच प्रचारांत असलेली भाषा फार झालें तर मोठ्या कुशलतेनें वापरतील, तिजमध्यें हरतऱ्हेचें चमत्कार उत्पन्न करतील पण नवा शब्द जर त्यांनीं निर्माण करून बळजबरीनें भाषेंत घुसडून देऊं लागलें तर चालणार नाहीं. त्या नव्या शब्दाला आंत घ्यावयाचें कीं, नाहीं हें अरेर समाजाच्या मर्जीवरच अवलंबून राहतें. भाषा ही व्यक्तीची नाहीं, समाजाची आहे. व्यक्तीचा एक प्रकारचा ठसा असतो हें कबूल केलें पाहिजे. अशा पुष्कळ व्यक्ति एकत्र झाल्या म्हणजे तोच ठसा जोरानें उमटतो. तो ठसा शब्दाच्या बाहेरच्या स्वरूपावर असो, अंतरंगावर असो वा शब्दांच्या एकमेकांच्या संबंधावर असो. अशा ठसा भाषेच्या ज्या ज्या भागावर पडतो ते ते भाग त्या भाषेच्या पोटभाषा बनतात तो ठसा ज्या प्रांतांत दिसून येतो तो प्रांत त्या पोटभाषेचा मुलूख. तो ठसा आपली कामगिरी जसजशी बजावील तसतशी त्या

मोटभाषेची वृद्धि अथवा क्षय अजमायचें जाईल. मोटभाषा प्रत्ययाच्या भाषेच्या अगच्या सामर्थ्यापासून निरनिराळे प्रकार व जाती कशा होतात हें पुढील दोन प्रकरणांत दिलें आहे.

---

## प्रकरण ९ वें.

—:o:—

### भाषेचे प्रकार.

प्रत्ययोद्गम कसा झाला व त्याचें शब्दावर प्राबल्य असें झालें ह्याची हकीकत मागें पाचव्या प्रकरणांत आलीच आहे. त्याच दिशेनें पुढें गेलें म्हणजे आणखी काहीं गोष्टींचा उलगडा होतो. शब्द आणि त्याच्यापुढें प्रत्यय ह्या दोहोंमध्यें काहीं तरी अदृश्य संबंध असतो. शब्दाला आपला अर्थ पूर्ण करण्यासाठीं व स्वताचें अस्तित्व वायफळ न होण्यासाठीं म्हणून प्रत्ययाची जी जरूरी आहे ती व प्रत्ययामध्यें शब्द आकर्षण करून घेण्याची जी शक्ति ती ह्या दोहोंवर शब्द आणि प्रत्यय ह्यांचा संबंध अवलंबून असतो. वर सांगितलेली प्रत्ययाची शब्दांना भासणारी जरूरी किंवा प्रत्ययातील शक्ति ह्यापैकीं कोणती तरी एक गोष्ट शब्द आणि प्रत्यय ह्यामधील नातें स्पष्ट करून दाखविते. काहीं काहीं भाषामध्यें ह्या दोहों मधील संबंध जितके उघड आणि स्पष्ट असावयास पाहिजेत तितके नसतात. ह्यावरून भाषेची सुधारणेची स्थिति अजमावता येते. शब्द आणि प्रत्यय यामधील संबंध अति दूरचा असेल तर ते दोन निरनिराळे स्वतन्त्र शब्द असे पृथक् मानता येतील किंवा दुसरी बाजू म्हणजे संबंध अगदीं निकटचा समजून दोन्हीं एकस्वरूपी समजता येतील. हीं दोन टोकें आहेत आणि या दोन टोंकामध्यें *प्रकृति व प्रत्यय ह्या दोहोंच्या* दृष्टीनें भाषाच्या प्रकारात क्रम लावता येतो. जगांतील कोणतीही भाषा घेतली आणि तिच्यामधील शब्द आणि प्रत्यय ह्याचा संबंध

कोणत्या दर्जाचा आहे व तो वरील दोन टोंकांमध्यें कोणतें स्थान पळ-
कावतो ह्यावरूनच भाषेचें स्थान ठरवितात. तेव्हा शब्द आणि प्रत्यय ह्याच्या संबधामुळें प्राप्त झालेला क्रम अखिल जगांतील भाषेचे मार्ग पाडण्यास फार साधनीभूत आहे. येथें एक सूचना देणें जरूर आहे ती ही कीं, ह्या मुद्द्यावर सर्व भाषांचे प्रकार ठरविताना दुसरा कोणताही मुद्दा मध्यें आणावयाचा नाहीं. नाहीं तर घोंटाळा उडेल. ह्या क्रमाप्रमाणें भाषांच्या जाती ठरविल्या म्हणजे दुसऱ्या कोणत्याही प्रकारानें त्याच भाषांच्या जाती ठरविता येणार नाहींत असा त्याचा अर्थ नाहीं. मराठी, बंगाली, गुजराथी या प्रांतिक बोली संस्कृतच्या कन्यका आहेत हें ठरविताना उदाहरणार्थ आपण प्रत्यय आणि शब्द यांच्यासंबंधाच्या योगानें मिळालेल्या क्रमाचा विचार करीत नाहीं, दुसऱ्याच मुद्द्यांच्या बळावर एक दुसरीची जननी आहे असे आपण म्हणतो. एकाद्या ऐतिहासिक घराण्याची वंशावळ आपण काढतों व वंशवृक्षाच्या निरनिराळ्या शाखा काढून आपणास परस्पर नातें दाखविता येतें तसें भाषामध्येंही दाखविता येतें. भाषांचीही वंशावळ काढता येईल व परस्परांचें नातें दाखविता येईल. परंतु शब्द आणि प्रत्यय यांच्यासंबंधाचा विचार करताना व तदनुरूप वर्गवारी करताना वरील तऱ्हेच्या वंशावळीकडे आपणास लक्ष देता यावयाचें नाहीं. तो एक निराळाच विषय होईल, व त्याचा विचारही अन्यत्र केला जाईल. सध्या आपण शब्द आणि प्रत्यय व त्यांचा संबंध यांचा विचार करू व भाषेचे प्रकार ठरविताना त्याचा कितपत उपयोग होतो तें पाहू.

बोलणाऱ्याच्या मनामध्यें काहीं कल्पना येते, मग ती एकाद्या वस्तू विषयीं असो किंवा क्रिया, भाव वगैरेविषयीं असो त्या कल्पनेचें बरोबर हुबेहुब चित्र किंवा त्याचे बरहुकुम मांडणी करणें ह्यालाच शब्द म्हणतात. निवळ शब्द म्हटला म्हणजे त्यास अलंकार, वस्त्रें वगैरे भूषविणाऱ्या गोष्टी असत नाहींत. तो अगदीं उघडा असला पाहिजे त्याला सजवितात तो प्रत्ययाच्या योगानें. त्याच्या उघडेपणावर प्रत्ययाच्या साहाय्यानें पांघरूण घालता येतें. पांघरूण घालताना तीन गोष्टी साधता येतात. स्थळ, काळ, व संबंध ह्या गोष्टींकडे लक्ष पोहोंचवून शब्दाचें मूळचें असलेलें निवळ

काल्पनिक स्वरूप घालून त्याला व्यावहारिक रूप दिलें जातें. प्रत्ययाकडून प्रत्ययाचें काम काय तर केवळ शब्दास शोभा आणणें आणि त्याचा इतर सवगड्यांशीं संबंध जोडणें हें होय. प्रत्ययांना 'स्वतंत्र शब्द' ह्या दृष्टीनें असणारे अस्तित्व व महत्त्व गमावून दुसऱ्या शब्दांच्या अधीन व्हावें लागतें. ह्याला फार काळ लागतो हें खरें आहे. शब्द हे प्रत्ययानें न सांधता नुसते एकमेकांजवळ ठेवून वाक्यरचना एकेकाळीं करीत असत. भाषेची पहिली स्थिति अशीच असली पाहिजे कीं, तिजमध्यें सर्व शब्द स्वतंत्र असावेत आणि बोलणाऱ्याच्या मनातला भाव केवळ शब्द जवळ जवळ ठेवून व्यक्त करता येत असला पाहिजे. प्रत्यय म्हणून काहीं एक नसला पाहिजे. म्हणजे भाषेचें स्वरूप अगदीं 'अप्रत्ययी' असलं पाहिजे, जगातील कोणतीही भाषा घेतली तरी तिचें आद्य स्वरूप अप्रत्ययीच असलें पाहिजे. आर्यांची मूळ भाषा अप्रत्ययीच असली पाहिजे. स्वरामध्यें काय किंवा व्यंजनामध्यें काय प्रक्रिया होण्यास काळाची अवधि मध्यें बरीच जावी लागते. आणि प्रक्रिया झाल्याखेरीज तर प्रत्ययाची उत्पत्ति होणें शक्य नाहीं आर्य पूर्वजांची भाषा प्रथमारंभीं वचन, विभक्ति, लिंग ह्याच्या प्रत्ययाखेरीज होती म्हणजे ' अप्रत्ययी ' होती. त्याच्या भाषेत कालांतरानें प्रत्यय उत्पन्न झाले व प्रथम वचनाचे प्रत्यय उत्पन्न झाले.

ह्या अप्रत्ययी स्वरूपात प्रचलित असणाऱ्या भाषा अद्याप काहीं सापडतात ह्याच बाबतींत ठळक उदाहरण म्हणजे चिनी भाषेचें. चिनी भाषा अद्याप अप्रत्ययी स्वरूपात आहे. लिंग, वचन, विभक्ति किंवा लकाराचा काळभेद दाखविणारा एकही प्रत्यय त्या भाषेमध्यें नाहीं. मजा ही आहे कीं, बोलणाऱ्यास त्याची काहीं अडचणही भासत नाहीं. आणि त्याचें व्यवहार नीट सुरळीतपणें आपण जसें चालवितों तसें चालले आहेत. एकमेकाना आपल्या मनातील भाव व्यक्त करता येतो ते करतात काय तर एका शब्दापुढें दुसरा शब्द ठेवतात. उदाहरणार्थ "पेकीनहून" ह्या शब्दातील भाव व्यक्त करावयाचा आहे. आपल्या मराठींत ही अप्रत्ययी बोलता येईल. पेकीन आणि त्यापुढें पासून हा शब्द ठेवला म्हणजे झालें " पासाव " असा शब्द पूर्वींच्या कवितेंत सापडतोच ( " निषधापासाव " —नलोपाख्यान—रघुनाथपंडित ) चिनी लोक ह्याच्याही पुढें

जातात. पासून शब्द कितीही स्वतंत्र झाला तरी त्यामध्यें अव्ययामुळें कांहीं तरी प्रत्ययाची छटा आहेच. शिवाय प्रत्ययाबद्दल शब्दयोगी अव्ययें वापरावयास लागणें म्हणजे भाषेची परागति नसून प्रगतीच आहे. पण चिनी भाषेंत " येणें किंवा पाठीमागें जाणें " ह्या अर्थी दोन क्रियापदें पेकीन शब्दाच्या मागें पुढें घालावीं म्हणजे " पेकीनहून " असा पंचमी द्योतक अर्थ होतो.

त्सुग–पेकिन–लै, Follow-Pekin-Come

युग यी–या–टौ. Use one sword=By means of a sword

ह्यापेक्षां क्रियापदामध्यें चिनी भाषेंत मोठा चमत्कार दृष्टीस पडतो. प्रत्यय तर नाहींत. क्रियापदांमध्यें काळानें होणारा भेद तर दाखविला पाहिजे. दोन अर्थांचीं दोन क्रियापदें घ्यावयाचीं आणि एकापुढें एक ठेवायचीं. उदाहरणार्थ भूतकाळाचा अर्थ दाखवावयाचा आहे. " चालणें हें क्रियापद चालवावयचें आहे. 'चाललों' ह्यात चालण्याची क्रिया संपली आहे त्यार्थी " संपणें " ह्या अर्थाचें दुसरें क्रियापद घ्यावयाचें आणि दोन्हीं एकमेकापुढें ठेवायचीं.

त्सु–चालणें; लिओ–संपणें

त्सु–लिओ—चाललों

त्सु–चालणें, यायो–इच्छिणें.

यायोत्सु–चालेन. इत्यादि इत्यादि.

अशा प्रकारचें अप्रत्ययी स्वरूप भाषेचें आद्य स्वरूप होय. जुन्या मराठीमध्यें असा प्रकार कधीं कधीं नजरेस पडतो, ज्ञानेश्वरीमध्यें कांहीं शब्दप्रयोग अशा तऱ्हेचे सांपडतात. उपजतवेळीं, जाताक्षणीं, मासी–ना ( गुजराथी ) इत्यादि. " वेळीं " शब्द स्वतंत्र असून शब्दापुढें ठेवला म्हणजे प्रत्ययासारखा बनतो. प्रत्ययाची अंगभूत जी प्रक्रिया ती मात्र त्यामध्यें नाहीं. ह्याच अप्रत्ययी स्वरूपाचें दुसरें एक रूपांतर कांहीं भाषांमध्यें व विशेषतः संस्कृतमध्यें दिसतें. भाषेंतील समासाची गोष्ट बऱ्याच अर्थी ह्याच प्रकारची आहे. अप्रत्ययी भाषेला सामासिक भाषा म्हणतां येईल. समास करतांना अस्तित्वांत असलेल्या प्रत्ययांना फाटा द्यावयाचा असतो.

भाषेचें सामासिक स्वरूप आज होईल किंवा नाहीं हा प्रश्न आहे. संस्कृतांत हा प्रकार सांपडतो पण तो अर्वाचीन संस्कृतांत सांपडतो. बाण, भवभूति ह्यांच्या वेळीं सामासिक लिहिण्याची प्रवृत्ति होती. " तिचा प्रकर्ष नैय्यायिकांच्या ग्रंथांत हवा तितका बघून घ्यावा. संबंध पानचें पान एकेक समास असतो. तथापि शास्त्रीय गहन विषय समजण्यास अडचण पडत नाहीं. कदाचित उलटें सौकर्य येतें. अपरिचितास सामासिक बोलणें कसें-बसेंसें वाटेल हें खरें; परंतु हा केवळ अनभ्यस्ततेचा परिणाम आहे. समासानीं बोलण्याची सवय केली म्हणजे तेच समस्त बोलणें व्यस्त बोलण्यापेक्षां सुलभ वाटतें. सौलभ्य व सौष्ठव असल्यावांचून सामासिक भाषा प्रचारांत आलीच नसती. त्याला साक्ष प्राकृत भाषांची. प्राकृत भाषा अविद्वान अशा सामान्य जनांची, परंतु प्रख्यात नाटककार जो भवभूति त्यानें दोन दोन चार चार ओळी लांब असे समास आपल्या मालतीमाधव नाटकांत योजलेले सर्वप्रसिद्ध आहेत. हे लांब लांब प्राकृत समास तत्कालिन प्राकृत जनांना, श्रोत्यांना व प्रेक्षकांना सहज ऐकतां ऐकतां समजतील अशी खात्री असल्याशिवाय नाटककारानें ते केवळ स्वताच्या हौसेखातर घातलें असतील हें संभवत नाहीं. सामासिक बोलणें उलगडावयास विकट नसून अत्यंत सोपें व शिवाय चमत्कृतिजनक असतें. त्यांत वचनें नाहींत, विभक्त्या नाहींत, लकार नाहींत. कटाळा येईल अशी वाक्यावर वाक्यें नाहींत. तें समजावयाला कशाचा अभ्यास नको फक्त शब्दज्ञान असलें म्हणजे झालें. शब्दांपुढें शब्द येऊन अर्थ आस्ते आस्ते श्रोत्यांच्या मनांत उतरत जातो. सर्वांत ही सामासिक भाषा अत्यंत शास्त्रीय. लौकिक भाषेतला प्रत्ययांचा बाजार व त्यापासून होणारा गोंधळ व चुका होण्याची भीति नमते. "

( संस्कृतभाषेचा उलगडा )

ही विचाराची दिशा कांहीं लोकांना संमत नाहीं. ते अप्रत्ययी भाषेला सामासिक भाषा म्हणत नाहींत. समासांत प्रत्ययाची जरूरी नसते म्हणून त्या भाषेला अ-प्रत्ययी म्हणता येईल. पण सामासिक आणि अप्रत्ययी हे दोन शब्द समानार्थी नाहींत. अप्रत्ययी भाषेस शब्दनिगडित भाषा म्हणतां येईल. एकमेकांपुढें शब्द ठेवावयाचे. शब्द एकापुढें एक कोणत्याही प्रत्ययाशिवाय येतात म्हणजे त्यांचे समास बनतात असें नव्हे.

भाषेचें सामासिक स्वरूप आणि अप्रत्ययी स्वरूप ह्यांत पुष्कळ अंतर आहे. सामासिक स्वरूप ही शेवटची पायरी आहे आणि अप्रत्ययी स्वरूप ही पहिली पायरी होय. समास करण्याच्या मुळाशीं प्रत्ययाची पूर्ण कल्पना असते. अप्रत्ययी भाषेस प्रत्यय नाहींत म्हणून कांहीं सामासिक भाषा म्हणता येणार नाहीं. ह्या भाषेंत शब्द मात्र निगडित केलेले असतात. आगम आणि आदेशनिरहित ही भाषा असते. शब्दाची एक जात म्हणून ठरलेली नसते. वाटेल त्या शब्दास कधीं क्रियापद म्हणून, कधीं नाम म्हणून, कधीं विशेषण म्हणून कामें बजवावीं लागतात. असली भाषा आद्य समाजाची असावी असा तर्क आहे.

सजीव प्राण्यास त्याचें सध्याचें स्वरूप उत्क्रांति तत्त्वाप्रमाणें प्राप्त झालें आहे. धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें मनुष्यास ईश्वरानें आपली हुबेहुब प्रतिमा म्हणून उत्पन्न केलें, असें आतां कोणी मानीत नाहींत. त्याची चतुष्पाद व सपुच्छ ओरांगोतांगापासून उत्पत्ति झाली. सर्व पृथ्वीवर अशा प्रकारचे पशूपासून उत्क्रांत झालेल्या मानवाचे कळपचे कळप पुष्कळ ठिकाणीं वावरत होते व प्रत्येकाची एक एक कांहीं तरी भाषा असावी. त्या भाषेचें स्वरूप कोणतें असावें ह्याबद्दलचा वाद आहे. कोणी म्हणतात कीं, त्या भाषेचें स्वरूप अमकेंच असलें पाहिजे असें कांहीं आग्रहानें म्हणता येणार नाहीं. ती अप्रत्ययी असेल किंवा प्रत्ययी असेल. चिनी भाषा पहिल्या सदरांत येते म्हणून चिनी लोक कांहीं रानटी नाहींत. त्यांची संस्कृति फार जुनी आहे, व ती बऱ्याच उच्च दर्जाची आहे. आद्य स्वरूपाची—अप्रत्ययी भाषा बोलणारे अगदीं सुधारणेच्या खालच्या पायरीवरचेच रानटी लोक असले पाहिजेत असें कसें म्हणता येईल? दुसरा पक्ष भाषेस उत्क्रांति तत्त्व लागू करतो, व असें करणें केव्हांही समंजसपणाचें आहे. सजीव प्राण्याच्या शरीरांत जर उत्क्रांति मानावयाची तर त्याच्या शरीरांत एकजीव झालेली भाषा हिला का उत्क्रांति लागू नये? शिवाय भाषा कांहीं निर्जीव ठोकळा नाहीं. भाषासुद्धां प्राण्याच्या शरीरा सारखी वाढत असते. चिनी लोकांची संस्कृति जुनी असेल पण त्यांच्या भाषेंत अद्याप सुधारणा व्हावयाची आहे. ती हळू हळू झाल्याशिवाय राहणार नाहीं.

भाषा प्रथम एक होती कीं अनेक होत्या असा एक उहापोह वर

झाला आहे त्याचा विचार करू. निरनिराळ्या ठिकाणीं पृथ्वीच्या पाठीवर मानवसमाज उत्पन्न झाले तेव्हां त्यांच्यात एकच भाषा असणें असंभाव्य दिसतें. भाषा एकच अगोदर होती व तिच्यापासून हवामान, किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें स्वरप्रक्रिया आणि शब्दप्रक्रिया होऊन तिच्यात भिन्नत्व येऊन पुष्कळ उपभाषा उत्पन्न झाल्या हा एक पक्ष, किंवा अगोदर निरनिराळ्या पुष्कळ भाषा उपभाषा होत्या, त्या सर्व कांहीं मुद्यावर एकत्र केल्या गेल्या व त्यातल्याच चांगल्या एका संपन्न भाषेस सर्व भाषांची मातृभाषा असें म्हणू लागले हा दुसरा पक्ष असे दोन पक्ष आहेत. ह्या दोन्हीं पक्षांपैकीं खरा कोणता ? मनुष्यास ईश्वरानें अवयव दिले. त्यांचा उपयोग तो आपल्या मगदुराप्रमाणें करू लागला ध्वनी उत्पन्न करण्याच्या अगोदर हातानीं खुणा करून आपल्या गरजा भागविणें त्याला भाग होतें दुसऱ्या पुष्कळ कामास हाताची जरूरी भासू लागली, आणि तोंडाचा कांहीं तरी पूर्ण उपयोग केला पाहिजे म्हणून प्रयत्न होता होता त्यातून भाषण बाहेर पडलें नंतर त्याला अर्थ देऊन हळू हळू भाषा उत्पन्न झाली. मानव समाजप्रिय प्राणी आहे अशी त्याची व्याख्या करतात मुंग्याच्या बाजारात ज्याप्रमाणें समाजप्रियत्व व सयशक्ति आपण पाहतों त्याचप्रमाणें मनुष्यामध्येंही होती समष्टीच्या रूपात राहून राहून त्याचा अहंकार उत्पन्न झाला, व त्याला व्यक्तित्व प्राप्त झालें समाजात असतांना निरनिराळ्या समाजाची भावना प्रगट करण्याची निरनिराळी पद्धति असली पाहिजे. ह्याच पद्धतीस भाषा म्हणतात अशा पुष्कळ भाषा जसजशी सुधारणा वाढत चालली तसतशा एकत्र केल्या गेल्या आणि कांहीं सामान्य मुद्यावर एक मुख्य मातृभाषा ( Parent Language ) मानली गेली. कांहीं विद्वानांची ही विचारसरणी बरीच मुद्देसूद वाटते आफ्रिकेंतील बन्टु वगैरे भाषा, अमेरिकेंतील इंग्लिशव्यतिरिक्त कांहीं स्वदेशीय बोली, किंवा हिंदुस्थानातील द्राविडी, गोंड, तुळु, कुडागु, कोण्ड, खोण्ड, वैकाडी, मणिपुरी वगैरे बोली लक्षांत घेता वरील विधान खरें असावेंसें वाटतें परंतु आर्योद्भव भाषांकडे पाहिलें म्हणजे निराळाच ग्रह होतो भाषेच्या एकऱ्याच प्रमाणावर नव्हे तर दुसऱ्या आणखी दैवतशास्त्र, भूगर्भशास्त्र, संस्कृति धर्मशास्त्र वगैरे प्रमाणावरच मूळ आर्यांची वस्ति कोठें होती

आणि निरनिराळ्या मार्गांनें कोणकोणत्या वेळीं त्याची एकमेकामध्यें फारकत झाली हें सागता येते. आर्योद्भव भाषाचा विचार करताना त्याच्या समाजांत त्या एकसमयावच्छेदेंकरून चालू नव्हत्या. आर्य-समाजाच्या तुकड्या प्रथमच पृथ्वीच्या पाठीवर नाना ठिकाणीं पसरल्या नव्हत्या. तर आर्टिक प्रदेशातून निघून हळू हळू काहीं पूर्वेकडे काहीं पश्चिमेकडे व नतर त्याच्यात पुनः फाटे फुटून नतर शेवटीं चिरस्थायी झाले, अशी त्याच्या प्रवासाची हकीकत आहे. आर्योद्भव समजलेल्या भाषा अगोदरच सुरू नव्हत्या, मागाहून हळू हळू झाल्या हें सिद्ध होतें.

भाषेचें पहिलें रूप—अप्रत्ययत्व आतापर्यंत सागितलें व तदनुषगानें त्याचें दुसरें रूप जें सामासिकत्व तेंहीं सागितलें. ह्याच्या पुढची किंवा विरुद्ध दुसरी प्रकारची भाषा प्रत्ययी होय. सस्कृत, ग्रीक, लॅटिन व दुसऱ्या बऱ्याचशा भाषा प्रत्ययी आहेत. प्रत्ययाचा उगम नेहेमीं स्वतत्र शब्दा-पासून होणार, तेव्हा अप्रत्ययी भाषेंतूनच प्रत्ययी भाषा निघाली पाहिजे. एके काळीं स्वतत्र म्हणून असणाऱ्या शब्दाना स्वतत्र अर्थही असतो. परतु प्रत्ययाप्रमाणें त्याचा उपयोग होऊ लागल्यामुळें कालानुरोधानें त्याना स्वर-प्रक्रिया अथवा व्यजनप्रक्रिया ह्याच्या सर्व नियमापुढें मान तुकवावी लागते, व स्वरत्याग, स्वरागम वगैरेसारखे प्रकार त्या स्वतत्र शब्दात झाल्यामुळे त्या मूळच्या शब्दाच्या स्वरूपात विकृति होणारच. विकृति जरी स्वरूपात झाली तरी त्याच्या अर्थात झालीच पाहिजे असा नियम नाहीं. तेव्हा प्रत्यया सारखे उपयोगिलेल्या स्वतत्र शब्दाचें रूप जरी अपभ्रष्ट झालें तरी कधीं अर्थ कायम राखला जातो. सस्कृतमध्यें पुरुषवाचक सर्वनामें प्रत्यय म्हणून जरी अपभ्रष्ट स्थितींत असलीं तरी त्यानीं आपला मूळचा अर्थ गमावला नाहीं. परतु हें सर्वदा शक्य नसतें. शब्दाचें रूप तर अपभ्रष्ट होतच पण त्याणखी त्याच्या मूळच्या अर्थाचा काहीं एक मागमूसही राहत नाहीं. व प्रत्ययानें गमाविलेला मूळचा अर्थ दाखविण्याकरता दुसरे शब्द योजावे लागतात. ह्याला एक उदाहरण देतो. "गच्छामि" हा शब्द घेतला. ह्यात शब्दही आहे आणि प्रत्ययही आहे. गच्छ् आणि आमि किंवा 'मि' हा प्रत्यय; क्रिया-पदाना लागणारे पुरुषवाचक प्रत्यय हे पूर्वी एकेकाळीं प्रचारात अस-लेलीं पुरुषवाचक सर्वनामेंच आहेत असें साधारण समजतात व त्याला

भाषाशास्त्राचा बराच आधार आहे. ' मि ' हा पूर्वीच्या प्रथमपुरुषवाचक सर्वनामाचा अपभ्रष्ट अवशेष आहे. आता ह्या प्रत्ययात मूळ स्वरूप पुष्कळच विकृत झालें आहे. तरी मुळच्या अर्थात अगदींच घाट मिळाली नाहीं. कारण कर्ता न घालतां सुद्धा नुसतें ' गच्छामि ' हें रूप कर्त्याविषयीं चांगला बोध करतें. ह्यावरून एक दिसतें की कांहीं प्रत्यय अपभ्रष्ट रूपांतरें असलीं तरी आपला अर्थ कायम ठेवतात. त्याचा अर्थ पूर्ण करण्यास दुसऱ्याची जरूरी लागत नाहीं. आतां ज्या ठिकाणीं दुसऱ्या शब्दाची जरूरी लागते असलें एक उदाहरण घेऊं. " जातो " हा विशिष्ट शब्द घेतला. नुसत्या शब्दाकडे जर पाहिलें तर वाचणाऱ्यास कांहीं बोध होणार नाहीं. तो बोध सुकर करण्यासाठीं एखाद्या निराळ्या स्वतंत्र अशा शब्दाची जरूरी लागते. " मी जातो " किंवा " तो जातो " असा कांहीं कर्त्याचा निर्देश असल्यासेरीज नुसत्या क्रियापदावरून कर्त्याचा बोध होणार नाहीं. येथें ' तो ' हा प्रत्यय पूर्वीच्या सर्वनामाचा अवशेष आहे. त्याच्या बाह्य स्वरूपात तर बरीच प्रक्रिया झाली आहे. पण त्याशिवाय आपला मूळचा अर्थही तो शब्द गमावून बसला आहे. म्हणून दुसरा एखादा कर्त्यावाचक शब्द घालून अर्थाची पूर्तता करावी लागते. प्रत्ययामध्यें आणि त्याच्या मूळच्या अर्थांत अशी कांहीं फारकत होते. मराठींतील प्रत्यय या स्थितींत आहेत. त्याचप्रमाणें फ्रेंच व इंग्रजी भाषाची हीच स्थिति आहे. प्रत्यय आणि त्याचा अर्थ ह्यामध्यें ह्या सर्व भाषांत पृथक्त्व दिसून येतें. संस्कृत, लॅटिन, ग्रीक वगैरे भाषाची स्थिति तशी नाहीं. दोन्हींमध्यें इतकें पृथक्त्व नसतें.

शब्द आणि प्रत्यय ह्यामध्यें कांहीं भाषा एकत्व मानोत अथवा दुसऱ्या कांहीं पृथक्त्व मानोत, प्रत्ययी भाषांत त्यामुळें जास्त पोटभेद होतात हें मात्र निर्विवाद. मराठी आणि संस्कृत ह्यांचा संबंध कितीही निकटचा असो, एक दुसरीची कन्या माना किंवा नात माना, पण शब्द आणि प्रत्यय आणि त्या दोहोंचा संबंध ह्याकडे दृष्टि देऊन म्हणावयाचें झालें तर मराठी एका पायरीवर आहे आणि संस्कृत दुसऱ्या पायरीवर आहे. दोन्हींचा कांहीं संबंध नाहीं असेंच म्हणावें लागेल. त्याचप्रमाणें फ्रेंच, इंग्लिश वगैरे रोमन्स भाषा आणि लॅटिन भाषेसंबंधीं.

प्रत्ययी भाषेबरोबरच दुसऱ्या एका त्याच तऱ्हेच्या भाषेचा उल्लेख

करणें जरूर आहे. प्रत्यय साधारणतः शब्दाच्यापुढें लावण्याची वहिवाट आहे. तुर्की आणि हिंद भाषेंत शब्दाच्या मध्यें एकादे वेळेस प्रत्यय येतो. असल्या भाषाना " आगमप्रधान " भाषा म्हटलें तर चालण्यासारखें आहे. प्रत्यय किंवा दुसरे संबंध दाखविणारे शब्द मध्यें येण्याची गोष्ट अपवादादाखल सोडून दिली तरी इतर ठिकाणीं भाषेंत प्रत्यय शब्दाच्या जसे पुढें येतात, तसे शब्दाच्या मागेंही कांहीं शब्द अथवा शब्दाचे अवशेष ठेवण्याचा प्रघात आहे. शब्दाच्या मागें प्रथमच शब्द दोन रीतीनें ठेवता येतो, व त्याप्रमाणें दोन नांवेंही त्याला प्राप्त झालीं आहेत. एक आगमाप्रमाणें आणि दुसरा उपसर्गाप्रमाण. शब्द आगमाप्रमाणें मागें ठेवला म्हणजे भाषा आगमप्रधान होईल, उपसर्गाप्रमाणें ठेविला म्हणजे भाषेस नाव उपसर्जनी प्राप्त होईल. प्रत्ययानें जशी शब्दात इतर शब्दाशीं संबंध दाखविण्याची पात्रता येऊन अर्थात विकृति होते तशी आगमानें किंवा उपसर्गानेंही होते. उपसर्गामुळ अर्थामध्यें किती तरी विकृति होते ह्याची साक्ष संस्कृतमध्य "उपसर्गेण धात्वर्थो बलादन्यत्र नीयते" म्हणून जी एक थोळ प्रचारात आहे हीवरून पडते. धातू एकच हृ म्हणून, पण त्याला निरनिराळे उपसर्ग लागून आहार, विहार, प्रहार, संहार असे शब्द होतात व एकाच्या अर्थाचा मेळ दुसऱ्याच्या अर्थाशीं नसतो. एवढेंच नव्हे तर एकमेकाचे अर्थ एकमेकाच्या विरुद्ध असतात हे उपसर्गसुद्धा प्रत्ययाप्रमाण एकेकाळीं स्वतंत्र असे शब्द होते. परंतु कालवशात् अपभ्रष्ट होऊ लागले आणि प्रक्रियेमुळें त्याच्या स्वरूपात व अर्थात विकृति झाली संस्कृत भाषेच्या सध्याच्या स्थितिकडे पाहिल तर उपसर्ग वाचक ठरणार नाहींत, त्याना द्योतकच म्हणावे लागेल.

शब्द ( शब्द म्हणजे प्रकृति ) आणि प्रत्यय ह्याच्या सानिध्यामुळें भाषेमध्यें पडणाऱ्या जाती किंवा प्रकार आपल्या इकडील समजुतीप्रमाण येथवर सांगितल्या ह्याच मुद्यावर पाश्चात्य लाकही असच प्रकार ठरवितात. त्यानीं भाषेचे प्रकार चार कल्पिले आहेत 1 Agglutinative, 2 Isolating, 3 Inflectional 4 Analytical असे ते चार प्रकार मानतात. प्रकृति व प्रत्यय, त्यामधील सानिध्य किती दूरचें अथवा निकटचें आहे ह्याच मुद्द्यावर ते बसविले आहेत. ( १ ) तुर्की, ( २ )

चिनी, ( ३ ) संस्कृत, ग्रीक अथवा लॅटिन, ( ४ ) इंग्लिश, फ्रेंच, हिंदी अथवा मराठी इत्यादि भाषा अनुक्रमें वरील चार प्रकारच्या भाषेचीं उदाहरणें होत. वर आपण अप्रत्ययी व प्रत्ययी अथवा उपसर्जनी असे दोन प्रकार मानले व त्याचेच दुसरे होणारे सामासिक भाषा आणि आगमप्रधान भाषा असे प्रकार सांगितले. या प्रकारांत आणि पाश्चात्यांनीं मानलेल्या प्रकारांत फारसें अंतर नाहीं. आपल्या विचारसरणींत 'प्रत्यय' या शब्दाचा अर्थ संकुचित न समजतां जरा विस्तृत केला म्हणजे पाश्चात्यांनीं मानलेले चारी प्रकार त्यात अंतर्भूत होतील. प्रत्यय म्हणजे काळ, लिंग, वचन, विभक्ति ह्यांच्या दृष्टीनें विकृति करणारा वर्ण अथवा वर्णसमुच्चय मग ही विकृति प्रकृतीच्या शेवटींच झाली पाहिजे असा संकुचित अर्थ न धरतां वाटेल तेथें आदि, मध्य, अंत ह्यांपैकीं कोठें जरी झाली तरी चालेल, इतका विस्तृत अर्थ प्रत्ययाचा घरला पाहिजे. विकृति नेहेमींप्रमाणें शेवटीं तर होईलच, पण शब्दाच्या आरंभीं किंवा मध्यें सुद्धा शब्दांत विकृति करण्याचें प्रत्ययांस सामर्थ्य आहे. इतका विस्तृत अर्थ प्रत्ययाचा घेतला म्हणजे पाश्चात्यांप्रमाणें Agglutinative आणि Inflectional ह्यांमधील फरक आपणास मानावा लागणार नाहीं. पाश्चात्य मताप्रमाणें Agglutinative भाषेंत संबंध दाखविण्यासाठीं शब्दापुढें प्रत्येक संबंधाचा एक एक आगम घालतात ह्या प्रकारात येणाऱ्या भाषांना आगमप्रधान भाषा म्हणावें. Isolating किंवा Root भाषेमध्यें शब्दाचें विशिष्ट स्थान, त्याची जात ठरवितें अमका एक शब्द क्रियापद आहे, का नाम आहे का विशेषण आहे हें त्या शब्दाच्या स्थानावरून ठरवावयाचें. असल्या भाषांना धातुप्रधान भाषा म्हटलें तर फारसें वावगें होणार नाहीं, बाकीचे दोन वर्ग प्रत्ययी भाषांत येण्यासारखे आहेत. शेवटच्या प्रकारात विभक्तीचे प्रत्यय होताहोईल तितके कमी वापरण्याची प्रवृत्ति असते आणि त्याचें काम शब्दयोगी अव्ययासारखे शब्द पुढें ठेवून करून घ्यावें लागतें.

प्रत्यय शब्दामध्यें कसा लागतो हें खालील उदाहरणावरून कळून येईल. प्रकृति Man. वचनाच्या दृष्टीनें विकृति व्हावयाची म्हणजे ती मध्येंच होते. मधला स्वर बदलतो. Men हें त्याचें अनेकवचन. तुर्की भाषेंत संबंधदर्शक

शब्दापुढें तसलाच शब्द पुन्हा येतो. प्रकृतीचें आणि पहिल्यासबधीं शब्दाचें इतकें सान्निध्य असतें कीं व त्यामुळें दोहोंचें इतकें तादात्म्य होतें कीं दोहोंमधील भेद पार उडून जातो व दोघे एकरूप होतात. व नंतर त्याला दुसरे प्रत्यय घेण्याची पात्रता येते. तुर्की भाषेत 'इव' म्हणजे घर असा शब्द आहे आणि 'इम' हा प्रथम पुरुषवाचक षष्ठीचा सबंध दाखविणारा प्रत्यय. हा इव इम म्हणजे माझें घर,'इन'षष्ठीचा नेहेमींचा प्रत्यय.इव+इम+इन म्हणजे माझ्या घराचा. "इविमदन" म्हणजे 'माझ्या घरापासून' असे एकापुढें-एक शब्द "चिकटून" देऊन सबंध दाखवतात. ह्याच प्रकारच्या भाषांना आपण 'शब्दनिगडित' भाषा असें नाव दिलें आहे तें ह्यामुळेंच. मराठींतील "सामान्यरूपाची" तऱ्हा थोडीशी ह्याच प्रकारची आहे. मनुष्य हा शब्द घेतला. अनेकवचनी प्रत्यय लावला म्हणजे मनुष्यान् असें रूप होईल. ह्याला पुन विभक्तीचा प्रत्यय लावला म्हणजे मनुष्याला किंवा मनुष्याचे वगैरे रूपें होतात. दुसरें आणखी एक उदाहरण देतों. "तुमच्यात (काय सामर्थ्य आहे)" ह्यातील 'तुमच्यात' हा शब्द कसा आहे पहा 'तुमच्या' ह्या शब्दातच प्रकृतीस विकृति झाली आहे. आणि त्यास पुन प्रत्यय लागला आहे. 'तुमच्यात' ह्यातील तुमच्या हें सामान्यरूप षष्ठीच्या प्रत्ययानें झालें आहे. जुन्या मराठींत हेच रूप तुमचेया असे आलें असतें व अशा घर्तीचीं रूपें ज्ञानेश्वरींत कितीतरी आहेत. घरेंया घरण्या, करणेंया-करण्या, स्वामीचियें-स्वामीच्या इत्यादि.

एकमेकापुढें निवळ शब्द ठेवण्यापेक्षा काळ, लिंग, वचन, विभक्ति दर्शक प्रत्यय शब्दाला लावणें ही भाषेतील एक सुधारणा आहे. ह्याच्याहि पुढची सुधारणा म्हणजे प्रत्ययालाच अजिबात फाटा द्यावयाचा. प्रत्ययाच्या पुढें भाषेस अशी स्थिति येतें कीं, प्रत्ययाचा जसा काहीं वीट येऊन प्रत्यय होता होईल तों न लावता त्याच काम शब्दयोगीसारखीं अव्ययें वापरून करावयाचें प्रत्यय टाळावयाचे म्हणजे "ये रे माझ्या मागल्या" ह्या न्यायानें पूर्व स्थळावर म्हणजे भाषेच्या अप्रत्ययी स्वरूपावर उतरती माजणीन यावयाचें कीं काय ? तर तसें काहीं नाहीं. त्याच्या उलट भाषेत सुधारणाच होत जाते.

इतक्या सर्व प्रकाराबरोबर आणखी एक दोन प्रकार सांगावयाचे

आहेत. त्यांपैकीं " आगमप्रधान " प्रकाराचा वर उल्लेख केला आहे. व त्याला वरच्या प्रकारांत सामीलही केला. " आगमप्रधान " प्रकाराबरोबर दुसरा " आदेशप्रधान " म्हणून एक निराळाच प्रकार मानता येईल. तुर्की वगैरे भाषात आगम फार होतात म्हणून तिला " आगमप्रधान " म्हणण्यास हरकत नाहीं. संस्कृत, लॅटिन वगैरे भाषांना आदेश फार होतात म्हणून " आदेशप्रधान भाषा " त्यांना वाटलें तर म्हणावें हे दोन निराळे स्वतंत्र प्रकार नाहींत; दोन दुसरीं नांवें आहेत इतकेंच.

भाषाच्या एकदर स्वरूपाकडे पाहिलें तर त्यातील सुकर, सुगम्य, चागलें असें रूप कोणतें हा प्रश्न राहतोच. भाषा कोणत्याही स्वरूपांत असली तरी बोलणारा माणूस तिला पाटेल तसा पेलतो. चिनी किंवा तुर्की भाषा कठीण आहेत, पण कोणाला ? अर्थात् अन्यभाषीयाना. तेव्हा सोपेपणाचा किंवा कठीणपणाचा प्रश्न नव्हे. सुधारलेली भाषा कोणतीस म्हणावें ? जी भाषा पृथक् पृथक् होऊन जास्त जास्त सुलभ व साधी होत जाते ती भाषा चागली. साधेपणाची सुद्धा एक मर्यादा आहे कीं, तिच्यापुढे जाता येत नाहीं. आणि गेले तर शब्दाच्या अर्थात स्थैर्य न येता भाषेत द्व्यर्थाचें अथवा नव्यर्थाचें व्यंग येतें. शब्दाच्या शेवटीं नजर फेंकली कीं, शब्द कोणत्या प्रकारचा आहे हें कळलें पाहिजे. हें ज्या भाषेत कळतें ती भाषा उत्तम. सामासिक भाषा अतिशय साधी असते, व प्रत्येक शब्दसमूह अर्थपूर्ण असतो. समजा, सर्व लोक विद्वान झाले आणि देशात गावढळ अथवा रानटी माणूस एकही राहिला नाहीं तर त्या विद्वान लोकाची भाषा कोणत्या स्वरूपात दिसेल ? पदार्थविज्ञानादि शास्त्रविशारद लोकाची भाषा जशी साधी असते तशी त्या लोकाची होईल.

---

# प्रकरण १० वें.

—:०:—

## भाषेच्या जाती.

मागें धरील प्रकरणात भाषाच्या प्रकाराबद्दल विवेचन केलें त्या वेळेस विवेचनाचा मुख्य भर शब्द आणि प्रत्यय ह्याचे निकटवर्तित्व ह्याच्यावर होता, व त्याप्रमाणें प्रत्ययी व अप्रत्ययी किंवा आगमप्रधान व आदेशप्रधान व शेवटची सामासिक असे भाषेचे प्रकार सांगितले जगातील निरनिराळ्या भाषा ह्यांपैकीं कोणत्या तरी एका स्थितींत असल्या पाहिजेत. सुधारणेची स्थिति ही भाषेच्या स्थितिवरून कळते. सध्या आपणास भाषेच्या जाती पाहावयाच्या आहेत. मनुष्याच्या हरएक जातींपैकीं कोणकोणत्या एकमेकींशीं संबद्ध आहेत, त्या सर्वांची नातीं हुडकून काढावयाचीं आहेत. भाषाची नातीं हुडकून काढली म्हणजे त्या जुन्या भाषा बोलणारे व सध्याचे त्याचे वंशज ह्याच्या मधील नातें सापडण्यासारखें आहे. आद्य मानवापासून सुरवात करावयाची म्हटलें तर त्याची आद्य भाषा आपणास कल्पावी लागेल. आणि मग तिच्यापासून जगातील यच्चयावत् भाषा निघाल्या असें म्हणावें लागेल. व आर्य, द्राविडी, चिनी, आफ्रिकेतील बटु वगैरे सर्व भाषा एकमेकींशीं सलग्न आहेत व भाषा बोलणारेही एका प्राण्यापासून उत्पन्न झाले असले पाहिजेत असें मानावें लागेल.हा जास्त पलीकडचा विचार झाला, व असा विचार केला म्हणजे पुढच्या प्रयत्नाची जरूरीच भासणार नाहीं. साधारणपणें एकदर भाषाच्या जननी तीन कल्पल्या आहेत. कल्पल्या आहेत म्हणण्यापेक्षा शोध करता करता असें आढळून आलें आहे कीं, तीन मुख्य भाषापासून सर्व भाषा जन्मल्या असाव्यात. एक जुनी आर्य भाषा आणि इतर आर्योद्भव भाषा. दुसरी सेमिटिक नावाची भाषा आणि तिसरी तुराणी भाषा आता पहिल्या वर्गाच्या नावासबधानें जरा तक्रार आहे. कांहीं लोक त्याना इंडोजर्मन म्हणतात, कांहीं इंडोइराणी अथवा इंडोएरियन म्हणतात आणि कांहीं इंडोयुरोपियन म्हणतात. ह्यांपैकीं

प्रत्येक नावांत कांहीं तरी दोष आहे. इंडोजर्मन नाव सदोष आहे तें ह्या अर्थानें कीं काल्टिक भाषा आर्योद्भव असून जर्मन नावांत सामील होत नाहीं. इंडोइराणी नावांत साधारणपणें पाश्चात्य कोणतीच भाषा येत नाहीं. हिंदुस्थानांतील आणि इराणांतील अशा दोन भाषांचाच बोध त्या नावानें होतो. इंडोयुरोपियन हें नाव ह्या सर्वांपेक्षा जास्त व्यापक आहे हें खरें, पण भाषाशास्त्राच्या उत्पत्तीच्या वेळीं आणि त्याच्यापुढें जर्मनींतील विद्वान पंडितांनीं भाषाशास्त्राच्या प्रगतींत पुष्कळच भाग घेतला व त्यांनीं केवळ स्वाभिमानपूर्वक सर्व भाषांना इंडोजर्मन असें चुकीचें असलेलें नाव दिलें आणि आपली चूक समजून देखील तसेंच तें पुढें चालविलें. नावाचा हा जो घोटाळा झाला आहे त्याला आमच्यामतें एकच कारण असावेंसें वाटतें भाषाशास्त्राची वाढ ज्या वेळेस गेल्या शतकांत झपाट्यानें झाली त्या वेळेस आर्यांच्या मूळ वसतिस्थानाची कल्पना मुकर झाली नव्हती. सन १८३३ पासून म्हणजे संस्कृतच्या साहाय्यानें पूर्व संस्कृतीच संशोधन सुरू झाल्यापासून आर्यांचें मूळ वसतिस्थान सारखें युरोप आणि आशियाखंडभर फिरत होतें व परवापर्यंत त्याचा निकाल लागला नव्हता. सध्या लागलेला निकालही पुरा मान्य झालेला नाहीं कोणी म्हणत हिंदुस्थान, कोणी म्हणत मध्य आशिया, कोणी म्हणत कास्पेयस पर्वताचा पायथा, कोणी म्हणत टैग्रिस आणि युफ्रेटिस नद्यांमधील दुआब. अशा तऱ्हेनें पुष्कळ प्रकारचीं मतें पुढें येत होतीं शेवटीं लो. टिळकांनीं ज्योतिष, भूगर्भ वगैरे शास्त्रांच्या साहाय्यानें सर्व वैदिक सूक्तांचें आलोडन करून आर्यांचें मूळ वसतिस्थान वर कोठेंतरी आर्क्टिक समुद्राजवळ असावें हें मत प्रस्थापित केलें. पूर्वी वसतिस्थानाची बरोबर कल्पना नसल्यामुळें आद्य जातीच्या भाषेचें नाव असं घेडगुजरी पडलें. मूळ आर्य लोकांच्या टोळ्या आर्क्टिक समुद्राच्या आसपासच्या प्रदेशांतून निघाल्या व फिरता फिरता कांहीं शाखा तिकडे गेल्या आणि वसति करून राहिल्या. कांहींनीं इकडे येऊन वसति केली. कालानुरोधानें व बाकीच्या इतर कांहीं कारणांनीं त्यांच्या उच्चारांत आचारांतल्याप्रमाणें फरक पडत गेल्यामुळें भाषा इतक्या भिन्न झाल्या. तेव्हां आर्क्टिक प्रदेशांत राहणाऱ्या आर्यांच्या भाषेस " आर्यभाषा " म्हणण्यास काय प्रत्य-

याय आहे ? हिंदुस्थानातील संस्कृत–वेदाची भाषा त्या मूळच्या आर्य-भाषेपासूनच उत्पन्न झाली आहे. त्याचप्रमाणें लॅटिन, ग्रीक, लिथूनियन त्याच आर्यभाषेपासून निघाल्या आहेत. मूळ लोकांना जर आर्य म्हणावयाचें तर त्यांच्या भाषेस "आर्य भाषा" म्हणण्यास कोणती हरकत ? आर्यभाषेनें पाश्चात्यभाषांचाही निर्देश होण्यासारखा आहे. संस्कृत, लॅटिन ग्रीक ह्या सर्व आर्योद्भव भाषा आहेत. पाश्चात्य रोमॅन्स भाषा लॅटिनपासून निघालेल्या आहेत. पाली, प्राकृत, संस्कृतोद्भव आहेत, व सध्याच्या बोली प्राकृतोद्भव आहेत. अशा रीतानें साखळी बरोबर लागण्यासारखी आहे. असो, हा मूळ भाषेच्या नावासंबधाचा प्रश्न झाला आर्यभाषेपासून निघालेल्या भाषा पुष्कळ आहेत आणि त्यांनीं प्रदेशही बराच व्यापला आहे. ह्यांनीं व्यापलेला प्रदेश म्हणजे बहुतेक युरोपखंड आणि आशियांतील हिंदुस्थान वगैरे प्रदेश येतो संस्कृत, झेंदअवेस्ता, केल्टिक, इटलिच्या भाषा, ट्युटॉनिक, स्लॅव्हा-निक वगैरे भाषा इंडोजर्मन नावाखालीं येतात एकदर आर्योद्भव भाषाचे आठ वर्ग केले आहेत. ते हे–संस्कृत–अवेस्तन, आर्मेनियन, ग्रीक, अल्बे-नियन, इटलीयन, केल्टिक, जर्मनिक, लिथुस्लॅव्हॉनिक.

आर्योद्भव भाषाच्या विशेष खुणा खालीलप्रमाणें आहेत. पहिली व्युत्पत्तीच्या साहाय्यानें कोणत्याही शब्दाचें मूळ शोधता अखेर क्रिया निदर्शक धातूशीं येऊन मजल पोहोंचते, व त्याच्या पुढ व्युत्पत्तिदृष्टया जाता येत नाहीं अर्थदृष्टया त्यामध्य पृथक्करण करणें अशक्य होतें आणि ध्वनिदृष्टया पृथक्करण करण्याची पाळी येते आर्योद्भव कोणतीही भाषा घेतली व नाम अथवा सर्वनाम–ह्यापैकीं कोणत्याही शब्दाच पृथक्करण करू लागलो तर मूळ धातूशीं येऊन पोहाचू. असले हे मूळ धातू पुष्कळ भाषे मध्यें सारखे सापडले आहेत अशा तऱ्हेचे धातू सर्व भाषामध्यें सापडतात म्हणूनच त्या भाषाच्या अभ्यासानें भाषाशास्त्रास जास्त फायदा होण्या सारखा आहे. आर्योद्भव भाषांमध्यें जे काहीं साधारण प्रकार आढळून येतात ते सेमिटिक किंवा ट्युरॅनिक भाषामध्य सापडणार नाहींत. दुसरी गोष्ट म्हणजे बहुतेक सर्व आर्योद्भव भाषा सुसंस्कृतीनें सुधारलेल्या लोकाच्या ताब्यात आहेत ही होय. ह्यांनीं प्रदेश जरी पुष्कळ व्यापला आहे तरी दुसऱ्या इतर भाषांशीं तुलना करता संख्येच्या बाबतींत आर्योद्भव भाषा कमी

मरतील. गावढळ, रानटी, डोंगराच्या गुहेंतून राहणाऱ्या, ज्यांच्यावरून सुधारणेच्या वाऱ्याचे प्रवाह अगदीं गेले नाहींत अशा लोकांच्या ताऱ्यात पुष्कळच भाषा आहेत. त्यांची संख्याही फार आहे. व त्यांच्या एकदर संख्यासपत्तीचा विचार केला तर आपल्या सुधारलेल्या भाषा पुष्कळच मागें पडतील. त्या भाषांचे नियम निराळे आहेत. असो, आर्यो-द्भव भाषांवरून आपण पाहिलें कीं, प्रत्यय छाटून छाटून शेवटीं धातू राहतो आणि ते सर्व धातू एकाक्षरी असतात व बहुतेक क्रियाप्रधान असतात चिनी भाषेवरूनही ह्या विधानास पुष्टी मिळते परंतु ती आप णास घेता यावयाची नाहीं कारण चिनी भाषेतील एकाक्षरी धातूंच्या पलीकडे व्युत्पत्ति जाऊ शकतच नाहीं, असें काहीं त्या भाषेचें चांगलें ज्ञान असल्याशिवाय आपणास खात्रीनें सांगता येणार नाहीं. येवढें मात्र खरें कीं, ते धातू एकाक्षरीच असतात. भाषेतील मूळ शब्द एकाक्षरीच असतात किंवा ते क्रियादर्शकच असतात ह्या प्रश्नाची चर्चा मागें केलीच आहे. मानवी प्राण्यास स्वतास महत्त्व देण्यासाठीं किंवा स्वताचं अस्तित्व प्रस्थापित करण्यासाठीं किंवा स्वताच्या गरजा उच्चारण्यासाठीं स्वताचा निदर्शक व तदपेक्षीय यच्चावत् इतर वस्तुनिदर्शक असे सार्वनामिक शब्दाची जरूरी प्रथम लागली असेल व त्याच्या नंतर क्रिया करण्याची जरूरी लागली असेल ह्या म्हणण्यात चूक आहे असें सांगता येणार नाहीं. दुसरी बाजू पहावी तर मूळ क्रियाप्रधान धातूच असावेत ह्या विधानास मानसशास्त्राकडून पुरावा मिळतो तो असा त्याप्रमाणें भाषेमध्यें मनातील विचार प्रगट केलेले असतात त्याचप्रमाणें भाषेमध्यें इच्छाशक्तीही प्रगट केलेली असते. अगदीं पहिल्या मनुष्याची स्थिति लक्षात घतली असता हेंच जास्त खरें दिसतें कारण त्या पहिल्या मनुष्यास विचार करण्याची इतकी शक्ति नव्हती. पण त्याच्या गरजेमुळें त्याची इच्छाशक्ति मात्र अनावर होती इच्छाशक्ति केव्हाही बाहेर येणार म्हणजे कोणत्याही क्रियेच्या स्वरूपात बाहेर येणार म्हणूनच मूळ शब्द क्रियाप्रधानच धातू असले पाहिजेत व अशा तऱ्हेचा पुरावा सर्व आर्यभाषांमध्यें सापडतो ही त्या आर्योद्भव भाषेसंबंधीं तिसरी गोष्ट झाली इतर भाषांना हा नियम लागू नाहीं. सर्व अनार्य भाषांमध्यें क्रियाप्रधान

धातू हे मूळ शब्द नाहींत सेमिटिक भाषामध्यें क्रियापदापूर्वी नाम असा चेसें वाटतें त्याचप्रमाणें तुरेनियन भाषाची स्थिति.

भाषाशास्त्रातील शोध लावायचे असतील तर ते आर्यांद्भव भाषाच्या अभ्यासापासून लावले पाहिजेत. दुसऱ्या भाषापासूनही कांहीं कांहीं बाबतींत मदत मिळण्यासारखी आहे. अशा रीतीनें काम तर मोठ प्रचंड होतें. सर्व भाषाचा अभ्यास व नुसता अभ्यासच करून चालावयाचें नाहीं तर त्यामधील लेखी व बोली अशा दोन्ही प्रकारच्या भाषेंतील खाचा खुणा अवगत करून घेतल्या पाहिजेत. इतकें काम एकाच्या हातून होणे शक्य नाहीं कांहीं लोकाना पुष्कळ भाषा येतात. बुद्धीची देणगी सर्वांनाच सारखी नसल्यामुळें अखेर श्रमविभागणीच्या तत्त्वावरच विसावा लागतें. कांहींनीं भाषा वाटून घेऊन त्यामधील आपले शोध जाहीर करावे. मात्र प्रयत्न जे करावयाचे ते प्रामाणिकपणानें करावयाचे, अभ्यास करावयाचा तो गाजावाजा करण्यासाठीं करावयाचा नाहीं अशीं उत्तम माणसें मिळून सबंध काम केलें म्हणजे भाषाशास्त्राच्या प्रगतींत येणाऱ्या अडचणी नाहींशा होतील

आर्यांद्भव भाषाचाच अभ्यास भाषाशास्त्रातील शोधास जास्त उपकारी का ? असें ह्या आर्यभाषात जास्त काय आहे व तें दुसऱ्या भाषेंत नाहीं ह्यालाही उत्तर आहे. आर्यभाषात खालील गोष्टी प्राधान्यानें साप डतात. पहिली गोष्ट सर्व आर्यभाषात दिसून येते ती ही–' स्वभावानु वृत्ति. ' बोलींचा अथवा पोटभाषाचा गजबजाट वाटेल तितका होवो त्या सर्वांमध्यें मूळ त्याच्या मातृभाषेपासून पुष्कळ भेद सापडले तरी त्या मूळ मातृभाषेचा ठसा त्या सर्व पोटभाषामध्यें दिसल्यावांचून राहत नाहीं मराठी पुण्याची असो, कोंकणातील असो, नदुरबारची असो, अथवा भिलाची असो नागपूरच्या माणसाला कारवारी मराठी भाषा समजणार नाहीं हें खरें आहे एकाची भाषा दुसऱ्यास समजण्यास फार प्रयास पडतील, पण त्या सर्वांमध्यें मराठीचा मराठीपणा खात्रीनें सापडे त्याविना राहणार नाहीं लॅटिन आणि संस्कृत भाषा सबद्ध आहेत हें कांहीं साध्या अनभिज्ञ माणसाला मान्य होणार नाहीं. तें जाणावयास भाषाशास्त्रज्ञच पाहिजे. इतक्या भिन्न जरी त्या भाषा वरवर दिसल्या तरी

दोन्हींमध्यें आर्यभाषेची ' स्वभावानुवृत्ति' दिसलीच पाहिजे. मराठीचें प्राकृतशीं, प्राकृतचें संस्कृतशीं, व संस्कृतचें इतर पाश्चात्य भाषांशीं साम्य हुडकून काढता येतें. हाच एकसूत्रीपणा सर्व आर्योद्भव भाषामध्यें सूत्रासारखा गोंवला आहे. दुसरी गोष्ट व्याकरणासंबंधीं. व्याकरणाचे नियम ठरून गेल्याप्रमाणें आहेत. व्याकरणात काहीं फरक कालपरत्वें होतात हें खरें. तरी पण व्याकरणात विसंगतेपेक्षा नियमबद्धताच जास्त दिसून येते. कालांतरानें द्विवचन किंवा चतुर्थीविभक्ति ह्यासारख्या गोष्टी नाहींशा होतील. पण त्याला काळ बराच जावा लागतो. व अशा जरी काहीं गोष्टी होत असल्या तरी सर्व आर्योद्भव भाषात स्थैर्य हें मान्य केलेंच पाहिजे व त्याची स्थिति मणिपुरी भाषासारखी दररोजीस बदलणारी खास नाहीं. तिसरी गोष्ट धातूसंबंधीं. शब्दाचा अथवा प्रत्ययाचा परिच्छेद करता करता, व्युत्पत्तीनें कीस काढता काढता, क्रियानिदर्शक किंवा पुरुषनिदर्शक असे सार्वनामिक धातूच एकाक्षरी स्वरूपात शेवटीं उरतात.

वर ज्या तीन गोष्टी सांगितल्या त्या सर्व आर्यभाषात सापडतात. पण त्या हुडकून काढून त्यांची प्रतीति होण्यास दृष्टि जरा खोल न्यावी लागते. आणि तिला व्युत्पत्तिशास्त्राच्या अभ्यासानें सुसंस्कृत व शुद्ध करावी लागते परंतु व्युत्पत्तिशास्त्राच्या अभ्यासानें जरी दृष्टि शुद्ध झाली नसली व भाषाशास्त्राचा गंध जरी नसला तरी साध्या माणसालासुद्धा आर्य भाषात काहीं गोष्टी दिसतात. अगदीं वरवर पाहणारासही काहीं गोष्टी ढघड उघड दिसून येतात, व त्याच्या तुलनात्मक अभ्यासावरच बरेचसें अवलंबून आहे. त्या क्रमवार सांगतों. पहिली गोष्ट, नामें आणि क्रियापदें अगदीं परस्पर भिन्न आहेत. नामधातू आणि क्रियाधातू ह्यांच्यात प्रक्रियेमुळें होणाऱ्या स्वरूपात काहीं साम्य नाहीं. प्रत्यय वगैरे लागल्यानंतर तर त्यामध्यें जास्तच फरक दिसून येतो. दुसऱ्या काहीं भाषामध्यें ही स्थिति नाहीं. आयतर भाषात एकच शब्द एकाच वेळीं एकाच वाक्यात निरनिराळ्या संबंधात उपयोगीं पडतो एकच शब्द नामही असेल आणि क्रियापदही असेल. नाम आणि क्रियापद हुडकून काढण्यास त्याच्या संदर्भाकडे पाहावें लागतें. चिनी, ब्रह्मी वगैरे भाषात हा प्रकार सापडतो. आर्यभाषात दुसरी दिसणारी गोष्ट म्हणजे नामाला एकवचन, द्वि-

चन आणि बहुवचन अशी तीन वचनें आहेत, आणि पुष्कळशा विभक्ति आहेत. प्रत्येक बाबतींत प्रत्ययही निराळे आहेत. एकाच प्रत्ययानें दोन संबंध कधींही दाखविले जात नाहींत. निरनिराळ्या आर्यभाषांत विभक्तींची संख्या पांचापासून नवांपर्यंत असते. इतक्या विभक्ति, वचनें, लिंगें ह्यांच्यामुळें प्रत्ययांचा बाजार बराच वाढला आहे. प्रत्यय तयार करण्याचे, लावण्याचे वगैरे नियम सर्व आर्यभाषांमध्यें सारखेच आहेत. अंतर पडलें आहे तें स्वरप्रक्रियेमुळें पडलें आहे. नियमांमध्यें फारसा फरक नाहीं. नामासर्वांचे प्रत्यय वाढले आहेत असें नाहीं तर क्रियापदाचे प्रत्ययही बेसुमार वाढले आहेत. किती तरी काळ, अर्थ उत्पन्न झाले आहेत. भूतकाळ बहुतेक क्रियापदास एकादा आगम लावून किंवा धातूचा अभ्यास करून करतात. आर्यभाषांची आणखी एक विशेष गोष्ट म्हणजे त्यांचें सामासिक रूप. मनांतल्या नानातऱ्हेच्या कल्पनांच्या मुळाशीं असलेल्या कल्पना समासांमध्यें निरनिराळ्या शब्दांच्या रूपानें गोंवतां येतात ही होय. संस्कृत, लॅटीन, इंग्रजी मध्यें हा प्रकार सांपडतो. ज्या तत्त्वावर लॅटीन भाषेपासून इटालीयन, फ्रेंच, इंग्लिश वगैरे भाषा उत्पन्न झाल्या त्याच तत्त्वावर इकडे संस्कृतपासून प्राकृतच्या साहाय्यानें सध्यां प्रचलित असलेल्या बोली तयार झाल्या. हेंही एक प्रकारचें साम्य आहे. अशा प्रकारचीं आंतील आणि बाहेरील किंवा गुप्त आणि उघड साम्यें आर्यभाषांत सांपडतात, व त्यामुळेंच त्या भाषांच्या अभ्यासानें भाषाशास्त्रास मदत मिळण्यासारखी आहे नुसती मदतच मिळून थांबत नाहीं तर सध्यां तरी असा समज प्रचलित आहे कीं, भाषाशास्त्र म्हणजे ह्याच भाषांच्या अभ्यासावर उभारलेलें शास्त्र सर्व आर्योद्भव भाषांत क्रियादर्शक धातू असतात व त्यापासून एकाच पद्धतीनें नाम, क्रियापद किंवा शब्दाचे इतर प्रकार तयार करतात वाक्यामध्यें एकमेकांशीं संबंध दाखविण्याची सर्व आर्यभाषांमध्यें एकच तऱ्हा आहे, व कांहीं महत्त्वाचे शब्द, सर्वनाम, संख्यावाचक शब्द आणि नातीं दाखविणारे शब्द बहुतेक सारखे सांपडतात. ह्या आर्योद्भव भाषांच्या सर्वसाधारण बाबी झाल्या. ह्यांच्या साहाय्यानें सर्व आर्योद्भव भाषांमध्यें एकसूत्रीपणा कोणकोणत्या बाबतींत आहे ह्याचा उलगडा होतो पुन प्रत्येक भाषेत कांहीं कांहीं विशेष आहेत. प्रत्येकीच्या कांहीं खाणाखुणा आहेत उदाहरणार्थ, संस्कृत-

मध्यें मूळ भाषेंतल्या 'स'चा 'ष' होतो. उ०—'विष्ठति.' 'अ' ची कधीं 'इ' होते उ०—पितर. आर्मीनियन भाषेमध्यें शब्दांचा शेवट शिवायकरून इतर ठिकाणीं इ आणि उ चा लोप होतो. 'न' चा 'ण' होणें; 'ल' चा 'ळ' होणें 'र' चा 'ल' होणें वगैरे कांहीं फरक होतात. आणखीही कांहीं फरक होत असतील पण फार खोल पाण्यांत शिरणें इतक्यांतच बरें नव्हे.

केवळ 'स्' चा 'श्' होणें आणि त्याचाच 'ख्' किंवा 'क्' होणें ह्या साध्या फरकावरून भाषेचे निरनिराळे प्रकार कल्पिले आहेत. एका पाश्चात्य भाषेंत शंभर ह्या अर्थी केंटुम् शब्द आहे. तोच शब्द संस्कृतमध्यें शतम् किंवा अवेस्तामध्यें सेतम् असा होतो. ह्यावरून भाषाचे दोन प्रकार कल्पिले आहेत. एक वर्ग कॅंटम् भाषा आणि दुसरा वर्ग सॅटम् भाषा. "महाभारतांत तुखार लोकांचा उल्लेख खश लोकांच्या बरोबर केला आहे. त्याच्या भाषेबद्दलचा शोध नुकताच कांहीं विद्वानांनीं लावला आहे. तुखारी भाषेमध्यें शंभरास खंट म्हणून शब्द आहे, त्यामध्यें 'ख' आहे म्हणून त्या भाषेसही कॅंटम् भाषांच्या वर्गांत घातला आहे. भाषेचे जे वर्ग करावयाचे ते वाटेल तसे करून चालेल कीं काय ? फ्रेंच ही शौरसेनी, मागधी ह्यांच्या वर्गांत किंवा लॅटीनोद्भव भाषाच्या 'वर्गांत मराठीस बस-वायचें कीं काय ? वर्ग जे करावयाचे ते कांहीं तरी साधारण मुद्द्यावरच करावयास नकोत काय ? इत्यादि प्रश्न वरीलप्रमाणें भाषांची वर्गवारी करतांना पुढें उभे राहतात. व त्यांना समाधानकारक उत्तर मिळत नाहीं

इंडोजर्मन अथवा इंडोयुरोपियन अथवा आपण मानलेल्या आर्योद्भव भाषा ह्यांबरोबरच दुसरी एक भाषेची जात आहे. ती सेमिटिक अथवा शिमी भाषा. सेमिटिक आणि हेमिटिक भाषा ह्यांचा संबंध फारच आहे.' सेमिटिक वर्गांत अर्बी, हिब्रु, असीरिक, अरमायिक भाषा येतात. ह्या भाषांचे विशेष म्हणजे त्यामधील क्रियापदें. मूळ धातू आर्योद्भव भाषा-सारखा एकाक्षरी असत नाहीं. तर ह्यामध्यें तीन व्यंजनें असतात. आणि क्रियापदांचीं रूपें फार होतात कारण क्रियापदाच्या रूपामध्येंच नाम, विशे-षण ह्यांचीं रूपें असतात.

तिसरा वर्ग तुरेनियन भाषांचा ह्यांमध्यें दोन शाखा आहेत, एक उत्तर तुरेनियन भाषा आणि दुसरी दक्षिण तुरेनियन भाषा. दक्षिण तुरे-

नियम मापाचा हिंदुस्थानांतहीं सबंध येतो. ह्या दक्षिण तुरेनियन भाषा-पासूनच हिमालयांतील निरनिराळ्या बोली सुरू झाल्या आहेत. कोळ लोकांची भाषा, लोहिती, यक वगैरे शेंकडों भाषांची जननी दक्षिण तुरेनियनच आहे. उत्तर तुरेनियनपासून रशियांतील सर्व भाषा, चिनी, जपानी, कोरिनियन वगैरे पुष्कळ भाषा निघाल्या आहेत युफ्रेटीस नदीच्या खोऱ्यापासून तों थेट जपानच्या अथवा पूर्व टोंकापर्यंतचा आणि हिमालयाचा प्रदेश आणि हिंदुस्थानांतील रानटी लोकांनीं एकेकाळीं व्यापलेला डोंगर दऱ्याचा प्रदेश इतका सर्व प्रदेश टयुरेनियन लोकांनींच एकेकाळीं व्यापला होता. पौर्वात्य सर्व देशांत त्यांचीच वस्ती असली पाहिजे. आर्यांच्या टोळ्या जशा वरून खालीं येऊं लागल्या किंवा मध्य आशियांतून खालीं उतरूं लागल्या आणि आपल्या उत्तम संस्कृतीनें मूळ रहिवाशांस आपल्या पुढें हाकलून काढून आपली वसाहत कायम करूं लागल्या तसतसे मूळच्या लोकांना डोंगरकडडींचा आसरा धरून दडी मारून बसावें लागलें ह्या प्रकारानें सिंध प्रांतांत पांच नद्यांच्या खोऱ्यांत नंतर सरस्वती व दृषद्वतीच्या दुआबा-मध्यें त्यांनीं आपली वसाहत केली, अर्थातच वाटेंत आडवे आलेले रहि-वासी कांहीं खालीं गेले आणि कांहीं तेथल्या तेथेंच जंगलांत पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांत लपून छपून राहिले. खालीं आलेल्यापैकीं कांहीं विंध्य सातपुड्याच्या दऱ्यांत राहिले, त्यानाच हल्लीं भिल्ल, गोंड अशीं नांवें आहेत. तेथून कांहीं लोक खालीं आले आणि हिंदुस्थानच्या द्विपकल्पाच्या दक्षिण प्रांतीं येऊन राहिले. हिमालयांतील भाषा, नेपाळांतील भाषा, आसामाकडील टागरी भाषा, विंध्य सातपुड्यांतील भिल्लांची भाषा आणि कर्नाटकांतील चार मुख्य भाषा ह्या सर्व भाषांचा उगम एकाच स्थाना-पासून असला पाहिजे. कानडी, तामीळ तेलगु, मल्याळी, ह्या चारीही भाषा तुरेनियन वर्गांत जातात. ह्या भाषा बऱ्याच सुधारलेल्या आहेत. नामाच्या, आणि क्रियापदाच्या रूपामध्यें त्यांमधील प्रत्ययांची सामुग्री दिसते त्या कांहीं अशीं ' सप्रत्ययी ' व कांहीं अशीं ' अप्रत्ययी ' आहेत. कांहीं कांहीं वेळीं तुर्की भाषाप्रमाणें शब्दनिगडीतही आहेत.

येथेंच अनुषांगक रीतीनें येणाऱ्या दुसऱ्या प्रश्नाचा उदाहरणार्थ, संस्कृत भाषा बोली होती किंवा कसें, हिंदुस्थानांतील बोली संस्कृतोद्भव

आहेत किंवा नाहींत, प्राकृताचा उदय कोणत्या काळीं झाला वगैरे मुद्दयाचा उल्लेख इतरत्र यावयाचाच आहे, व तेथें त्याचें विवेचन केलेंच आहे. सध्याच्या संस्कृतोद्भव बोलींनीं किती प्रदेश व्यापला आहे व बोलणाऱ्या मत्र्य लोकांचीही संख्या किती आहे ह्याविषयीं विचार करूं.

इंडिक म्हणून जो वर्ग आहे त्यामध्यें संस्कृत आणि पारशांच्या धर्मग्रंथाची अवेस्ता अशा दोन भाषा येतात. संस्कृतपासून निघालेल्या प्राकृत आणि प्राकृतोद्भव प्रचलीत असलेल्या सर्व बोली ह्याच वर्गाखालीं येतात. बुद्धाच्या मातृभाषेचा मान मिळालेली मागधी, बौद्धी वाङ्मयाची पाली, श्रीकृष्णाचे यादव वापरीत असलेली शौरसेनी, महाराष्ट्री, शिवाय जैनांच्या धर्मग्रंथाची भाषा व त्या सर्वांपासून निघालेल्या हिंदी, बंगाली, पंजाबी, सिंधी, मराठी, गुजराथी, नेपाळी, उडिया, असामी, काश्मिरी, डोग्रा वगैरे हिंदुस्थानातील भाषा इंडिक वर्गांतच मोडतात हिंदुस्था नातल्या सध्याच्या वोर्गांत पुन पुष्कळ भेद आहेत. हिंदीचे उदाहरणार्थ मिथिल, मगध, भोजपुरी, कोसली, ब्रजभाषा, कनोजी, रजपुती सर्व भाषा, बुंदेलखंडी सर्व भाषा—हे सर्व प्रकार हिंदीचे आहेत. पंजाबीपासून तर इतके कांहीं भाषेचे प्रकार निघाले आहेत कीं, पंजाबातील प्रत्येक जिल्ह्याच्या वाट्यास एकेक भाषा येईल, कांहीं जिल्ह्यात दोन दोन, तीन तीन भाषा आहेत सिंधी भाषेचे सिराई, विचोली, लारी, मुल्तानी व कच्छी इतके प्रकार आहेत मराठीचे चार प्रकार आहेत कोंकणी, दक्षिणी, गोमांतकी, खानदेशी वगैरे प्रकार होत गुजराथीचे सुरती, चरोत्तरी, अमदाबादी, काठेवाडी असे चार प्रकार प्रसिद्धच आहेत. नेपाळीचे तर इतके कांहीं प्रकार आहेत कीं, प्रत्येक डोंगराच्या पलीकडे भाषा एक व अलीकडे भाषा एक अशी स्थिति आहे त्याचप्रमाणें नदीच्या एका तिरावर भाषा एक व दुसऱ्या तिरावर भाषा दुसरी. साधारणपणें पाऊणशें माणसास एक भाषा पडत ह्या भाषांचा अभ्यास अद्याप म्हणण्यासारखा झाला नाहीं हे शारीरिक भेद सोडून दिले तर मुख्य असे चारच प्रकार दृष्टीस पडतात ते पाल्पा, कामाऊ, गारवाल, थारु हे होत.

आर्यभाषेचाच इराणिक किंवा पारसिक म्हणून एक वर्ग पडतो. त्या वर्गी

मध्यें झेंद किंवा पुराण फारशी भाषा येते. संस्कृताशीं तिचें विलक्षण साम्य सांपडतें. त्यांमधील कोणताही श्लोक घेऊन त्यांमध्यें स्वरप्रक्रियेचे कांहीं साधारण फेरबदल केले म्हणजे तो श्लोक वेदांतील ऋचेसारखा वाटतो. झेंद हें खरें पाहिलें असतां भाषेचें नांव नव्हे. हिंदुस्थानांतील आर्यांचा प्रमाण ग्रंथ जसा वेद तसाच पारशी लोकांच्या पवित्र ग्रंथास झेंद अवेस्ता म्हणतात. हा सबंध ग्रंथ श्लोकबद्ध आहे. प्रत्येक श्लोकाचे दोन भाग असतात; अवेस्ता म्हणजे मूळ आणि त्यावर जी टीका आहे तीस झेंद असें नांव आहे. कालांतरानें मूळासंबंधीं ज्ञान कमी कमी होत गेलें आणि टीकाच जास्त सर्वमान्य होत गेली. ह्याच पुस्तकांच्या कांहीं भागास गाथा म्हणतात. आणि ह्या गाथा त्याचा देव झरतुष्ट ( जरत्वष्ट्र ) ह्यानें लिहिला अशी त्यांची समजूत आहे. संस्कृतपासून जशा प्राकृत आणि पाली निघाल्या त्याचप्रमाणें ह्या भाषेपासून पेल्हवी व इजवरेष नावाच्या भाषा निघाल्या आहेत. हिंदुस्थानांत पारशी रहिवाशी कायमचे झाल्यामुळें व पुढें मुसलमानांशीं राज्यकर्ते ह्या नात्यानें जास्त परिचय झाल्यामुळें ह्या भाषाशीं आपला बराच संबंध आला. इराणिक वर्गांत पाच भाषा येतात. पर्शियन ( संध्याची ), कुर्दिश, पुश्तु असिहान, आणि अर्मीनियन; त्यांपैकीं पहिल्या तीनच आपणास विचारांत घ्यावयाच्या आहेत. कारण उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं प्रांतांत त्यांचा अमल अद्याप चालू आहे. पंजाबमध्यें पुश्तु भाषा बोलणारे पुष्कळच आहेत. बलुचिस्थानांतील डोंगराळ प्रांत सोडून दिला तर बाकीचे कुर्दिश आणि पर्शियन यांच्या मिश्रणापासून झालेलीच भाषा बोलतात.

तुराणी अथवा टयुरेनियन भाषेचे तीन वर्ग पडतात. आपणास उत्तर तुराणी वर्गाशीं कांहीं कर्तव्य नाहीं. कारण त्याचा हिंदुस्थानाशीं कांहीं संबंध येत नाहीं. दुसरा दक्षिणी तुराणी वर्ग, ह्या वर्गांपैकीं हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या पुष्कळ भाषा येतात. त्यांमध्यें सयामी, कांबोजी, लौओस ( मध्य सयामांत चालणारी ), ब्रह्मदेशांत चालणारी खाति, पेगूच्या आसपास चालणारी चिनी, ब्रह्मदेशाच्या ईशान्य कोपऱ्यांतील शान, आणि उत्तर ब्रह्मदेशांतील पलाङ्ग अशा भाषा येतात. त्यापुढचा हिमालयांतील प्रदेशांत चालणाऱ्या भाषांचा वर्ग. ह्या प्रदेशांत भाषांचा

इतका बजबजाट झाला आहे कीं, त्याची एक म्हणून कोणतीही संख्या देणें अशक्य आहे प्रत्येक चार चार गावास एकेक भाषा पडते मोल्या, लेपच्या, लिंबु, सुर्मी, गुरुग, नेवार, मागरझू, सुनुवार, सपी, कनावरी, हुडेशी, डेन्वार, पाहरी, धारवार, पारव्य ह्या त्यांपैकीं मुख्य होत. ह्याशिवाय मध्य नेपाळातील भाषा वेगळ्याच. त्या काहीं तेवीस आहेत असें म्हणतात. अहीवर्गात २६ उपभाषा येतात. कोल भाषेंत ९ उपभाषा येतात तुराणी भाषेशीं संबंध यणाऱ्या उत्तर हिंदुस्थानातील ह्या भाषा झाल्या, त्याच भाषेशीं संबंध येणाऱ्या काही भाषा दक्षिण हिंदुस्थानात चालू आहेत त्यामध्य मोडणाऱ्या भाषांपैकीं तेलगु, तामील, कानडी, मल्याळी, तुळु आणि कुर्ग संस्थानात चालणारी कोडुगु, ह्या मुख्य होत. निलगिरी पर्वताच्या डोंगराळ प्रदेशातही भाषाचा पुष्कळ भरणा आहे. तुडुबुडु गर, इरूलर, कोहतर, वगैरे भाषा तेथें चालतात सिंहलद्वीपात सिंहली भाषा वापरतात. सिंहली भाषा कोणत्या भाषेपासून आली हें सांगता येणें कठीण आहे तिच्यात पुष्कळ भाषाची सरमिसळ झाला आहे. सम्राट् अशोकाच्या भावानें महेन्द्रानें त्या वेळेस बुद्धधर्माची तेथील लोकास दीक्षा दिली त्या वेळेस त्यानें आपल्या पवित्र भाषेचाही प्रसार मोठ्या जारीनें केला सिंहलीमध्य संस्कृत शब्दाचाही भरणा बराच आहे. पाली आणि संस्कृत ह्या दोन भाषाचा संपर्क तेथें अगोदरच चालू असलेल्या भाषाशीं बुद्धभिक्षुप्रचारकामुळें आला अशा रीतीनें सिंहलद्वीपाच्या भाषेंत संस्कृत, पाली, आणि तद्देशीय भाषा ह्याचा मिलाफ झाला आहे हिंदुस्थानात चालणाऱ्या भाषाचें हें साधारण दिग्दर्शन आहे आता ह्यापैकीं कोणतीनें किती प्रदेश व्यापला आहे हें पाहू. १

*पुस्तुभाषा बालणारे लाक सुमारे नऊ लाख आहेत पंजाबच्या वायव्य टोंकापासून हिला सुरुवात होते पेशावर, हजारलोर, सिंधुनदाच्या पूर्वेकडील खोरें ह्यामध्य हीच भाषा वापरतात पंजाबातील डोंगराळ प्रदेशात, काश्मिरात डोग्रा नावाची भाषा बोलतात डोग्राभाषा बोलणाऱ्याची संख्या अजमासें सात लाख पर्यंत येते तिला लगतच पंजाबी

१ भाषाचा एकदर वंशविस्तार शेवटीं जोडला आहे तो पहावा.
* प्रथम जोडलेला नकाशा पहावा

भाषेचा प्रदेश आहे. पश्चिमेस सिंधुनद आणि पूर्वेकडील सतलज नदीपर्यंत आणि डोंगराळ प्रदेशापासून तो थेट मुलतानपर्यंतचा प्रदेश पंजाबी भाषेनें व्यापला आहे. पंजाबांतील कोणतेंही शहर घेतलें तर पंजाबी भाषा म्हणजे एकच मासल्याची बोलली जाईल असें नाही. त्यांतल्यात्यांत शुद्ध पंजाबी रावी आणि बियास ह्या दोन नद्यांमधील प्रदेशांत बोलली जाते. खरें पाहू गेलें असता पंजाबीभाषा हिंदिचीच एक पोटभाषा आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं, कारण त्या नात्यानें प्राकृतपैकीं शौरसेनी प्राकृताशीं तिचा संबंध फार येतोसा वाटतो. पंजाबी भाषेनें लिपी मात्र निराळी उचलली आहे. भाषा जरी आर्योद्भव आहे तरी इतर भाषाप्रमाणें लिपी देवनागरी नसून उर्दु आहे, व त्यामुळें भाषा सुद्धा चुकीनें उर्दूचीच एक पोटभाषा आहे असा कधीं कधीं गैरसमज होतो. सिंधी भाषेचीसुद्धां हांच तऱ्हा आहे. सिंधी भाषेंत लिहितांना दोन प्रकारच्या लिपी वापरतात. भाषा सिंधी, लिपी मात्र उर्दु असते. किंवा तीच भाषा " गुरुमुखी " म्हणून एक लिपी आहे तींत लिहितात. पंजाबीभाषा बोलणाऱ्यांची शिरोगणति साधारणपणें एक कोटी सात लाख आहे.

ह्याच भाषेशीं लगतच सतलज नदीच्या दक्षिण आणि पूर्वेस हिंदी भाषेचा अमल सुरू होतो. आणि हिंदुस्थानांतील कोणत्याही बोलीपेक्षा हिनें जास्त प्रदेश व्यापला आहे. हिची पश्चिमेच्या बाजूची सरहद्द सरहिंदपर्यंत जाते. पुढें नैऋत्येच्या बाजून खालीं जात जात पत्याळा आणि भावलपूर संस्थानांतील अरण्यांतून वाट काढीत काढीत पंजाबीच्या अनुरोधानें येऊन जैसलमीरजवळ ती सिंधीची गांठ घेते. नंतर पश्चिमेच्या बाजूस वळून पुढें जात जात एका बाजूस गुजराथी टाकते आणि थोडें पुढें जाऊन मराठीच्या प्रांताच्या हद्दीशीं हद्द नेऊन भिडविते. इंदोरच्या जवळ आसपास हिन्दी भाषाचा अमल थोडाबहूत दिसून येतो. पूर्णेजवळ बंगालीची आणि हिची भेट होते. हिंदी भाषा बोलणारे लोक पुष्कळ आहेत त्यांची संख्या सहा कोटी, सात लक्ष त्रेसष्ट हजारावर आहे. सर्वांत ह्या भाषेंतच भरणा विशेष आहे. ही भाषा अतिशय मजेदार आहे. हिंदुस्थानांतील प्रत्येक भाषेंतील चांगुलपणा ह्या भाषेंत उतरला

आहे. भाषा अतिशय डौल्दार, श्रवणहारी, भाव आतील भावनाप्रमाणे प्रगट करणारी, कानाला गोड, बोलायला गोड, अर्थाला गोड, परिस्थितीस साजेशी, सभ्य, सौम्य, गंभीर, मृदु, असे सर्व कांहीं गुण एकवटलेले आहेत. हिला संस्कृतच्या संगतीनें भारदस्तपणा आला आहे. उर्दूच्या व फारशीच्या सहवासानें बोलण्यांतील स्वैपेचेपणा नाहींसा झाला आहे. गुजराथी आणि बंगालनें आपलें उच्चारमाधुर्य दिलें आहे. मराठीनें आपला कणखरपणा देऊन आपला त्या भाषेशीं स्नेह जागृत ठेवला आहे. हिंदी भाषेमध्यें वाङ्मयसंपत्तिही पुष्कळ आहे, व सध्या जारीनें वाढत आहे. व त्यामुळें भाषत अव्वल अखेर जिवतपणा दिसतो. तुळसीदास, सूरदास, भक्तिचरित्रकार नाभाजी आणि त्याचा शिष्य प्रियादास वगैरेंनीं भाषेवर पुष्कळ उपकार केले आहेत व तिला ओजस्विता व सामर्थ्य आणून दिलें आहे. ह्या तिच्या सर्वरूप गुणानींच इतर भाषा बोलणाऱ्यांवर तिनें भुरळ टाकली आहे. व भाषेची महत्त्वाकांक्षा ही आहे कीं, आपला ताबा सर्व हिंदुस्थानभर चालावा. युरोपमध्यें प्रत्येक देशांत भाषा निराळी आहे. परंतु व्यापार राजकारण व इतर सर्व मानमर्दांचे व्यवहार सर्व देशांतील लोकांशीं सुरळीत बिनबोभाट चालावेत एतदर्थ एक भाषा वापरणें फार हितावह होतें. त्याप्रमाणें तेथील लोकांनीं फ्रेंच भाषा वापरण्याचा प्रघात पाडला आहे. युरोपमधील इतर भाषाचे आणि फ्रेंच भाषेचें बऱ्याच नात्यांत जुळतें म्हणून तातून व्यवहार केल्यास अडचण पडत नाहीं. त्याचप्रमाणें हिंदी भाषेचें आहे. तिचा संबंध हिंदुस्थानांतील आर्योद्भव मुख्य बोलींशीं अगदीं निकट आहे पंजाबी, सिंधी, गुजराथी, मराठी, बंगाली, ओरिया वगैरे भाषा बोलणारांना हिंदी भाषा समजण्यास अडचण पडत नाहीं. म्हणूनच हिंदी भाषा अखिल हिंदुस्थानची भाषा व्हावी असं कित्येकांचें म्हणणें आहे, व तसें ठरावहा कांहीं अधिकारी सरकारांनीं केले आहेत. अशा व्यवस्थेनें लोकव्यवहार जास्त सुकर होईल ह्यांत कांहीं शंका नाहीं. शिकलेल्या वरच्या वर्गाच्या लोकांत व्यवहारासंबंधीं ज्याप्रमाणें इंग्लिशनें ठाणें पटकावलें आहे तेच स्थान हिंदीस यावं असें त्यांचं म्हणणें आहे. कांहीं कांहीं विद्यालयांच्या अभ्यासक्रमांत हिंदीचा समावेशही केला आहे. ज्याप्रमाणे देशांत लिपी एक असणं किंवा नाणं, भापें एक असणं गरज

आहे त्याचप्रमाणें आचार विचार सुकर सुगम होण्यासाठीं एक भाषा असणें हेंसुद्धां त्यापेक्षांही न्याय्य आहे. ह्याला खरी अडचण दक्षिण हिंदुस्थानची. हिंदीस अखिल हिंदुस्थानच्या एकभाषात्वाचा सन्मान देणें हा विषय कितीही मोहक असला तरी दक्षिणेकडे पाहिलें म्हणजे तो मोहक प्रश्न बाजूस सारावासा वाटतो. हिंदी भाषा आर्योद्भव असल्यामुळें दुसऱ्या इतर आर्योद्भव भाषा बोलणाऱ्यास हिंदी भाषा बोलण्यास व समजण्यास अडचण पडणार नाहीं हें खरें तरी पण कानडी, तामील, तेलगू व मल्याळी व आणखी इतर भाषा बोलणाऱ्यांची वाट काय ? त्यांना हिंदींतील कांहींसुद्धां समजणार नाहीं. संस्कृतमधील तत्सम, तद्भव वगैरे जातीचे तेवढे शब्द समजतील. तेसुद्धा सर्वांना नव्हे तर थोड्या सुशिक्षितांना. पण पुढें काय ? व्याकरण निराळें, एकदर मोडणी निराळी. एक आर्योद्भव तर दुसरी द्राविडी. खरे हिंदुस्थानाचा प्रश्न काढला तर दक्षिण हिंदुस्थानातील लोक सोडून चालणार नाहींत. व ते कांहीं कमी नाहींत. तेव्हां त्याचा विचार अवश्य कर्तव्य आहे त्यांना तर हिंदी भाषा मराठी भाषा बोलणारास जितक्या थोडक्या वेळांत व सोप्या रीतीनें समजेल तशा तऱ्हेनें समजणार नाहीं. तर मग त्यापुढें दोन मार्ग राहतात. एक त्या सर्व द्रवीड लोकांना ही भाषा शिकविणें किंवा दुसरा मार्ग म्हणजे सर्व हिंदुस्थानानेंच ह्या स्वदेशी भाषेचा अभिमान सोडून देऊन दुसरी कोणची तरी भाषा उसनी आणली पाहिजे आणि तिचा अभ्यास आर्योद्भव भाषीयांवरच नव्हे तर सर्व द्राविडी भाषीयांवरसुद्धा लादला पाहिजे. अशी भाषा म्हणजे इंग्लिश. आता राज्यकर्त्यांची भाषा म्हणून तिच्या अध्ययनापासून पुष्कळ फायदे होण्याचा संभव आहे. तरी पण येथें केवळ आर्थिक फायद्याचा हा प्रश्न नसून देशातील भाषेच्या अभिमानाचा प्रश्न आहे व तो प्रश्न अभिमानास न दुखवितांच सोडविला पाहिजे. श्रम तर दोन्हींत सारखेच पडणार. द्रविडी लोकांना हिंदी काय किंवा इंग्रजी काय दोन्ही भाषा परक्याच. उलट हिंदीपेक्षा इंग्रजी शिकण्यास जास्त वेळ व प्रयास लागतील. हिंदीमध्यें असलेला संस्कृत शब्दसमूह द्रवीडी लोकांच्या परिचयाचाच असतो. तसा इंग्लिशमधील नाहीं, इंग्लिश न आणतां जर

हिंदीच एकभाषा म्हणून कायम केली तर सिंधी, पंजाबी, मराठी, गुजराथी वगैरे भाषांवाल्यांना तरी इंग्लिश शिकण्याचा त्रास पडणार नाही. हिंदीच्या बाबतीत केव्हांही फायद्याचें कलम आहे.

हिंदी भाषेच्या नांवाबद्दल आणि तिच्या पोटभाषांबद्दल बराच घोंटाळा आहे. विद्वानामध्यें ह्याबद्दल द्विमत आहे. काहींचें म्हणणें असें आहे कीं, हिंदी भाषा एक आहे आणि पूर्वेकडे व पश्चिमेकडे ज्या काहीं निरनिराळ्या भाषा बोलल्या जातात, त्या हिंदीपासूनच निघाल्या आहेत. दुसरे काहीं लोक असें म्हणतात कीं, हिंदीमध्येंच दोन वर्ग आहेत. एक पूर्व हिंदी आणि दुसरा पश्चिम हिंदी. पूर्वेकडच्या प्रांतांत चालणाऱ्या भाषा, अलाहाबाद-बनारस वगैरेकडे चालणारी आवधी पुरबी भाषा, रेवागोंडवाण येथें चालणारी बाघेली भाषा, आणि बिलासपूर, रायपूर, व छोटानागपूर येथील छत्तिसगडी ही भाषा; ह्या सर्व पहिल्या पूर्व हिंदीच्या वर्गांत येतात. दुसऱ्या पश्चिम हिंदीच्या वर्गांत व्रजभाषा, बुंदेली आणि कनोजी भाषा ह्या मोडतात. हिंदी भाषेमध्यें असे दोन वर्ग परवापर्यंत मानले जात नव्हते. डॉ० भांडारकर वगैरे विद्वान लोक ह्या सर्व भाषांना एका हिंदीच्याच पोटभाषा म्हणत असत. दोन्ही वर्ग दोन प्राकृतापासून निघाले आहेत म्हणून वरील विधानास जास्त बळकटी येते. शौरसेनी अपभ्रंशापासून पश्चिम हिंदी भाषा निघाली आहे. शौरसेनी अपभ्रंशामध्यें संस्कृत शब्दांचा भरणा बराच आहे, मनुस्मृती वगैरे ग्रंथांत मध्य देश म्हणून जो पवित्र देश उल्लेखिला आहे त्या देशामध्यें सध्या पश्चिम हिंदीच वापरली जाते. दोन्ही वर्गांच्या भाषांत लागणाऱ्या विभक्तिप्रत्ययांत बराच फरक आहे. कु, कौ, के, हु वगैरे प्रत्यय व्रजभाषेंत वापरतात. आवधी भाषेंत 'का' प्रत्यय लावतात. आसपासच्या भाषांच्या सान्निध्याचाही परिणाम भाषेवर झाला आहे. पंजाबीची पश्चिम हिंदीवर आणि बंगालीची पूर्व हिंदीवर क्रियापदाच्या वगैरे स्वरूपांत छाया पडलेली दिसते.

हिंदुस्थानांतील चांगल्या भाषांपैकीं बंगाली एक आहे. वाङ्मयाच्या दृष्टीनें बंगाली भाषा फारच संपन्न आहे. बंगालमधील लोक सर्व बाबतीं-

तच पुढें आहेत. काव्य, शास्त्र, राजकारण वगैरे महत्त्वाच्या बाबतींत बंगाली लोकांनीं हिंदुस्थानातच नव्हे तर सर्व पृथ्वीवर चांगलें नांव मिळविलें आहे. अशा लोकांची भाषाही सर्वांच्या पुढें असावी ह्यांत काय नवल ? कविवर रवीन्द्रनाथ टागोर ज्या भाषेंत आपल्या कविता गातात, पृथ्वीशचंद्र राय, जगदीशचंद्र बोस हे ज्या भाषेत आपले शास्त्रीय शोध आपल्या बांधवांस सांगतात, जदुनाथ सरकार व राखलदास बानर्जी ज्या भाषेंत आपल्या इतिहासाची जाणीव आपल्या लोकांस पटवितात ती भाषा सर्वांत अग्रस्थान मिळविल्यावांचून कशी राहील ? बंगाली भाषा ललित वाङ्मयानें तर फारच सुसंपन्न आहे. बंगालासारखें भांडार दुसऱ्या कोणतींतही सांपडणार नाहीं. बंगाली भाषेंत उधारमाधुर्यही पुष्कळ आहे. संस्कृत शब्द उचलण्याची प्रवृत्ति फार दिसून येते, ती इतकी कीं, भाषेंत त्याच्यामुळें दोन प्रकार दिसून येतात. शिकलेल्यासवरलेल्याची भाषा निराळी आणि गांवढ्याची भाषा निराळी. गांवढ्याच्या भाषेस संस्कृतचा विशेष स्पर्श नसतो. कलकत्ता जर मध्यावर धरलें तर त्याच्या पूर्वेस रंगपूर, मैमनसिंग, डाक्का, बारिसाल वगैरे ठिकाणची एक पोट-भाषा दिसते आणि पश्चिमेस नडिया वगैरे परगण्यांत दुसऱ्या पोटभाषा चालतात. पर्णे किंवा दिनाजपूर ह्यांच्यामध्यें हिंदीची हद्द संपते आणि बंगाली सुरू होते. उत्तरेस आसामापर्यंत हिमालयांतील द्राविडी भाषा येतात दक्षिणेस एका बाजूस ब्रह्मपुत्रा नदाच्या पूर्वेस असणाऱ्या टेकड्या येतात. तेथ काहीं डोंगरी लोक असतील पुढें जात जात चितागांगपर्यंत बंगालीचा अमल कमी कमी होत जातो पुढें हिंदीशीं संबंध आल्यामुळें एक भेळगुजरी बंगाली तयार होते. पश्चिमेस राजमहाली टेकड्यांनीं बंगालीस अडवून धरलें आहे बंगाली भाषा बोलणाऱ्यांची संख्या दोन कोटी पांच लाख श्यायशीं हजारांवर आहे.

तिच्याच पुढें आसामी भाषा येते. बंगालीचें आणि आसामीचें बरेंच साम्य आहे त्याच्या बाजूस ओरिसामध्यें ओरिया किंवा उत्कली भाषा प्रचारांत आहे सुवर्नरेखापासून गंजमपर्यंत समुद्राच्या किनाऱ्या किनाऱ्यानें ही भाषा जाते. ओरिया भाषा बोलणार लोक ९० लाख आहेत. दक्षिणेस ओरियाचा संबंध तेलगू भाषेशीं येतो. पश्चिमेस हिंदी

येऊन तिच्या पलीकडे एका बाजूस गुजराथीचा आणि दुसऱ्या बाजूस मराठीचा प्रदेश सुरू होतो.

गुजराथीनें पूर्वोक्तच्या बराचसा मुलूख व्यापला आहे. ह्या भाषेंतही वाङ्मय चांगलें आहे. दरवर्षी पुस्तकेंही ह्या भाषेंत बरींच बाहेर पडतात. उच्च किंवा गहन विषयावर हल्लींही पुस्तकें नसतात हें खरें आहे. बहुतेक लोकांचा कल अमेरिकन लोकांप्रमाणें लक्ष्मीचीच उपासना करण्याकडे असल्या कारणानें सरस्वतीच्या आराधनेकडे विशेषसें कोणाचें लक्ष नसतें. प्रेमानंद, मिराबाई, नरसिंहमेहता ह्यांच्या काव्यानें भाषेस विशेष शोभा आली आहे. साक्षर गोवर्धनराम त्रिपाठी यांच्या सरस्वती चंद्रानें कोणत्याही भाषेस खालीं पाहावयास लावलें आहे. जैन मार्गीय किंवा वल्लभपंथी वैष्णव किंवा रामानुज मतानुयायी ह्यांच्याकडून गुजराथींत झालेल्या वादविवादानें वेदांती वाङ्मयाचीही उणीव भरून काढली आहे. गुजराथ देश जसा संपन्न तशी भाषाही संपन्न आहे. लोक जसे सुरती, मुखास लालचावलेले, शांतिप्रिय तशी भाषाही शांतिप्रिय आहे. ऐकण्यास रम्य दिसण्यास गोंडस अशी गुजराथी भाषा आहे. अगदीं वीरश्रीची भाषा देखील इतकी जोरदार लागत नाहीं. गुजराथी भाषा दरबारी दिसते. गुजराथमधील जमीन जशी वाळूमुळें भुसभुशीत आहे तशी भाषाही भुसभुशीत आहे. बंगालीप्रमाणें गुजराथी भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा बराच असतो. मराठी भाषा जितकी संस्कृतपासून दूर आहेशी वाटते तितकी गुजराथी दूर आहेशी वाटत नाहीं. मराठींत संस्कृत शब्दांचा जितका अपभ्रंश होतो तितका गुजराथींत होत नाहीं, पण जो होतो तो मात्र फार चमत्कारिक होतो. गुजराथींत तीन पोटभाषा आहेत. त्या तिन्हींत म्हणण्यासारखें अंतर नाहीं. सुरतेस एक प्रकार, अमदाबादेस दुसरा आणि काठेवाडांत तिसरा असे गुजराथीचे तीन प्रकार आहेत. ह्या भाषेच्या पश्चिमेच्या हद्दीचा प्रश्नच नाहीं. कारण सर्व दिशा समुद्रानें व्यापली आहे. उत्तरेस मारवाडी भाषा आणि राजपुतान्यातील राजस्थानी, हिंदी वगैरे भाषांचा मुलूख आहे. पूर्वेस व दक्षिणेस मराठी आणि तिचाच एक पोटभेद खानदेशी म्हणून आहे, त्याचा प्रदेश येतो. पश्चिमेकडे थोडासा कच्छी भाषेशीं संबंध येतो व तिच्या पलीकडे

उत्तरेस एका बाजूनें सिंधीही येते. अगदीं प्राचीन काळीं हा प्रदेश लाट, आभिर, भिल्ल वगैरे मूळ एतद्देशीय लोकांनीं व्यापला होता व त्यांच्या भाषाही लाटी, आभिरी वगैरे होत्या. त्यापैकीं कांहींचे अवशेष नर्मदेच्या काठीं वस्ती करून जे लोक राहिले त्यांच्या भाषेमध्यें दिसून येतात पुढें गुर्जर नावाचे लोक पंजाब, राजपुताना, माळवा वगैरे प्रांतातून आले आणि त्यांनीं ह्या सुपीक, सपाट देशांत वस्ती केली असें इतिहास सांगतो. गुर्जर लोक मूळचे उत्तरेकडचे पुराणग्रंथावरून असेंही अनुमान निघण्यासारखें आहे कीं, हे गुर्जर लोक कुबेराचे सेवक जे " गुह्यक " त्याचे वंशज असावेत. कुबेर म्हणजे देवांचा राजीनवीस व हे त्याचे सेवक. त्याअर्थीं संपत्तीबद्दलची त्यांची आतुरता त्यांच्या वंशजांमध्येंही सध्या सांपडते ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. गुजराथ अतिशय साधा प्रदेश आहे. डोंगर, नद्या, अरण्यें वगैरे कांहीं फारशीं नाहींत त्यामुळें वरील प्रदेशांतून मनुष्य खालीं येण्यास निघाला व वर जर राहाण्यास नीट जागा किंवा खाण्यास भरपूर अन्न मिळालें नाहीं तर बिनधोक खालीं गुजराथेंत यावें. ह्या देशाच्या सुगमतेमुळेंच ह्या दशावर पुष्कळ लोकांच्या स्वाऱ्या झाल्या. महाभारतांतील कृष्णसमकालीन यादव, खिस्तपूर्व ४ या शतकांतील परदेशीक ग्रीक व स्वदेशीक मौर्य, नंतर पहिल्या शतकांतील शक व नंतरचे गुर्जर, पारशी, अरब, तुर्क वगैरे पुष्कळ प्रकारचे लोक आले, व आपापली कांहीं तरी आठवण ठेवून गेले गुजराथी भाषेंत इतर भाषांचें फार मिश्रण आहे. मूळच्या लाटी वगैरे भाषा, शौरसेनी प्राकृत, संस्कृत आणि वर सांगितलेल्या लष्करी टोळधाडींच्या भाषा, ह्या सर्व एकवटून गुजराथी बोली बनली आहे. असें जरी आहे तरी संस्कृतनें आपला ठसा भाषेच्या सर्व स्वरूपावर हुबेहुब उठविला आहे. संस्कृतचा आणि हिचा संबंध सुटून फार दिवस झाले नसावेत असें वाटतें. रजपुतांनीं आपला बाणेदारपणा व जोरकसपणा भाषेस काठेवाडांत दिला आहे. भिल्लांनीं व ठाकऱ्या ( तस्कर )नीं आपल्या सत्काराबद्दल ' इनाम ' उधार सुरतेच्या गुजराथीस अर्पण केला आहे व्यापाऱ्यामधील घटाओटीनें उद्भवणारा माहडोरपणा अमदाबादेच्या गुजराथींत दिसून येतो. गायकवाडीयाची गुजराथी भाषा कांहीं निराळीच लागते.

त्याच्या बोलीचें साम्य मारवाडी भाषेशी बरेंचसें येतें. एका शाखेस गुजराथीचा संबंध कच्छी भाषेशी येतो म्हणून वर सांगितलें आहे. कच्छी मध्यें कांहीं गुजराथी आणि कांहीं सिंधी ह्यांचें मिश्रण वापरतात. गुजराथी भाषा बोलणाऱ्यांची संख्या १०७२०००० आहे.

मुंबई इलाख्यातील मुख्य भाषांपैकीं सिंधी ही एक भाषा आहे. तिच्या तीन शाखा आहेत व सिंधच्या तीन भागांत तिचीच अमल आहे. मरूच्या मैदानांत वरेली म्हणून जी भाषा आहे ती वापरतात. उत्तर सिंधमध्यें सिरेकी भाषा व दक्षिण सिंधमध्यें लारी भाषा वापरतात. ह्या सर्व भाषांत फारशी शब्दांचा भरणा फार आहे. दहाव्या, अकराव्या शतकापासून मुसुलमान वारंवार पाठीमागें लागले आहेत. शिवाय भोंवतालीं उत्तरेस मुलतान, पश्चिमेस बलुचिस्तान ह्या देशांतील बोलींचा भरणा आहे. चार प्राकृत भाषांपैकीं पैशाची म्हणून जी एक प्राकृत भाषा होती ती गांधार ( कंदाहार ), पिशाचपूर ( पिशाउर–पेशावर ) वगैरे प्रदेशांत वापरीत असत. सध्या सिंधमध्यें मोडत असलेला प्रांत व त्याच्या उत्तरेकडचा प्रदेश पूर्वी पैशाची भाषा वापरीत असे. पैशाची भाषेचा मुलूख बराच विस्तृत होता. सध्या जरी त्या भाषेंतील कांहींही लिखाण उपलब्ध नाहीं तरी बोली असतांना तिनें बराच देश व्यापला होता. सध्यांची सिंधी जुन्या पैशाची भाषेच्या अपभ्रष्ट स्थितीपासून उद्भवली असावी असा विद्वानांचा तर्क आहे. पैशाचीचा अमल पूर्वी वर काश्मीरपर्यंतही असे. काश्मीरी भाषेच्या दोन शाखा पैशाचीपासूनच निघाल्या आहेत. सिंधुनदाच्या उत्तरेस व पूर्वे पंजाबांत लहान्दा वगैरे भाषा बोलतात त्याही पैशाचीउद्भवच आहेत ह्या सोडून आतां दक्षिणेकडे मराठीकडे वळूं.

क्षेत्रफळ किंवा एकंदर दृष्टीनें महत्त्वाच्या बाबतींत मराठीचा दर्जा बराच वर ठरतो. हिंदुस्थानांतील एकंदर भाषांपैकीं हिंदीच तेवढी मराठी भाषेची बरोबरी करूं शकेल, किंवा कांहीं बाबतींत श्रेष्ठही ठरूं शकेल. बाकीच्या सर्व भाषा फारच मागें राहतात हिंदुस्थानच्या मध्य बिंदूपासून–नागपूरपासून मराठीला सुरुवात होते. पुढें जात जात सिवोनी बैतूलमधून सातपुडा पर्वताच्या ओळीनें ती नर्मदा नदीच्या दाठाकाठानें थेट पश्चिमेकडे येते तिच्यावरची बाजू भिल्लांच्या नाना बोलींनीं

व्यापली आहे. त्यांचा प्रदेश दमणगंगा नदीपर्यंत येतो. पश्चिमेकडची हद्द खाली येट गोव्यापर्यंत थरवी समुद्रानें घातली आहे. गोव्यापासून पुनः आंत शिरून कोल्हापूरच्या छत्रपतीच्या संस्थानांतून कृष्णानदीस ती भेटते. कृष्णानदी जवळ जवळ थोड्या प्रांतापुरती कां होईना मराठी आणि कानडी ह्या दोहींमधून जाते. नंतर वायव्येकडे वळून मिरजवरून विजापूर, सोलापूर वगैरे प्रांतांतून मराठी भाषा गोदावरीची गांठ घेते. निजाम सरकारच्या राज्यांत गेल्यावर तेलगू भाषेशीं तिचा संबंध येतो. ती पैनगंगानदीपर्यंत टिकतो. नंतर ती पुनः पूर्वेस वळून चांदा सागरकडे मोर्चा वळवून नागपूरची मजल गाठते. महाराष्ट्रांतील नद्या ज्याप्रमाणें याकड्या वाकड्या नागमोडीनें वाहतात त्याचप्रमाणें भाषेची स्थिति आहे. ही सर्व जर हद्द पाहिली तर किती तरी वेडीवाकडी झालेली दिसेल. कोठेंही सरळ नाहीं. वऱ्हाड, महाराष्ट्र, कोंकण सर्व घेऊन मराठी बोलणाऱ्यांची शिरोगणती कांहीं हजार कमी जास्त नाहीं तर, दोन कोटी, सहासष्ट लाख, सत्तर हजारावर येते.

आतांपर्यंत सर्व आर्यभाषा झाल्या. त्यांनीं उत्तर हिंदुस्थानचा प्रदेश आणि दक्षिणेकडचा कांहीं प्रांत व्यापला आहे. दक्षिणेंत कृष्णानदीच्या खालीं प्रामुख्यानें अशी कोणतीहि आर्यभाषा वावरत नाहीं. द्राविडी भाषांनींच सर्व दक्षिण व्यापली आहे. ह्यांनाच पूर्वी तामुळी असें नांव होतें. परंतु तें नाहींसें होऊन सध्या द्राविडी नांवाखालीं त्या मोडतात. ह्याच जातीच्या कांहीं भाषा उत्तरेस बलुचिस्थानांत व हिमालयाच्या डोंगराळ प्रदेशांत आहेत. त्यावरून निघणारीं अनुमानेंही कांहीं आहेत. आर्य लोक जर कोठें तरी होते ह खास. मग ते ( आर्टिक ) उत्तरध्रुवाजवळच्या प्रदेशांत असोत, किंवा मध्य आशियांत असोत. किंवा मेसापोटेमियांतील दोन नद्यांच्या मधील प्रदेशांत असोत, ते मूळ हिंदुस्थानांत नव्हते. कांहीं विद्वानांचें असेंही मत आहे कीं, आर्य लोक मूळ हिंदुस्थानांतील, व पुढें तेथून निघून कांहीं इराणांत गेले व कांहीं टोळ्या पश्चिमेस युरोपपर्यंतकडे जाऊन राहिल्या. पण हें मत आतां कोणी मानीत नाहींत. कारण तें जितकें शास्त्रसंमत असावयास पाहिजे तितकें नाहीं. इतर नवीन शास्त्रांकडून मिळालेला पुरावा ह्याच्या विरुद्ध आहे.'

आर्य लोकांच्या टोळी येऊन आल्या, व त्यांनी आस्ते आस्ते समोर येणारा मुलूख काबीज करूं लागल्या. ते येण्यापूर्वी हिंदुस्थानच केवळ नव्हे तर पूर्व आणि दक्षिण या दिशांकडील आशियाखंडाचा भाग तुराणी भाषा बोलणाऱ्या लोकांनीं व्यापला होता. आर्यभाषा बोलणारे लोक वायव्येकडून डोंगराच्या खिंडींतून हिंदुस्थानात शिरले व प्रथम उत्तरेच्या पांच नदीच्या खोऱ्यातील मूळचे द्राविडी किंवा दस्यु आजुबाजूच्या डोंगराच्या दऱ्यात हाकलून देऊन पांच नदीच्या सुपीक खोऱ्यात यज्ञयाग व देवतांचीं स्तवनें करीत राहिले. दक्षिणेच्या बाजूनें जास्त जास्त खालच्या प्रदेश आक्रमण करण्याचा त्यांचा क्रम हळू हळू चाललाच होता. बलुचिस्तानांत एका कोपऱ्यात ब्राहुई नावाची भाषा द्राविडी स्वरूपाची आहे ती यामुळेंच. पूर्वीचे दस्यु लोक आर्यांच्या आड आले असतील व त्यांच्यापुढें टिकाव न लागल्यामुळें त्यांना डोंगरखोऱ्यांचा आश्रय धरावा लागला. आर्यांनीं पुढें गंगेचें खोरें काबीज केलें; व दृषद्वती व सरस्वती नद्यामधील मध्यदेश, कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाल वगैरे देशांना त्यांनीं फारच धार्मिक महत्त्व दिलें. तेथील अनार्यांना दुसरा कांहीं उपायच नव्हता. कांहींनीं नेपाळांतील डोंगराकडे व कांहींनीं आसामांतील डोंगराळ प्रदेशाकडे आपला रस्ता सुधारला. सध्या तेथें त्यांच्यामध्यें प्रचारांत असलेल्या बोली द्राविडी स्वरूपाच्याच आहेत. अनार्यांच्या कांहीं टोळ्या आर्यांच्या जाचामुळें ओसाड दक्षिणारण्यांत आल्या. त्यांचे वंशज सातपुड्यामध्यें भिल्ल, गोंड, नाग वगैरे आहेत. लोकसंख्येच्या मानानें अनार्य लोक आर्यांच्यापेक्षां पुष्कळ कमी भरतील पण भाषांच्या संख्येच्या दृष्टीनें ह्या भाषा आर्योद्भव भाषांना खात्रीनें मागें सारतील. भाषा आणि पोटभाषा इतक्या आहेत कीं, त्यांनीं नेपाळ वगैरे उत्तरेकडच्या प्रांतांत एक मोठें जाळेंच पसरलें आहे. त्यांची साधारण बरोबर माहिती मिळविणें सुद्धां कठीण आहे, मग त्यांचा सांगोपांग अभ्यास दूरच. बाकीच्या इतर क्षुल्लक भाषा जरी सोडून दिल्या तरी द्राविडीपैकीं हिंदुस्थानांतील चार भाषा महत्त्वाच्या आहेत. संस्कृतचें आणि त्या भाषांचें पूर्वी संस्कृतीच्या बाबतींत देवाण घेवाण बरेंच झालें आहे. द्रविडी लोकांनीं आर्य लोकांशीं टक्कर देण्याची बरीच धडपड केली. आर्य लोक जसे फार प्राचीन काळीं हिंदुस्थानांत उपरे होते तसेंच

द्राविडी लोकही हिंदुस्थानात त्या दृष्टीनें उपरे आहेत असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं कारण ते लोकसुद्धा रानटी स्थितींत मध्य आशियात किंवा उत्तर चीनच्या मैदानात कोठें तरी हिंडत होते व नंतर हिंदुस्थानात शिरले. हिंदुस्थानात आर्यांच्या पुष्कळ अगोदर ते शिरले. माडणात मात्र आर्यांच्या उग्रतर संस्कृतीपुढें त्याचा टिकाव लागला नाहीं व म्हणूनच दक्षिणेचा व डोंगरपठारीचा आश्रय त्याना करावा लागला. त्याच्याशीं आलेल्या संबंधाचा आर्यांच्या संस्कृतीवर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं व तो सध्या प्रत्येक बाबतींत दृग्गोचर होतो दोन संस्कृतींचा लढा पडला म्हणजे त्याचा परिणाम दोहोंसही भोगावा लागतो. आर्यांच्या भाषेत व्यंजनांपैकीं मूर्धन्यवर्ग नव्हता. कारण हिंदुस्थानाबाहेरील आर्य भाषात तो सापडत नाहीं. मूर्धन्य उच्चार द्राविडी भाषातूनच आला असावा असा विद्वानाचा तर्क आहे. ही झाली भाषावाबतींतील गोष्ट. धर्माच्या बाबतींत पुष्कळच गोष्टी आर्य संस्कृतीवर द्रविडानीं लादल्या आहेत श्रीशक्तीची पूजा, शिवाची पूजा किंवा लिंगपूजा, नाग वगैरे देवताची उत्पत्ति, भुतालेतावरील विश्वास व समजुती, इत्यादि गोष्टी मूळ आर्य संस्कृतींत नव्हत्या. त्या द्राविडी संस्कृतींतूनच आल्या आहेत. तिनें सामाजिक बाबतींतही कांहीं थोडेसें आर्य संस्कृतीस ऋणी करून ठवलें आहे. उलट आर्य संस्कृतीनें तर त्याच्यावर इतका पगडा बसविला आहे कीं, त्याना अगदीं नामशेष करून ठेवलें आहे आर्य संस्कृतीच्या सनर कचाट्यात सापडल्यामुळें व ती तिच्या रोमरोमात शिरल्यामुळें व द्राविड लोकाचा स्वभाव पुराणाभिमानी असल्यामुळें आर्य संस्कृतीचें आद्य व शुद्ध स्वरूपही द्रविड लोकातच सापडतें. मलबारमधील नंबुद्रि ब्राह्मणातील चालीरीति, आचारविचार, धार्मिक समजुती वगैरे गोष्टी पूर्वीच्या वेदीक आर्यांच्याच हुबेहुब आहेत. आजतागायत त्या जशाच्या तशा प्रचलित आहेत. त्यांच्या द्रविड देशात आर्यांचा शिरकाव दराच पुढें झाला श्री रामचंद्राच्या लंकेवरच्या स्वारीच्या रूपानेंच आर्यांनीं प्रथम शिरकाव केला व त्याच वेळेस दक्षिणेंतील वनचरी व द्रविडी रहिवाशाना आर्य संस्कृतीचे धुटके पाजले. महाभारतात सहदेव दक्षिणेंत करहाटक ( सध्यांचें ' कन्हाड ' ) मार्गानें आल्याचा दाखला आहे.

तेव्हां त्याच्या येण्यांतही आर्य संस्कृतीचा द्रविड देशांत चिरकाय राहण्याचा दाखला आहे. अगस्ति ऋषिसंबंधानेही एक गोष्ट सांगण्यात येते. तिच्यांतही त्याविषयी उल्लेख आपल्यासारखा आहे. सूर्य मेरुपर्वताच्या भोवती फिरतो हे पाहून विंध्य पर्वतास त्याचे वैषम्य वाटलें, आणि त्याच्याबद्दल मत्सर उत्पन्न झाला. तो मेरुदेशा उंच होऊं लागला. त्याचा परिणाम असा झाला की, दक्षिणेकडे सूर्य ( आर्य संस्कृतीचा ? ) दिसेना. सर्व अंधकार झाला. तेव्हां सर्व लोक विंध्याच्या गुरुकडे- अगस्तीकडे गेले व संकट निवारण्यास त्यांनी त्यांची प्रार्थना केली. अगस्तींनी कबूल केलें आणि विंध्य ओलांडून दक्षिणेकडे मोर्चा फिरविला. गुरु समोर आल्यामुळें शिष्यानें आदरानें मान वाकवून नमस्कार केला. मी दक्षिणेकडून परत येईं तों तसाच रहा असें गुरुनी सांगितलें. अद्यापि स्वारी दक्षिणेतून आले नाहींत, व बिचारा विंध्य मान जसा आहे तसाच आहे. यावरून येवढेंच निघतें कीं, आर्यसंस्कृतीचें निशाण दक्षिणेंत नेणारा पहिला आर्य अगस्ति ऋषीच असावा. असो, आपल्यास ज्यास्त खोल जाण्याचें कारण नाहीं. ज्या देशात द्रविड मुळ चार भाषा बोलल्या जातात त्या देशाचा आणि त्या लोकांच्या संस्कृतीचा दर्जा समजण्यास इतकी माहिती बस्स आहे.

द्राविडी भाषांखालीं मुख्य चार भाषा मोडतात. तामील, तेलगु, कानडी, मल्याळी ह्या त्या होत. दुसऱ्या आणखी तुळू, कुडगु, कोटा, खोंड, राजमहाली, कैकाडी वगैरे आहेत. त्याप्रमाणें आर्य भाषांच्या काहीं खुणा आहेत त्याप्रमाणें द्राविडी भाषेंतही सर्वसाधारण अशा काहीं खुणा आहेत. त्यावरून द्रविडी शिक्का ओळखला जातो. पदार्थांचीं लिंगें ठरवितांना सचेतन, अचेतन असे दोन भाग पाडतात किंवा ज्यांना बुद्धि आहे ते आणि ज्यांना बुद्धि नाहीं ते असे दोन भाग पाडून लिंगें ठरविण्यात येतात. आर्योद्भव भाषांमध्यें नामें विभक्तिप्रत्ययाशिवाय उच्चारतात. नामाचें मूळरूप म्हणजे प्रथमेचें असें मानतात, तसें द्रविडी भाषा मानीत नाहींत. आर्योद्भव भाषात क्रियापदास उपसर्ग लावला म्हणजेच त्याचा अर्थ बदलण्याचा संभव असतो. धातुसाधितात धातूचा अर्थ बदलत नाहीं. तसें द्राविडी भाषाचें नाहीं. या भाषात धातुसाधितातही

मूळधातूच्या अर्थात विकृति होते. तुर्कीभाषेप्रमाणें क्रियापदाच्या मूळ स्वरूपात त्या विकृति करतात व त्यामुळें निरनिराळे अर्थ किंवा संबंध साधतात. आणि कोणतीही आर्योद्भव भाषा बोलणाऱ्याला द्रविडी भाषांची जी ओळख आहे ती त्याच्या खणखणणाऱ्या आवाजाची आहे. आर्यभाषांचें जें निसर्गत सौंदर्य किंवा श्रवणमाधुर्य आहे तें कोणत्याही द्राविडी भाषेंत नाहीं. भाषा कोठेंही आजूबाजूस बोललेली ऐकली म्हणजे कोणी भांडताहेत कीं काय अशी समजूत होते. किंवा एकाद्या मातीच्या मडक्यात खडे घालून वाजविलेल्याचे ध्वनि उमटलेले वाटतात. हें लिहिणें त्या भाषाभिमान्यास फार कठोर लागेल हें खरें, पण असा काहीं तरी कर्कशपणा किंवा कणकणपणा त्या सर्वांत आहे यांत काहीं संशय नाहीं.

मराठी भाषा बोलणाऱ्या प्रांताच्या दक्षिणेस प्रथम द्राविडी भाषांपैकीं कानडी प्रथम लागते. मलबार किनाऱ्यावरील सदाशिव गडापासून तिला सुरुवात होते. तेथें तिचा कोंकणी किंवा कारवारी मराठीशीं संबंध येतो. नंतर धारवाडच्या पश्चिमेकडून बेळगाव हुकेरीवरून कागल व कुरुंदवाड संस्थानांत येते. तेथें कानडीचा चांगल्या अस्सल मराठीशीं संबंध येतो. नंतर मिरजेच्या पलीकडे जाऊन पुढें भीमा नदीच्या काठाकाठानें ब्रह्मपुरी, केळीगाव, चाडेगाव वगैरे ओलांडून बेदरच्या आसपास येते. ही तिची उत्तरेकडील हद्द झाली. दक्षिणेकडून सदाशिव गडापासून निघून सह्याद्रीच्या पश्चिम घाटावर चढून हैसूर, कोईमतूर प्रांतांतून पूर्वघाटाकडे वळते. कानडी भाषा बोलणाऱ्यांची संख्या नव्वद लाख आहे. शुद्ध कानडीचा मासला हैसूर संस्थानांत ऐकण्यास सांपडतो बेळगाव वगैरे प्रांतांत मराठीची थोडी फार भेसळ सांपडते. ह्या भाषेंत वाङ्मय बरेंच आहे कन्नड–भारत म्हणून एक ग्रंथ आहे. सध्याही भाषेचे अभिमानी बरेच कडवे आहेत मराठीचें उच्चाटन करणें हेंच त्यांनीं आपलें ध्येय ठरविलेलें दिसते. ह्याचा मासला सभेंत कधीं कधीं पाहण्यास सांपडतो.

दुसरी भाषा तेलगु उत्तर सरकार, कर्नुल, अर्काट, नेलोर, मद्रास इलाख्यातील बल्लारी प्रांत, निजाम सरकारचा काहीं मुलूख आणि मध्य प्रांतांतील पूर्वेकडचा काहीं प्रदेश इतका ह्या भाषेचा विस्तार आहे. तेलगु भाषा बोलणाऱ्यांची संख्या दोन कोटी वीस लाखांवर आहे. ह्या

भाषेंतही वाङ्मय बरेंच आहे. त्यांतील कांहीं जुनें म्हणजे बाराव्या शतकांतील आहे भाषेस कांहीं शाखा फुटल्या नाहींत. संस्कृत शब्दांचा या भाषेंत पुष्कळच भरणा आहे.

अगदीं दक्षिणेकडची भाषा तामील होय. सर्व द्राविडी भाषेंत हिचा नंबर पहिला वर लागेल इतकें प्रदेशही पहिला व्यापला आहे. तामील बोलणाऱ्यांची संख्या एक मोठी ऐशीं लाख आहे मद्रासच्या थोड्या उत्तरेपासून तामील बोलणारे लोक सांपडतात आणि हिंदुस्थानच्या थेट दक्षिण टोकापर्यंत तामीलच भाषा चालते पुलिकत ते कन्याकुमारिन पर्यंतचा प्रदेश तामीलचा आहे त्रावणकोर, त्रिवेंद्रम, सिलोनचा उत्तर भाग, यांतही तामीलच बोलतात सर्व द्राविडी भाषांत ही फार जुनी, डौलदार आणि सुसंपन्न अशी आहे. वाङ्मयांत शेंदतामील म्हणून प्राचीन भाषा वापरतात बोलतांना कोडुन्तामील म्हणून जी भाषा आहे ती वापरतात. जुन्यांत जुनें वाङ्मय या भाषेंत आठव्या शतकापासून सांपडतें. ही बोली जशी जुनी आहे तशी त्या प्रांतांतील समाजरचनाही अतिशय जुनी आहे आर्यांच्या जुन्या ग्रंथांत वर्णिलेल्या कांहीं चालीरीति त्या देशांत अद्याप प्रचलित आहेत तेथील ब्राह्मणजात धर्माच्या बाबतींत अतिशय कडवी आहे. या जातींतून मोठमोठे धर्मप्रवर्तक उत्पन्न झाले आहेत. स्मार्त ब्राह्मण म्हणून एक जुनी जात आहे या ब्राह्मणांजवळ तामील भाषेंत स्वतंत्र रीतीनें लिहिलेले निराळे वेद आहेत ब्राह्मणांची ही जात फार कर्मनिष्ठ आहे. त्यांची संस्कृतीही मोठी दांडगी आहे, त्यावरून द्राविडी संस्कृति किती जबरी होती त्याची कल्पना येते आर्य येथें आले त्या वेळेस आर्य संस्कृतीचा आणि द्राविडी संस्कृतीचा झगडा झाला व त्यामध्यें जरी आर्य संस्कृति तावून सुलाखून निघाली तरी त्यामुळें द्राविडी संस्कृति कमी ठरत नाहीं दक्षिणेंतील मोठमोठीं देवालयें द्राविडी संस्कृतीच्या मोठेपणाची अद्याप साक्ष देत आहेत.

चौथी द्राविडी भाषा मल्याळी मलबार किनाऱ्यावर ही भाषा चालते. मंगलोर, त्रिवेंद्रम वगैरे ठिकाणीं तिचा कानडी तेलगूशीं संबंध येतो ही भाषा बोलणारे लोक सत्तर लाख आहेत कोचीन, त्रावणकोर संस्थानांत हीच भाषा चालते तामील आणि मल्याळीमध्यें फारसा फरक

नाहीं पूर्वी एके काळीं ह्या दोन्ही एक स्वरूपातच होत्या असें म्हणतात. भेद झाले ते पुढें कालांतरानें झाले.

ह्यांतेरीज आणखी बारिक सारिक भेद आहेत. कानारा जिल्ह्यात तुळु भाषा चालते. कुर्ग संस्थानात कुडगु बोलतात मद्रास इलाख्यातील काहीं डोंगरी जाती तोडा नावाची भाषा वापरतात बंगालमध्यें खोण्ड म्हणून एक रानटी जात आहे. ती द्राविडी खोण्ड भाषा वापरते. आमच्या इकडे कैकाडी म्हणून एक जात आहे त्याचा धंदा गुरुडांप्रमाणें टोपल्या विणण्याचा असतो खेडेगावात लग्नकार्यांत वाजंत्र्याचें कामही ते करतात. ते लोक जी भाषा बोलतात तीही एक द्राविडी " कैकाडी " म्हणून आहे. काहीं लोक ह्या कैकाड्याचा पुर्वीचे जे केकय लोक त्याच्याशीं संबंध लावतात, पण त्यात काहीं अर्थ नाहीं. कैकेयापैकीं अश्वपति नावाचा एक राजा वेदर्षि जनकासारखा वेदांती होऊन गेला. त्याने उपनिषद काली आत्मानात्म वादात पुष्कळ भाग घेतला. त्या अश्वपति कैकेयाची संस्कृति कोणीकडे आणि सध्याचे कैकड्याची संस्कृति कोणीकडे ! संबंध लावण्यांत काहीं तरी पुढचा मागचा विचार पाहण्यास नको काय ?

द्राविडी भाषाची हिंदुस्थानच्या दक्षिणभागावर अशी विभागणी आहे.

हिंदुस्थानातील कोलेरीयन आणि तिबेटी ब्रह्मी भाषाचा उल्लेख केला म्हणजे हें विवेचन पूर्ण होईल कोलेरियन जातींत संताल, मुंडारी, राज्या, जाग, फोर्वा, वगैरे भाषा येतात ह्या सर्व भाषा रानटी लोकात प्रचलित आहेत. तिबेटी ब्रह्मीमध्यें नेपाळी भाषा, सयामी भाषा, सिक्किमी असामी, मणिपुरी, हिमालयी असे भाग पडतात.

---


भाषांची वर्गवारी जास्त स्पष्ट होण्यासाठीं खालीं भाषांचा तक्ता देतों:—
भाषा
आर्य अथवा आर्योद्भवभाषा
सेमिटिक
टयुरेनियन
आफ्रिका व अमेरिकेंतील इतर भाषा
युरोपियन
इंडिक
अरबी
हेब्रु
आरमिक
उत्तर टयुरेनियन.
दक्षिण टयुरेनियन
ग्रीक, लॅटीन
आर्मीनियन
संस्कृत
पर्शियन
रशियन
चिनी
जपानी
कोरियन.
दक्षिण हिंदुस्थानांतील द्राविडी भाषा. कानडी, तामील, तेलगु मल्याळी.
वर्तमान बोली
इंग्लिश फ्रेंच वगैरे.
प्राकृत
पाली
अपभ्रंश
वर्तमानकालीन पर्शियन
कुर्दिश
पुश्तु
अधिशन
वर्तमानबोली
हिंदी, बंगाली, गुजराथी, मराठी वगैरे.

## प्रकरण ११ वें.

—:०:—

### मराठीची पूर्वपिठिका.

मराठीचे पूर्व स्वरूप अजमावण्यास संस्कृत, प्राकृत–पाली–अपभ्रंश ह्या भाषाचें स्वरूप काय आहे हें पाहिलें पाहिजे. त्याचा क्रमानें विचार करू. प्रथम संस्कृतच काय स्वरूप होतें तें पाहू.

मागें एका मूळ आर्य भाषेपासून पूर्वेकडील व पश्चिमेकडील सर्व देशातील भाषा तयार झाल्या म्हणून सांगितलें. आर्य भाषेपासून इंडो–युरोपियन व इंडो–इराणियन असे भाषेचे दोन प्रकार झाले. त्यापैकी पहिल्यात युरोपमधील सर्व भाषांचा अन्तर्भाव होतो व दुसऱ्यात पार्शियन, संस्कृत व संस्कृतोद्भव इतर सर्व भाषा ह्याचा होतो. खरें पाहिलें असता संस्कृतचें बोली ह्या नात्यानें प्राचीनत्व मध्य आशियामध्यें ज्या वेळेस आर्यांच्या टोळ्या रहात असत त्याच्याही मागें नेण्यास हरकत नाहीं. कारण युरोपमधील लिथुनियन भाषा आणि संस्कृत ( वैदिक ) ह्या दोहोंमध्यें प्रत्यय वगैरे बाबतींत उघड उघड–व्युत्पत्तीच कारण ध्यानांत न घेता–साम्य काढता येतें. तेव्हा संस्कृतचा बोलीपणा आर्यांच्या मुख्य टोळींतून एक टोळी फुटून लिथुनियामध्यें जाण्याच्या पूर्वीपर्यंत जातो व तितका प्राचीन तो मानला पाहिजे आर्यांच्या प्रवासात मूळ टोळीपासून पुष्कळ शाखा फुटल्या. एक इराणात राहिली व दुसरी हिंदुस्थानात आली. फारकत होण्याच्या वेळेस सुद्धा संस्कृत बोली म्हणून वापरत असावेत, कारण झेंद–अवेस्ता ( पारश्यांचें धर्मपुस्तक ) मधील श्लोक व वेदाच्या ऋचा ह्यामध्यें विलक्षण साम्य सापडतें. थोडीशी स्वर–व्यंजन–प्रक्रिया केली म्हणजे त्यातील कित्येक श्लोक थेट वेदातील ऋचेसारखे दिसतात. लिथुनियन भाषेत किंवा झेंद–अवेस्ताच्या भाषेत कितीहि साम्य सापडलें तरी हिंदुस्थानात आर्यांची वस्ती होण्याच्या अगोदर ज्या ज्या ठिकाणीं त्यानीं वस्ती केली त्या त्या ठिकाणीं ते असताना त्यानीं वापर-

ल्ल्या बोलीचें मग ती संस्कृत असो वा इतर आर्यभाषा असो—पूर्ण स्वरूप कळणें कठीण झालें आहे. तिच्या स्वरूपाचा विचार केवळ तात्त्विकच होणार. हिंदुस्थानांत आल्यानंतरचा मात्र संस्कृतच्या स्वरूपाचा विचार साँगोपांग होण्यासारखा आहे.

काळाच्या दृष्टीनें संस्कृतमध्यें पुष्कळ रूपांतर झालें आहे, व निरनिराळ्या काळच्या वाङ्मयावरून त्यास निरनिराळीं नांवेंही मिळालीं आहेत. अतिशय प्राचीन काळचें वाङ्मय म्हणजे वेदांच्या ऋचा होत. त्याच्या नंतर ब्राह्मणकाळीं थोडासा भाषेंत फरक झाला. उपनिषत्काळीं पुन्हा थोडासा भाषेंत फरक झाला आचार्य पाणिनींनीं भाषेस जें एक स्वरूप दिलें तेंच पुढें पुष्कळ दिवस चाललें. साधारणपणें प्राचीन आणि अर्वाचीन अशीं संस्कृतचीं दोन रूपें ठरतात पहिलें वेद, ब्राह्मण, उपनिषदें ह्या ग्रंथांत सांपडतें दुसरें रामायण महाभारतादि काव्यें, नाटकें व चंपू वगैरे वाङ्मयांत सांपडतें. त्या दोन्हीं स्वरूपांतील मुख्य मुद्दे खालीं देतों.

वेदांचें संस्कृत म्हणजे एक स्वरूपाचें आहे त्यांतला भाग नाहीं. नांव एकच असलें म्हणजे स्वरूप एकच असलें पाहिजे असा सिद्धांत ठरत नाहीं. वेदाच्या सर्व ऋचा आठ अष्टकांत किंवा दहा मंडलांत ग्रथित केल्या आहेत. कांहीं मंडलें—पहिलें आणि दहावें वगळून बाकीचीं सर्व कोणकोणत्या तरी एका ऋषीनें रचिलीं आहेत. पहिलें व दहावें ह्यांचा कर्ता किंवा द्रष्टा कोणी एकच ऋषि व त्याचे वंशज नसून पुष्कळ निरनिराळे शतर्चिनमंत्रद्रष्टे आहेत. इतर प्रत्येकाचा कर्ता एकेक ऋषि आहे व त्या त्या ऋषीस मंत्रद्रष्टा म्हणतात पहिल्या व दहाव्या मंडलांत अनेक ऋषींचीं सूक्तें गोविलीं आहेत. पहिल्या व इतर आठी मंडलांत वस्तूविषयीं जरी असा मिश्रणा आहे तरी भाषेसंबंधीं फारसा नाहीं. परंतु दहाव्या व इतर नऊ मंडलांत भाषेचें विलक्षण अंतर आहे दहावें मंडल इतर नऊ मंडलांबरोबर लिहिलें गेलें नसावें तें उत्तरकालीन ठरविण्यास इतरही—देवताविषयक, वेदांतविषयक—गोष्टी आहेत. त्यांचा विचार जरी बाजूस ठेवला व भाषेचाच केवळ विचार केला तरी तो त्या मंडलास उत्तरकालीन ठरविण्यास पुरेसा आहे. "या ते धामिष्ट नव्या

अर्कम् इय मनीषा इयमश्विना गी· " ह्या ओळींत " नव्या अर्कम् " किंवा " मनीषा इयम् " ह्या शब्दांचा संधि पूर्वींच्या एक ते नऊ मंडलांत होत नाहीं किंवा झालेल्याचीं उदाहरणें फारशीं नाहींत. दहाव्या मंडलांत असले संधि होण्यास सुरुवात होते. पहिल्या एक ते नऊ मंडलांत उच्चारसौकर्यार्थ किंवा वृत्तसुरक्षार्थी ' य ' आणि ' व ' चा उच्चार ' इअ ' आणि ' उअ ' असा करावा लागतो " त्र्यंबक यजामहे " हें वाक्य " त्रिअंबक यजामहे " असें उच्चारावें लागतें. दहाव्या मंडलांत हा प्रकार कमी कमी होत जातो. पूर्वींच्या मंडलांत ' र ' प्राचुर्य सांपडतें, तर दहाव्या मंडलांत त्याबद्दल ' ल ' प्राचुर्य सांपडतें, ' कृ ' धातूस ' नु ' आगम होतो, तर पुढें त्याचीं रूपें आठव्या गणाप्रमाणें सांपडतात. मुख्य गोष्ट ही कीं, पूर्वींच्या मंडलांतील जुने शब्द– ईम्, अवस्यु, विचर्षणि, वीति इत्यादि दहाव्या मंडलांत सांपडत नाहींत. ह्यावरून दहावें मंडल फार पुढें रचलें असावें असा तर्क आहे. तेव्हां प्रत्यक्ष वेदाच्या भाषेंतसुद्धां भाषेचीं दोन स्पष्ट रूपांतरें आहेत वेदाच्या पुढची ब्राह्मणाची भाषा.

ब्राह्मणग्रंथांतील भाषासुद्धां वेदांतल्या भाषेप्रमाणें स्वरयुक्त आहे. वेद ज्याप्रमाणें पद्याचे आद्य स्वरूप आहेत त्याचप्रमाणें ब्राह्मण ग्रंथ गद्याचें आद्य स्वरूप होत. त्यांचा उद्देश यज्ञयागादिकांचें वर्णन द्यावयाचें हा आहे. तेव्हां त्यांमध्यें प्रतिमा जरी इतकी नसली तरी वर्णनशक्ति बरीच दिसते वैदिक भाषेंतील उच्चारांचा ब्राह्मणांच्या भाषेंतही सांपडतात नामें, क्रियापदें चालविण्याचा प्रकार, वाक्यांत शब्दांची योजना वगैरे एकदरींत स्वरूप फारसें भिन्न पडत नाहीं भिन्न पडण्यास सुरुवात मात्र होते, व सूत्रें उपनिषदें, दर्शनें ह्या मार्गामार्गानें रामायण, महाभारतादि काव्यांतल्या भाषेच्या स्वरूपापर्यंत येऊन मिळतें ढोबळ मानानें संस्कृतचे वैदिक संस्कृत व पाणिनीय संस्कृत असें दोन भाग पडतात यास्क, पाणिनीय वगैरे निरुक्त–व्याकरणकार वेदास ' वदे, अवश्यायम्, दाशतयीपु, छन्दसि " इत्यादि उल्लेखांनीं ओळखतात व तद्भिन्न भाषेस " भाषायाम् " असें संबोधतात. रामायण–भारतादि महाकाव्यें, नाटकें वगैरे सूत्रकालोत्तर वाङ्मय पाणिनींनीं योजलेल्या " भाषायाम् " ह्या सदरा खालीं येते. कोठें चुकून वेदांतल्यासारखीं शब्दांचीं ' अपाणिनीय ' रूपें

येतात, नाहीं असें नाहीं. पण त्यांची वासलात 'आर्षप्रयोग' म्हणून लावतात. ह्या पाणिनीय संस्कृत किंवा लौकिक संस्कृतचे कांहीं विशेष आहेत. ह्यामध्यें आणि वैदिक भाषेमध्यें फारच भिन्नत्व दिसतें. पुढच्या संस्कृतमध्यें 'तुमन्त' साधण्याचा प्रकार एकच आहे. वेदांतल्यासारखे तुम्, तवे, तवै, असे, ध्यै इतके प्रकार नाहींत. त्यांचप्रमाणें लौकिक संस्कृतमध्यें पूर्वकालवाचक त्वा, य किंवा त्य ह्या प्रत्ययांनीं बनवतात; पण तेंच वेदामध्यें त्वा, त्वी, त्वाय, त्विनम्, त्वानम् इतक्या प्रत्ययांच्या साहाय्यानें बनवण्याचे निरनिराळे प्रकार आहेत. वेदांत वापरलेले क्रियापदाचे "मसि, ध्व, ए" वगैरे प्रत्यय पुढें नाहींसे झाले आहेत; आणि त्यांची जागा "म, ध्वम, स" या प्रत्ययांनीं पटकाविली आहे. अवस्तन्, अदधत् इत्यादि र्‌फारयुक्त रूपें नाहींशीं होऊन र्‌फारचा अवशेषही 'धी' ह्या धातूपुरताच राहिला आहे. अवस्, दर्शत, मृळीक, वभ्रि इत्यादि क्रियापदांचें रूपप्राचुर्य पाणिनीय भाषेंत बगदीं आढळत नाहीं. सूत्रोत्तरकालीन भाषेस 'पाणिनीय' म्हणण्याचें कारण उघडच आहे. पाणिनीय भाषा म्हणजे त्यांच्या अष्टाध्यायींतील भाषा नव्हे. कारण ती सर्व सूत्रमयच आहे. ज्या भाषेचें व्याकरण पाणिनींनीं बांधलें, ज्या भाषेंतील शब्दांच्या घटनेबद्दल, रूपाबद्दल, किंवा ज्या भाषेचा वर्णविचार, शब्दविचार व वाक्यरचना ह्याबद्दल सूत्रें बांधलीं त्याच भाषेस पाणिनीय भाषा म्हणणें सयुक्तिक आहे. सूत्रकालोत्तर भाषेची एकंदर मांडणी पाणिनींच्या अष्टाध्यायींतील सूत्रांनीं बरोबर लागते.

वेदाच्या भाषेंत अ, इ, उ, ऋ, ऌ इत्यादि साधे स्वर, ए ओ, हे संयुक्त स्वर व त्यांच्या संधीनें होणारे दीर्घ प्रकार हे आहेत. गुण, वृद्धि हे फरकही होतात. व्यंजनाचे त्यांच्या उच्चारास लागणाऱ्या स्थानांप्रमाणें पांच वर्ग केले आहेत. पूर्वीच्या आर्य भाषेंत मूर्धन्याचा वर्ग नव्हता असें म्हणतात. व त्या वर्गाचीं सर्व व्यंजनें आर्य लोकांनीं येथील द्राविडी भाषा बोलणाऱ्या अनार्य लोकांपासून उचललीं असा तर्क आहे. पण त्यांच्या उत्पत्तीची संगति लावण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ 'रपूर्व 'न्' चा 'ण्' करावयाचा असतो. 'स्' च्या पूर्वी इ, ई, उ, ऊ, ऋ, ऐ, औ पैकीं एखादा स्वर आला तर 'स्, चा 'ष्' होतो. त्याचप्रमाणें कांहीं

दन्त्य व्यजनाची मूर्धन्य व्यजनें बनतात. 'कृत' पासून 'कट', 'कर्त' पासून 'काट' 'पृथति' पासून 'पठति' 'मृद्' पासून 'मुड्' असे शब्द होतात. व्यजनाचा विचार काहीं प्रातिशाख्यात फार खोल केला आहे. ख, घ, छ, झ, थ, ध, फ इत्यादि व्यजनास ऋक्प्रातिशाख्य साधीं व्यजनें म्हणत नसून सयुक्त व्यजनें म्हणतें. कारण प्रत्येकाच्या उच्चारांत ह–कार हा महाप्राणोच्चार येतो, ख=क्+ह; घ=ग्+ह इत्यादि. शब्दाच्या रूपात फारसे फरक दृष्टीस पडत नाहींत. नामें अ–इ–उ–ऋ–कारान्त आहेत व बहुतेक पाणिनीय नियमाप्रमाणें चालतात. व्यजनापैकीं स्, क्, त्, थ्, प्, स्, इत्यादि व्यजनें शब्दाच्या शेवटीं सापडतात. लिंगें तीन आहेत. वचनें तीन आहेत. सबोधनासह विभक्ति आठ आहेत. 'देवाः' बद्दल 'देवासः' व 'देवैः' बद्दल 'देवेभिः' रूपें वेदात सापडतात. विशेषणें नामासारखीं चालतात. सर्व प्रकारच्या नामाना लागणारे प्रत्यय जरा बारीक रीतीनें पाहिलें असता एकच आहेत. ढोबळ रीतीनें किंवा वरवर पाहिलें तर त्याच्या एकदर रूपामध्यें फार फरक दिसतो. कायमचे प्रत्यय खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| १ | ×, स् | अस् |
| २ | म् | न्स्, अस् |
| ३ | मि, म् ( रूपातर–आ ). | ऐस्, भिस् |
| ४ | ए | भ्यस् |
| ५ | अस्, अत् | भ्यस् |
| ६ | अस्, स्, स्य | आम्, नाम् |
| ७ | इ | सु |

स्वरान्त किंवा व्यंजनान्त नामाना हेच प्रत्यय लागतात. हे प्रत्यय संस्कृतनें कोठून तरी पैदा केले असातला भाग मुळींच नाहीं. पहिल्या आर्य-भाषेतून पर्यायानें हे प्रत्यय आले आहेत. कारण ह्या प्रत्ययाचीं मूळ रूपें किंवा रूपातरें दुसऱ्या आर्योद्भव पाश्चात्य भाषाव सापडतात. पहिला प्रत्यय एकवचनाचा घेऊ सार्वनामिक 'स' मध्यें ह्याचें मूळ आहे. ह्याच सर्वनामाचें स्त्रिलिंग रूप 'सा' होतें. ह्या 'स' सर्वनामाची

पुल्लिंग व स्त्रिलिंग प्रथमेच्या पुढें असलेली व्याप्ति उपलब्ध नाहीं. द्वितीयेचा एकवचनी प्रत्यय–एक चिन्ह ' त् ' ( कधीं कधीं ) आणि दुसरें चिन्ह ' म्. ' हीं दोन्हीं चिन्हें ' त् ' आणि ' म् ' कोणत्या तरी सर्वनामापासून आलीं आहेत. ' त् ' चिन्हांत सार्वनामिक अंश आहे ह्याबद्दल शंकाच नको. 'स्' प्रत्ययाच्या बाबतींत जें आपणास आढळून आलें तसेंच ' त् ' ( तत् ) मध्येंही आढळून येईल. कधीं कधीं स् बद्दल त् येतो. आता राहिली ' म् ' ची गोष्ट. वेदामध्यें ' इत् ' वापरलेलें आढळतें. त्याच्यात लिंगाचा अथवा विभक्तीचा कांहीं संबंध येत नाहीं. " चेत्, नेत्, य इत्, तमित्, तयोरित् " वगैरे पुष्कळ उदाहरणें ' इत् ' बद्दल देता येतील. ह्या ' इत् ' शीं अगदीं सलग्न असलेलें दुसरें एक सर्वनाम आहे, तें ' इम् ' होय, व त्यापासून निघणारें दुसरें ' अम् ' ( इदम्=इत्+अम् ) असेंही एक सर्वनाम आहे. ह्या दोन्हींमध्यें इ आणि म् असे अवयव आहेत व दोन्हीही सर्वनामसंबद्ध आहेत. सध्याच्या गुजराथींत एम् म्हणून जें एक अव्यय सारखें बोलण्यांत येत असतें–( ' असें ' ह्याअर्थी ) त्याचाही संबंध ह्या ' इम् ' सर्वनामापर्यंत येऊन पोहोंचतो. सर्वसाधारण नियम जर बांधावयाचा म्हटलें तर तो असा होईल. ' इ ' हा जो अवशेष दिसतो त्याला दर्शक सर्वनामाचा अवशेष म्हणावयास हरकत नाहीं ह्या सार्वनामिक ' इ ' पासूनच तृतीयेच्या एकवचनाच्या ' आ ' प्रत्ययाची उपपत्ति लागते. ' अयम् ' ह्या सर्वनामातील ' अ ' पासूनच बहुतेक सर्व विभक्ति प्रत्ययाची उपपत्ति लावता येते व त्या ' अयम् ' ह्या सर्वनामाचें सुद्धा मूळ ' इ ' ह्या दर्शक सार्वनामिक अवशेषात सापडतें. तृतीया आणि चतुर्थी ह्या दोन विभक्ति अतिशय जवळच्या आहेत–एक दुसरीस प्रसवते–हें मागें सांगितलेंच आहे पंचमीचा प्रत्यय ' त् ' आहे ' आत् ' नाहीं. पंचमी आणि तृतीया अशाच फार सलग्न आहेत. ' तेन ' म्हटलें काय आणि ' तस्मात् ' म्हटलें काय दोन्हीं सारखेंच. दोन्हींचा अर्थ एकच. षष्ठीच्या ' स्य ' प्रत्ययाचें मूळही सार्वनामिक आहे. ' स्य ' ची उत्पत्ति वेदात वापरलेल्या त्यत् ह्या सर्वनामापासून लागते. स्य–स्यम्–त्यत् असा क्रम लागतो; व त्याच्याच जोडीला स, तम्, तत् हाही क्रम लागतो. सप्तमीच्या ' इ ' प्रत्ययाची तीच गत. प्रत्यय सार्वनामिकच आहे

आतां राहिले अनेकवचनी प्रत्यय–एभिः—एहिं (प्राकृत), आभिः भिस्, भ्यः, भ्याम्, भ्यस् इत्यादि सर्व प्रत्यय भ्य (भि) नें सुरू होतात. 'भ्य' मध्यें 'अभि' हा उपसर्ग आणि 'अ' हें सार्वनामिक चिन्ह अशीं दोन आहेत. ह्या दोहोंच्या मिश्रणानेच वर दिलेलें सर्व प्रत्यय बनले आहेत. कांहीं सर्वनामाना 'साम्, आम्' हे प्रत्यय लागतात. 'साम्' मध्यें 'आम्' प्रत्यय व स् हें सार्वनामिक चिन्ह असावें. स्वरान्त किंवा व्यजनान्त नामाचीं जास्त रूपें देत बसत नाहीं. राम, हरि, भानु, कर्तृ, तस्थिवस् वगैरे शब्द पाहावेत. प्रत्ययाची मूळें शोधण्याचाच तेवढा येथें प्रश्न होता. तेवढ्याकरता वरील विवेचन पुरेसें आहे.

आता क्रियापदाचे प्रत्यय पाहू. क्रियापदाच्या रूपात संस्कृतमध्यें बरीच गडबड दिसून येते. रूपाची अगदीं रेलचेल; काळ तर आहेतच, पण 'अर्थ' सुद्धा अगदीं स्वतंत्र रीतीनें वावरतात. क्रियापदाच्या अर्थांना काळाइतकें महत्व आहे. क्रियापदाच्या आज्ञार्थ, विध्यर्थ, संकेतार्थ वगैरे सारख्या अर्थांना स्वातंत्र्य संस्कृतमध्येंच फक्त आहे असें नाहीं तर आर्यों त्व इतर पाश्चात्य भाषातही आहे. वेदातील ऋचा ज्या भाषेंत अव-गुंठिलेल्या आहेत त्या भाषेंत ज्याप्रमाणें पुष्कळ अर्थ आहेत, त्याचप्रमाणें ग्रीक भाषेंतही क्रियेच्या 'अर्थाचें' प्राचुर्य आढळून येतें. काळापैकीं वर्तमान, भूत, भविष्य हे मुख्य होत. ह्यात भूतकाळाचे तीन प्रकार, भविष्यकाळाचे दोन प्रकार असे पोटभेद आहेत. धातूच्या मूळ रूपात आत्मनेपद आणि परस्मैपद असा फरक मानला जातो. 'स्वताच्या उपयोगासाठीं' आणि 'दुसऱ्याच्या उपयोगासाठीं' असा त्या शब्दाचा अर्थ आहे. क्रियेचें फळ कर्त्याकडे जाईल अशी ज्या वेळेस अपेक्षा असते त्या वेळेस आत्मनेपद वापरावयाचें असतें. ज्या वेळेस तेंच फळ दुसऱ्याकडे जाईल अशी अपेक्षा असते त्या वेळेस परस्मैपद वापरावयाचें असतें. ज्या वेळेस संस्कृत भाषा सर्वत्र बोलली जात होती त्या वेळेस कदाचित् अशा नियमबद्ध रीतीनें धातूचा उपयोग करीत असावेत. उत्तरोत्तर ही नियम-बद्धता कमी कमी होऊ लागली. सध्या तर असा कांहींच नियम नाहीं. धातूनीं मात्र आपलें मूळ स्वरूप कायम ठेविलें आहे व त्या स्वरूपातच त्याच्या मूळ पदाचा याग लागतो, उदाह०—दा=देणें, आदा (स्वतासाठीं)

घेणें, दृश्-लवढणें, आस्-बसणें. धातूनीं दाखविलेला अर्थ कोणाकडे जातो ह्या दृष्टीनें हा फरक झाला.

ह्याच्याशिवाय धातूंत ' गणाचा ' फरक आणखी पडला आहे. संस्कृत मधील एकंदर क्रियादर्शक धातूंचे दहा गण मानले आहेत. प्रत्येक गणाचें निरनिराळें चिन्ह आहे. तें चिन्ह धातूस चिकटावयाचें असतें व तदनंतर प्रत्ययाची योजना करावयाची असते. दुसऱ्या आणि तिसऱ्या गणा शिवाय इतर सर्व गणास चिन्हें आहेत. हीं गणाचीं चिन्हें अथवा आगम सर्वनामोत्पन्नच आहेत असें दाखविता येण्यासारखें आहे. प्रथम गणाचा ' अ ' हा 'अस्मे ' ह्याचा अवशेष आहे. चौथ्याचा ' य ' आणि दहाव्याचा ' अय ' ह्यामध्यें कोणत्या तरी साहाय्यकारी क्रियापदाचा अवशेष असला पाहिजे. सातवा व नववा ह्याचीं चिन्हें एकच आहेत असें दिसतें. सातव्याचा ' न ' नवव्याच्या ' ना ' पासून आला असावा व त्यामध्यें सार्वनामिक अंश असावा. पांचव्याचा ' नु ' आणि आठव्याचा ' उ ' हे संबद्ध असावेत. आठव्या गणाचे ' कृ ' शिवाय सर्व धातू नकारान्तच आहेत. ह्याच्यामधील न् चा आणि सातव्या किंवा नवव्या गणातील न् चा संबंध तेव्हांच दाखविता येईल. ह्याच्याही मागें जाऊन असेंही म्हणता येईल कीं धातूंची अशी दहा गणात वाटणी होण्याच्यापूर्वीची स्थिति अजमावता येण्यासारखी आहे. त्या पूर्वीच्या स्थितींत दोन गणाचेच फक्त धातू असले पाहिजेत. एक ' अ ' चिन्हाच्या गणाचे धातू आणि दुसरा ' न् ' चिन्हाच्या गणाचे धातू. तिसराही एक वर्ग कांहीही चिन्ह न पत्करणाऱ्या धातूंचा असावा. संस्कृत भाषेच्या प्रथम स्थितींत गणाचें महात्म्य इतकें नसावेंसें वाटतें, गणाचें जें स्तोम माजलें तें भाषेच्या पुढच्या स्थितींत. कारण धातुपाठातच गणाच्या चिन्हाना बेइमानी होणारे धातू पुष्कळ सापडतात व दुसरें, काळाच्या दृष्टीनेंसुद्धा दोन भाग पडतात. एक सार्वधातुकाचा व दुसरा आर्धधातुकाचा. पहिल्या वर्गांत वर्तमान, भूतकाळचा एक प्रकार, आज्ञार्थ, विध्यर्थ हे येतात. आणि बाकी राहिलेले सर्व लकार आर्धधातुकात येतात अशी त्याची विल्हेवारी आहे.

ह्यापुढें क्रियापदाच्या काळाचा क्रम कसा लागतो हें पाहू. मूळधातू व

ह्यांपुढें संबंधदर्शक सर्वनाम येतात, सार्वनामिक रूप (तेंच कालपरत्वें प्रत्यय-पदवीस प्राप्त झालेलें) हेंच क्रियापदाचें मूळरूप असलें पाहिजे. व ह्या दृष्टीनें वेदामध्यें सापडणारी भूतकाळाचीं रूपें पहिलीं असलीं पाहिजेत. भूतकाळाचा तिसरा प्रकार हाच पहिला असावा व नंतर इतर काळ उत्पन्न झाले असावेत. वर्तमानकाळाच्या रूपाबद्दल हीच विचारसरणी पत्करली पाहिजे. द्वितीय गणाच्या धातूंच्या रूपानीं वर्तमानकाळाची उणीव भरून काढली असली पाहिजे. भूतकाळाचा दुसरा प्रकार ( लिट्–Perfect ) हाही बराच अगोदरचा असावा. कोणत्याही भूतकाळांत जी एक क्रिया संपली तिची द्योतक कल्पना असते, ती ह्या लिट्काळांत ' अभ्यासानें ' दाखविली जाते. क्रियेचें सातत्य धातूच्या ' अभ्यासानें ' दाखविलें जातें. यर्करितवृत्ताच्या मुळाशीं हीच ' अभ्यासाची ' कल्पना आहे. दोन्हीं भविष्यकाळ फार अलीकडचे आहेत ह्याबद्दल शंकाच नको. कारण त्यांचीं रूपें बनविण्यास एकाच्या बाबतींत 'तृ' आणि 'अस्' ह्या साहाय्यकारी क्रियापदाच्या रूपाची मदत घ्यावी लागते. व दुसऱ्याच्या बाबतींत एकट्या ' अस् ' चें साहाय्य घ्यावें लागतें. तेव्हा हे साधित भविष्यकाळ ' तृ ' आणि ' अस् ' ह्या दोन धातूंचे वर्तमानकाळ किंवा धातुसाधित सिद्ध झाल्यानंतरचे असावेत हें उघड होतें. क्रियातिपत्ति वगैरे बाकीचे लकार यरच्या कोणत्या तरी मुख्य लकाराच्या पोटांत येतात. मुख्य आणि स्वतंत्र काळानंतर धातुसाधितें येतात. धातुसाधितें अर्थाच्या दृष्टीनें अपूर्ण असतात तेव्हां पूर्ण क्रियादर्शक रूपापासूनच त्यांची उपपत्ति लावली पाहिजे. काळाच्या उत्पत्तीचा इतिहास असा असावा. आतां त्यांच्या प्रत्ययांचा थोडासा इतिहास खालीं देतों.

इंन्द आणि संस्कृत भाषामध्यें ' म् ' हें पद सार्वनामिक अवशेष असून काहीं विभक्तीच्या प्रत्ययांत दिसतें. ह्या ' म् ' चें दुसरें रूप ' मि ' संस्कृतमध्यें प्रथम पुरुषाच्या एकवचनाचा प्रत्यय होऊन बसलें आहे. ' म् ' चा उच्चार थोडासा नरमावला म्हणजे ' व ' होतो. द्विवचनांत ' व ' येतो. ' म् ' चा जो ' व ' झाला तो फार पूर्वींच झाला असला पाहिजे, कारण तिकडील आर्योद्भव शाखांत जर्मन, लिथूनियन, स्लाव वगैरे भाषांत तो आढळून येतो. द्वितीय पुरुषाच्या एकवचनाचा प्रत्यय सि, धि, हि अशा तीन रूपानीं दिसतो. ह्यांपैकीं ' धि ' पहिला असून

त्याचा अपभ्रंश ' हि ' झाला असला पाहिजे. ' सि ' प्रत्ययात ' अस् ' धातूचा अवशेष असावा. तीच गोष्ट तृतीय पुरुषवाचक प्रत्ययाची. ' ति ' आणि ' अन्ति ' ह्यामध्यें तत् ह्या सर्वनामाचा संबंध दिसतो, किंवा ' अस् ' ह्या धातूच्या संबंधाचा संशय येतो. ' अन्ति ' मधील अनुनासिक, आगन्तुक असावा कारण तृतीय गणात तो येत नाहीं. तो द्विवचनाच्या ' थ ' मध्यें त्या धातूचा संशय येतो. ' तस् ' हे ' थस् ' ह्याचें नरमावलेलें रूप आहे. आत्मनेपदी प्रत्ययही अशाच तऱ्हेनें व्युत्पादिता येतात काहीं प्रत्ययात सार्वनामिक अवशेष सापडतात, व काहींत इतर धातूच्या ( साहाय्यकारी ) रूपाचे अवशेष सापडतात.

भूतकाळात ' अ ' आगम लागतो या ' अ ' चा आणि दुसरा नकारार्थी जो ' अ ' आहे त्याचा संबंध आहे. हे दोन्ही एकस्वरूपाचे आहेत. साधु म्हणजे चागलें अ साधु म्हणजे न–चागलें. त्याचप्रमाणें ' अ-जानात् ' हें रूपही नकारार्थच आहे. तें कसें ? नकार जो दाखवायचा तो क्रियेच्या अर्थाबद्दलचा नव्हे हें ध्यानात ठेवलें पाहिजे. ' अ–जानात् ' ह्यामध्यें जो नकार मानावयाचा तो क्रियेच्या काळाबद्दलचा आहे. वर्तमानकाळाची कल्पना त्या क्रियापदाच्या रूपात नाहीं एवढाच अर्थ भूतकाळात लागणाऱ्या ' अ ' आगमाचा घ्यावयाचा आहे. अशाच तऱ्हेचा ' अ ' चा उपयोग अन्यत्र दिसून येतो, ' उत्तम ' ह्याला ' अ ' लावला तरी त्याचा अर्थ बदलत नाहीं. उत्तम आणि अनुत्तम ह्या दोन्हींचा अर्थ एकच, ' एक ' ह्याला ' अ ' आगम लावला तर ' एक ' ह्या शब्दानें येणाऱ्या कल्पनेचाच तेवढा निषेध होतो. ' नैक ' किंवा ' अनेक ' म्हणजे एक नाहीं, दोन, तीन, काहीं, इत्यादि. इतरही उदाहरणें पुष्कळ सापडतात. " अपश्चिम कुरु पितुर्वचनम् " हें एक मराठींतही एक उदाहरण आहे; " अचपल मन माझें नावरे आवरिता " इ०

संस्कृतमधील मुख्य मुख्य प्रत्ययाचा हा इतिहास आहे. ह्याच्या पुढें प्राकृत भाषातील प्रत्ययाचा इतिहास देणें ओघानेंच प्राप्त होतें. पण तो विचार करण्यापूर्वी दुसऱ्या एका मुद्याचा विचार करणें आहे. व तो विचार संस्कृत आणि प्राकृत ह्यामधील दुवा साधण्याच्या उपयोगीं पडेल. संस्कृत भाषेंत टापटीप, नीटनेटकेपणा, भारदस्तपणा वगैरे जे गुण

दिसतात त्या गुणानीं काहीं वावदुकाचे डोळे दिपवून " भूले भ्यायात " च करण्यास त्याना प्रवृत्त केलें आहे. ह्या गुणांमुळेंच कित्येक विद्वान लोक " संस्कृतसारखी प्रत्ययानीं बजबजलेली भाषा कधींही लोकाची 'बोली' नसली पाहिजे, असा तिच्याबद्दल कायमचा शेरा ठोकून देतात. त्याच्या मतें लोकाच्या नेहेमीच्या वापरात असलेल्या बोलीमध्यें इतकी नियमशुद्धता आढळून येत नाहीं आणि संस्कृतमध्ये तर नियमशुद्धतेची पराकाष्ठा झालेली आहे. त्याअर्थी संस्कृत बोली नसावी. आणि पंडित लोकानीं आपल्या मतप्रदर्शनास किंवा वादविवादास सादरस्तपणा येण्या साठीं संस्कृत ही एक ग्रांथिक भाषा बनविली असावी असें विधान करून संस्कृत भाषेच्या सिद्धतेची ते उपपत्ति लावतात. ग्रांथिक भाषा बोलीपेक्षा निराळी असते हें खरें आहे. भाषेचीं—नागर व बोली, किंवा शिष्ट व अशिष्ट—अशीं दोन रूपें असतात परंतु नागर काय किंवा शिष्ट काय किंवा ग्रांथिक काय, ह्यापैकीं कोणतेंही भाषेचें स्वरूप असो, तें स्वरूप आपोआप बनत असतें. भाषा उत्पन्न करण्याचें काम कोणाही बृहस्पतीच्या हातून होणें शक्य नाहीं. तिकडच्या काहीं पाश्चात्य पंडितानीं सर्व राष्ट्रात काहीं विशेष प्रकारच्या व्यवहारात एकच भाषा उपयोगात असावी, ह्या सदिच्छेनें ' एस्परॅन्टो ' किंवा ' इडो ' नावाची भाषा बनविण्याचा प्रयत्न आरंभिला पण असला प्रयत्न कोठें यशस्वी होणार आहे ! सर्वच ओंफस् झालें, ह्यात काहीं आश्चर्य नाहीं. भाषा का एक दोन दिवसात तयार होणारा माल आहे ! कीं आपला पंडितानीं आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर त्याला तयार हो म्हणावें आणि त्यानें लागलींच तयार व्हावें. भाषा ही हळू हळू बनत असते व तिला बनवणारा घटक समाज. आपले मानवी एकएकटे बृहस्पति तिच्यापुढें हात टेकतीलच पण खऱ्या त्या खऱ्या बृहस्पतीचेंहि काहीं चालणार नाहीं. एवढेंच फार झालें तर म्हणता येईल कीं, संस्कृत फार फार प्राचीन काळीं बोली होती. सध्याच्या बोलींचा आणि तिचा संबंध तुटून पुष्कळ दिवस झाले आणि वैय्याकरणांनीं त्या भाषेस नियमानीं बाधून टाकून कायमचें स्वरूप दिलें. संस्कृत बोली नव्हती म्हणणाऱ्या लोकाच्या विधानाचा परामर्श येथेंच घेतला तर

अरयानीं होणार नाहीं. कारण त्याचा उपयोग प्राकृत भाषांच्या बाबतींतही आपणास होईल.

संस्कृतचा गीर्वाण भाषा म्हणून साभिमानानें उल्लेख करतात हें खरें. परंतु त्याबरोबर तिला मृतभाषा म्हणूनही संबोधतात. मृतभाषा म्हणजे सध्या तिचा ' बोली ' म्हणून कोठें उपयोग होत नाहीं, एवढाच अर्थ घेतला तर काहीं हरकत नाहीं. पण कधीं काळींसुद्धा ही भाषा जिवंत नव्हतीच असें ते लोक प्रतिपादितात. भाषेच्या जिवंतपणाचीं खरीं चिन्हें तरी काय आहेत ? आणि तीं संस्कृतमध्यें आहेत कीं नाहींत ? मृतभाषा म्हणून जें संस्कृतला उपेक्षेनें संबोधतात तें वर्णत्याग, वर्णलोप, वाढ वगैरे भाषेच्या जिवंतपणाचीं चिन्हें सापडत नाहींत म्हणून कीं काय ? संस्कृत ही बोली होती हें आपणास सिद्ध केलें पाहिजे व हें जर सिद्ध झालें तरच ह्या असल्या जिवंत संस्कृतपासून क्रमानें पालि प्राकृत अपभ्रंश वर्तमानकालीन बोली उत्पन्न झाल्या आहेत ह्या विधानाच्या सत्यतेस पाठिंबा मिळेल.

संस्कृतच्या प्रत्ययांत सार्वनामिक अवशेष आहेत सर्वनामाचा कालांतरानं प्रत्ययांत लय होणें हेंच एक भाषा बोलली गेली असल्याचें चिन्ह आहे सर्वनामापासून प्रत्यय साधणें हा संस्कृतनेंच तेवढें विशेष असें काय केलें ? जगांतील इतर भाषा जें करतात तेंच संस्कृत भाषेनें केलें आहे. ते सार्वनामिक अवशेष असून सुद्धा इतर जुन्या भाषा बोली ठरतात आणि त्याच्याच योगानें संस्कृत मात्र बोली ठरू नये हा कोणत्या भाषाशास्त्रांतील न्याय ? संस्कृतमध्यें प्रत्ययांचा बजबजाट व समासाचा बोजडपणा फार आहे म्हणून ती बोली ठरू शकत नाहीं हें एक त्या नास्तिपक्षाचें म्हणणें आहे. प्रत्ययांचा बजबजाट व समासाचा जाडपणा ह्यांनीं जर संस्कृत बोली होऊ शकत नाहीं, आणि हे जर तिच्या मार्गांतील अडथळे समजावयाचे, तर पाली आणि प्राकृत ह्यांमध्ये ते काय कमी आहेत ? पालींतही प्रत्यय आहेत तिकडील पाश्चात्य जुन्या भाषांतही प्रत्यय आहेत. समासाचा बोजडपणा प्राकृतांत तर परमावधीस नेला आहे. मालतिमाधव नाटकांत तो पहावयास सापडतो. बरं उच्चारसौकर्यांकडे पाहावें तर प्राकृतमध्यें तेंही नाहीं. कारण व्यस्त स्वर उच्चारावे लागतात, आणि हें करणें

बोलणाऱ्याच्या व लिहिणाऱ्याच्या दृष्टीनें अस्वाभाविक आहे. हे दोष असून सुद्धा प्राकृत व पाली बोली ठरतात व मुनि महावीर व महात्मा बौद्ध ह्यांनीं आपल्या नवीन धार्मिक मताचा प्रसार अगदीं खालच्या लोकात त्याच्या नेहेमींच्या बोलींत केला असें म्हणतां येतें. तर तेच दोष असून संस्कृत सुद्धा बोली का ठरणार नाहीं ?

ज्याप्रमाणें आपण इकडे संस्कृतपासून प्राकृतद्वारा वर्तमानकालीन बोली उत्पन्न झाल्या असें म्हणतों, त्याचप्रमाणें तिकडे लॅटिनपासून सर्व रोमॅन्स ( इंग्लिश-फ्रेंच इ. इ. ) भाषा उत्पन्न झाल्या असें म्हणतात. भाषाचा स्वभाव, फेरबदल वगैरे सर्वकाळीं सर्व ठिकाणीं सारखेच होतात. शिवाय लॅटिन काय किंवा संस्कृत काय, दोन्हीही वेदपूर्वकालीन आर्यांच्या टोळीच्या उपयोगात असलेल्या भाषाचे विशेष प्रकार होत. तेव्हा दोहोंत स्वभावसाम्य सापडणें हें चमत्कारिक नव्हे.

नाटकातील पात्रें प्राकृत वापरतात हें एक प्रमाण प्राकृत बोली होत्या हें सिद्ध करण्याकरता आणतात. पण संस्कृत बोली होती ह्यालाही तें तितकच जोरदार प्रमाण नाहीं काय ? संस्कृत भाषा म्हणजे सर्वांची अव्वल-पासून अखेरपर्यंत एकजात ' बोली ' होती असें कोणी म्हणतच नाहीं. ब्राह्मणाची, राजाची वगैरे वरच्या लोकाची बोली ती असू शकेल म्लेंच्छ, अनार्य वगैरे अन्यजातीय व अन्यसंस्कृतीचे लोक निराळी एकादी बोली वापरत असले पाहिजेत कारण मनूनें म्लेंच्छ आणि दस्यु ह्याच्या भाषेचा वेगळाच निर्देश केला आहे.

यास्क, पाणिनी वगैरे वैय्याकरण 'छन्दसि ' आणि ' भाषायाम् ' असा भाषाचा भेद करून संस्कृतसंबंधीं ' भाषायाम् ' असा प्रयोग करतात लोकात संस्कृत भाषा किंवा बोली असल्याशिवाय असा प्रयोग करणें शक्य नाहीं. यास्काच्या ग्रंथात तर 'प्राच्य उदीच्य' असा लोकाच्या भाषेमध्यें असलेला प्रांतिक भेदही उल्लेखिला आहे ( शवतिर्गतिकर्मा कंबोजेष्वेव भाष्यते विकारमस्यार्येषु भाषन्ते शव इति ... ) प्रांतिक भेदही उल्लेखिला आहे ( दातिर्लवनेषु प्राच्येषु दात्रमुदीच्येषु. निरुक्त २.२ ) पाणिनीच्या अष्टाध्यायीतसुद्धा त्यांनी काहीं सूत्र गोवलीं आहेत. त्यावरूनही संस्कृत बोली होती ह्या विधानास बळकटी येते " नादित्या त्रोधे पुत्रस्य "" एकश्रुति दूरात्सबुद्धौ "" वाक्यस्य टेः प्लुत उदात्तः " "प्रत्य-भिवादेऽशूद्रे ", आदिनि शब्दापूर्वी व अपशब्द वापरण्यापूर्वी पुन शब्द द्वित्त

'ष 'चा उच्चार नये, इत्यादि, या सर्व पुरावा संस्कृत बोली होती असा स्पष्ट ध्वनि निघतो. स्वाध्यायामें क्रियापदाची काही रूपें आहेत त्यावरून तर भगदीन शंका रहात नाही. " खाद खादेति खादति कुरु कुरु इति करोति, " " खा खा म्हणतो, कर, कर, करतो, कामागार्गी मर मर मरतो इत्यादि. हा एक प्रकार ओदन भुक्त्व शत्रून् पिब धाना खादेति एवं अयम् अभ्यवहरति–भात खेव, पेर पी, लाडू खा असा तऱ्हेनें हा पोट भरतो. हा दुसरा प्रकार. तिसरा प्रकार जमून धातूपाधिताचा जीवनाच नरतो, इहजमाह गृह्णाति इत्यादि, दण्डादण्डी, केशाकेशी हे सर्व प्रकारचे वाक्प्रचार बोलीशिवाय केवळ माधिक भाषेत प्रचारात असणें शक्य नाही. तेव्हा संस्कृत ही बोली असलीच पाहिजे. .

" शिष्टे शब्दार्थसम्बन्धे " या वार्तिकावर पतंजलीनेंही संस्कृत बोली होती ही साक्ष दिली आहे. रामायणांतसुद्धा हनुमान आणि सीतादेवी ह्यांचा संभाषणात संवाद व्यावहारिक व बोल्या असा संस्कृत भाषेत झाला असे सांगितलें आहे.

आता संस्कृतमध्यें बोलीला लागणाऱ्या जिवंतपणाची आणखी काही चिन्हें सांपडतात की नाहीं हें पाहू. संस्कृतमध्यें काही वर्णांचा लोप होतो. काहींचा अपभ्रंश होतो. यास्काच्या निरुक्तात असली उदाहरणें आहेत.

( १ ) आदिलोप–उदा०–स्त, सन्ति, ( अलोप ) स्कंध—कंधर ( खांदा–मराठी )

( २ ) अन्त्यलोप–उदा०–गत्वा, गत ( मलोप ).

( ३ ) उपधालोप–उदा०–जग्मतु जग्मु ग्मा, ग्मा, इ. ( अलोप )

( ४ ) आदिविपर्यय–उदा०–ज्योतिस् ( द्युत धातूपासून द्यौस्पितर ज्युपिटर )

(५) वर्णोपजन–उदा०–आस्थत् ('स्था'पासून), मरुत ('म्रद्'पासून)

कोणत्याही बोलींत हे असले फरक झालेच पाहिजेत. असे फरक झाले तर भाषा कधीं काळीं जिवंत बोली होती असें ठरतें. संस्कृतमधील फरक वर दिलेच आहेत. ह्याशिवाय गुण, वृद्धि, संप्रसारण, किंवा जर्मन भाषेच्या धर्तीवर अब्लाउट, उम्लाउट, स्वरभक्ति वगैरे फरक आहेतच.

सजातीय वर्ण लागोपाठ आले म्हणजे त्यांपैकीं एक नाहींसा होतो, उदा०- जहीहि आणि जहि अशीं दोन्ही रूपें आहेत, शर्ष+जिर व शेव+वृधः मिळून शर्षिजर, शेवृध अनुक्रमें शब्द होतात. अशा प्रकारानें पाहिलें म्हणजे बोलीस लागणारा जिवतपणा वर्णाच्या त्यागात, आगमात, विपर्यांत संस्कृतभाषेमध्यें पुष्कळच सांपडतो. वर्णत्याग, वर्णागम वर्णविपर्यय हे कायम झालेल्या व लोकांच्या हरहमेश बोलण्यात नसलेल्या भाषत सांपडण्याचें काहींच कारण नाहीं. तेव्हा संस्कृत ही बोली असलीच पाहिजे. इतका पुरावा मिळाल्यानंतर संस्कृत ही पंडिताची भाषा किंवा व्याकरणाच्या साच्यात घालून तयार केलेली भाषा कशी ठरते व तिला अव्यवहार्य असेपर्यंत " मृतभाषा " असा शिक्का का मारावा ? संस्कृत एके काळीं बोली होती आणि भाषा बोली म्हणून वापरली म्हणजे तींत नाना प्रकार होऊन त्यामधून उपभाषा, पोटभाषा उत्पन्न होतात तीच गत संस्कृत भाषेची झाली असली पाहिजे. अपभ्रंश होऊन पाली, प्राकृत वगैरे भाषा होऊन सध्या आपण ज्या भाषा बोलतो त्यामध्ये संस्कृतचा परिणति झाला असली पाहिजे. यास्काच्या निरुक्तात प्राच्य, दाक्षिणात्य, उदीच्य अशा शब्दानें जे प्रांतिक भेद उल्लेखिले आहेत त्यामध्येंच पुढच्या देशपरत्वें बनोवल्या गेलेल्या प्राकृत भाषाच्या नावाचें बीज आहे. संस्कृत भाषा जरी शिष्ट, नागर बनली होती तरी बोली असल्यामुळें कालपरत्व, प्रांतपरत्वें तिजमध्यें फरक होत होते व अशा फरकाची जाणीव यास्कास असल्यामुळेंच त्याला उल्लेख करणें भाग पडलें. संस्कृत भाषा बोली जर नसती व केवळ नागर स्वरूपातच जर असती तर असे प्रांतिक भेद असण्याचे कारण काय ?

संस्कृतच्या बोलीपणाबद्दलच्या जशा शंका आहेत तशाच प्राकृतबद्दलही आहेत. प्राकृत भाषा कधा काळीं बोली असणें शक्य नाहीं असें काहीं लोकाचें म्हणणें आहे. संस्कृतमधील वर्णोच्चार, शब्दसिद्धि, वाक्यरचना वगैरे गोष्टींकडे सहज जरी नजर टाकली तर संस्कृत बोली नसावी असे म्हणण्याकडे सहसा बुद्धि धावत नाहीं पण प्राकृताची स्थिति तशी नाहीं. प्राकृत भाषाचा प्रत्येक बाबतींत बरेंच दिसणारा पुरावा तर फारच ऐचापेचाचा आहे. महात्मा बुद्ध व महावीर यानीं आपल्या धर्ममताचा प्रसार व पुरस्कार लोकाच्या बोलींतच केला हें खरें. परंतु असला ऐतिहासिक पुरावा

बाजूस ठेवून केवळ भाषेचें स्वरूपच पाहिलें तर शंका दुणावेल ह्यात काहीं खोटें नाहीं. पाली व पुढील प्राकृत ह्या बोली नव्हत्या अशी ग्वाही देणारे त्याच्या स्वरूपातीलच मुद्दे खाली देतों ही एक बाजू भासलेला आहे, त्या मुद्द्यांना उत्तरेंही आहेत.

पहिली गोष्ट शब्दसिद्धिविषयीं. अय्यउत्त, ओवार, ओआस केअस, गअ, कअ, मअ ( मृत, मृग, मद, मत, मय इत्यादिसाठीं एक रूप ) वाअ ( वात, वाक, वान साठीं ) असे शब्द पाहिले म्हणजे असे उच्चार-सौकर्यास विघातक शब्द नेहमींच्या व्यवहारात वापरता येणें शक्य आहे कीं नाहीं अशी जबरदस्त शंका येते हें झालें शब्दाबद्दलचें. बरें, व्याकरण पहावें तर तेंही काहीं आधार देत नाहीं भाषेनंतर व्याकरण येतें हें खरें पण व्याकरणानें तरी प्रामाणिकपणानें भाषेंतील खाचाखुणा नमूद करून ठेवल्या पाहिजेत प्राकृतातील कोणतेंही व्याकरण घेतल तरी संस्कृत मूळ शब्दाची प्राकृतात छाया कशी तयार करावयाची ह्याचीच तें व्याकरण मांडणी करत प्राकृत शब्दाचें प्राकृत म्हणून स्वतंत्र अस्तित्व कोणतेंच व्याकरण मानात नाहीं शब्द प्राकृत कसे बनले हें सांगितलें पाहिजे. पण ह्याविषयीं हीं व्याकरणें काहींच बोलत नाहींत. त्यात नियम दिले आहेत ते सुद्धा भरपूर नाहीत आणि सर्व शब्दसिद्धि त्या नियमानीं लागत नाहीं नाटक वगैरे ग्रंथात प्राकृत आहे पण प्राकृत भाषा असताना कोणतेंही नाटक लिहिलें गेलें नाहीं त्यामुळें शब्दसिद्धिवरचा जो आक्षेप तो त्यावरही येतो नाटकात किंवा इतर काव्यात ज काहीं प्राकृत गद्य अथवा पद्य वाङ्मय सापडतें त्यात प्राकृतमधील म्हणी किंवा वाक्प्रचार सांपडत नाहींत अशी जर वस्तुस्थिति आहे तर प्राकृत ह्या बोली होत्या हें तरी कबूल कसें करावयाचें ? प्राकृत भाषा बोली असताना बाहेरून आलेल्या आर्य लोकांचा आणि एतद्देशीय अनार्य लोकांचा संबंध आला होता अनार्यांच्या आणि आर्यांच्या भाषाभाषांमध्यें देवाण घेवाण खचित झालें असलें पाहिजे असें असून सुद्धा प्राकृत वाङ्मयात अनार्य शब्दांचा फारसा मागमूस दिसून येत नाहीं, इत्यादि इत्यादि.

हा पूर्वपक्ष आहे ह्यालाही उत्तर आहे व ज्याप्रमाणें संस्कृत बोली होती हें सिद्ध करता आलें त्याचप्रमाणें प्राकृतही बोली होत्या हे सिद्ध करतां

येण्यासारखें आहे. वर दिलेल्या मुद्द्यांपैकीं कांहीं मुद्दे खरे आहेत. ते कबूल केले पाहिजेत, पण ते कबूल केले तरी कांहीं एक बिघडत नाहीं. प्राकृतच्या सध्याच्या स्वरूपांत जे दोष दिसून येतात ते बऱ्याच अंशीं प्राकृत व्याकरणाच्या सदोषतेमुळें दिसून येतात. लेखकाच्या किंवा वैय्याकरणींच्या दोषामुळें भाषा कशी सदोष ठरणार? आणि तशी ती ठरूं नये. हेमचंद्रानें लिहिलेल्या "देशीनाममाले" कडे पाहिलें तर प्राकृत भाषा अनार्यांच्या भाषांच्या संपर्कापासून अलिप्त राहिल्या असें कसें म्हणतां येईल. संस्कृत शब्दाच्या छाया म्हणून प्राकृत शब्दाची वाट प्राकृत व्याकरणाच्या साहाय्यानें लावतां येते व ज्या शब्दाच्या आर्यत्वाच्या शिक्क्याबद्दल संशय आला त्यांची उपपत्ति "देशीनाममाले"त गोवून हेमचंद्राला लावावी लागली. प्राकृत बोली होत्या त्याबद्दल वाद नाहीं. पण त्या बोली होत्या केव्हां? संस्कृत नंतर कीं अगदीं पहिल्यापासून? आर्यलोक ज्या वेळेस हिंदुस्थानांत उतरले त्या वेळेस त्यांच्यामध्ये संस्कृत भाषा शिष्ट होऊन बसली होती वरच्या वरच्या दर्जाचे लोक नेहेमींच्या व्यवहारांत संस्कृत वापरीत आणि इतर खालचे लोक निराळ्याच भाषा वापरीत असत. इतर अनार्य लोकांशीं यज्ञयाग करणाऱ्या किंवा आठा दिवस स्तोत्रें गाणाऱ्या आर्यब्राह्मणांचा जरी संबंध नसला आला तरी इतर आर्य कारागीर, हरहुन्नरी, पोटभरू लोकांचा संबंध फार आला असावा व ह्या संबंधामुळेंच संस्कृतभाषा भ्रष्ट होत होत खालच्या स्थितीप्रत येऊन पोहोंचली, व पुढें प्राकृतची मजल तिनें गाठली पुढें अपभ्रंश नांवाच्या भाषा झाल्या व नंतर बोली झाल्या. प्राकृत भाषा फार फार प्राचीन काळीं बोली होत्या. प्राकृताचा उगम प्रथमपासूनचा आहे. वेदाच्या भाषेच्या बरोबर प्राकृत खालच्या लोकांत चालू होत्या. एक बाजूनें वैदिक संस्कृत-पाणिनीय संस्कृत-लौकिक संस्कृत असा क्रम शिष्ट संस्कृताचा दिसून येतो तर दुसऱ्या बाजूस प्राकृत-प्राकृतिक-प्राकृतिकोद्भव असा क्रम खालीचा दृष्टीस पडतो. दोन्ही ओघ निरनिराळे अगदीं स्वतंत्र रीतीनें वाहत होते. प्राकृत भाषा मूळ हिंदुस्थानांतील अनार्यांच्या व बाहेरून आलेल्या आर्यांच्या संस्कृत भाषेनें त्यांच्यावर जिंकून वर्चस्व चालवून त्या सर्वांवर आर्यत्वाचा शिक्का मारला हें म्हणणें भाषाशास्त्रातील नियमास सोडून आहे. प्राकृत भाषा अनार्य कधींही ठरणार नाहींत. त्या

भाषा अनार्य लोकात वर्षानुवर्षे प्रचलित नव्हत्या. अनार्य लोकांच्या फार प्राचीन काही मुद्दां भाषा निराळ्या होत्या. प्राकृतभाषा आर्य लोकातच प्रचलित होत्या. आर्यांच्या वसाहतींत लोकांची संख्या वाढत चालल्यामुळें मूळच्या अरराल तेजस्वी आर्यसंस्कृतीपासून काहीं आर्य दूर दूर होऊं लागले आणि अनार्य संस्कृतीशीं जास्त मिसळू लागले. ह्या प्रवृत्तीचा परिणाम एकमेकांच्या भाषेवर झाला. जे काहीं थोडे आर्य मूळच्या तेजस्वी संस्कृतीला पारखे न होता शारखे जाग्रत राहिले त्यांनींच तेवढी संस्कृत भाषा कायम ठेवली. आर्यांच्या टोळ्या जशा एकामागून एक येऊं लागल्या तशा मागच्या पुढल्यास पुढें रेटू लागल्या, व हळू हळू उत्तर हिंदुस्थानचा सर्व प्रदेश त्यांनीं व्यापून टाकला. वसाहतींच्या वाढीमुळें स्थानत्याग करावा लागला व स्थानत्यागाच्या अनुषंगानें येणारे रूढीमध्यें, भाषेमध्यें, अन्नामध्यें व इतर बाबींत फेरबदल झाले. त्यामुळेंच भाषेमध्यें प्राकृतचीं आपणास निरनिराळीं रूपें दिसतात. पाली–शौरसेनी–मागधी–पैशाची–महाराष्ट्री ( व त्याचे अपभ्रंश ) अशीं निरनिराळीं देशपरत्वें नांवें मिळण्याचें हेंच कारण आहे. भाषेंत रूपांतरें किंवा अपभ्रंश होण्याचीं इतर कारणें असतीलच पण त्या सर्वांत अनार्यांचा संपर्क हें कारण जास्त प्रामुख्यानें आहे. प्राकृत भाषांत वसाहतींच्या प्रगतीस धरून व उच्चारास धरून एकच उत्पत्तीचा क्रम लागतो. वैदिक काळात शिष्ट भाषेच्या अपभ्रष्ट छाया प्राकृत लोकात प्रचलित होत्या. त्याच पुढच्या प्राकृतच्या व तद्‌कालीन बोलीच्या जननी होत. प्रांतपरत्वें संस्कृत भाषेच्या निरनिराळ्या छाया झाल्या मगधात जी छाया सुरू झाली तिला मागधी म्हणू लागले. शूरसेनाच्या राज्यात जी छाया सुरू झाली तिला शौरसेनी म्हणू लागले. पिशाचपुर–पिशाऊर–पेशावर जवळ जी छाया सुरू झाली तिला पैशाची म्हणू लागले. महाराष्ट्रीच्या नावाबद्दल जरा वाद आहे. महाराष्ट्री हें नाव प्राकृतला मिळालें आहे तें संस्कृतची एक छाया ' महाराष्ट्रात ' सुरू होती म्हणून तिला म्हणू लागले कीं, त्या नावाचें दुसरें काहीं कारण आहे ? देशावरून भाषेस नाव पडतें हें खरें पण हा नियम महाराष्ट्रीच्या बाबतींत खरा आहे कीं काय ? प्राकृत, गद्य आणि पद्य ह्या दोन स्वरूपात सापडतें. त्यापैकीं गद्य शौरसेनींत लिहिलें आहे व

नुसतें 'प्राकृत' असें म्हणत. ज्याअर्थी तें नाव सापडत नाहीं त्या अर्थी बाकीच्या प्राकृत भाषाना ज्याप्रमाणें ज्या ज्या प्रांतात त्या बोलल्या जात होत्या त्या त्या प्रांतावरून त्याना नावें मिळालीं तसें प्राकृतला महाराष्ट्री हें नाव मिळालें तें कांहीं ज्या प्रांतात ती भाषा बोलली जात होती त्यावरून पडलें नाहीं हें उघड आहे. महाराष्ट्री म्हणजे महाराष्ट्र प्रांतात बोलण्यात असलेली भाषा असा अर्थ नसावा. सर्व राष्ट्राची–मोठ्या राष्ट्राची भाषा असाही त्याचा अर्थ असावा. 'मराठा' ह्या शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधीं जे तर्क पुढें येतात तद्वत् ह्याचें आहे. महाराष्ट्री भाषा सर्वमान्य झालेली असावी म्हणून व्याकरणकार "शेष महाराष्ट्रीवत् अथवा प्राकृतवत्" असें इतर प्राकृत भाषांच्या नियमात हवाला देतात सध्याच्या मराठीला जर महाराष्ट्री प्रसवली असें म्हणावें तर ह्या आईलेकीच्या स्वरूपात किंवा गुणात साम्य सापडलें पाहिजे कीं नाहीं? मराठींतील पूर्वकालवाचक धातुसाधित तेवढें महाराष्ट्रीतून आलें असावें. व दुसरें भाववाचक नामाच्या 'पण' ह्या प्रत्ययात महाराष्ट्री 'त्तण' प्रत्ययाचा थोडासा वास येतो, बाकी कांहीं नाहीं. अपभ्रंश म्हणून जी एक मधली पायरी आहे तिनें मराठीची उपपत्ती लागते पण तिचा महाराष्ट्रीशी संबंध इतर भाषांशीं असा आहे तसाच औपचारिक आहे. विशेष जिव्हाळ्याचें नातें प्रकट होत नाहीं शिवाय महाराष्ट्री महाराष्ट्रात प्रचलीत नसून राजपुतान्यात प्रचलीत होती अशीही शंका कांहीं विद्वानानीं काढली आहे. हें शंकास्थान आहे खरें.

ह्या वसाहतीच्या प्रगतीच्या दृष्टीनें प्राकृत भाषाचा क्रम झाला. आता " सर्व प्राकृतचा उच्चारदृष्टया क्रम देऊं. एक वर्तते ह्या क्रियापदाचें व दुसरें कृत ह्या मु. मु धातुसाधिताचें.

| | | |
|---|---|---|
| १ पाणिनीय भाषा | वर्तते | कृत |
| २ पाली | वट्टति | कत |
| ३ शौरसेनी | वट्टदि | कद |
| ४ मागधी | वट्टडि | कड |
| ५ पैशाची | वट्टति | कत |
| ६ महाराष्ट्री | वट्टइ | कअ |

पाणिनीय भाषेंत वृत् धातूचें वर्तमानकाळीं तृतीय पुरुषीं एकवचनीं

आत्मनेपदी रूप घतलें असें होतें. प्राकृतांत प्रायः पदभेद सार्वत्रिक आहे. 'सं' चा 'ह' सर्व प्राकृतांत सामान्य आहे. 'ति' ची 'दि' शौरसेनींत होते. पैशाचींत मृदु व्यंजनें नसल्या कारणानें 'ति' ची 'ति' च कायम राहते. मागधींत शौरसेनी 'दि' ची 'डि' होते. महाराष्ट्रींत 'ति' ची 'इ' होते. 'ति' ची 'दि' होणें जितकें सजातीय व सुलभ आहे तितकें 'इ' होणें सजातीय व सुलभ नाहीं. 'ति' ची 'दि' पहिल्या पायरीचा अपभ्रंश आहे. 'ति' चा 'इ' व्हावयाची म्हणजे 'ति-दि-डि-ढि-हि-इ ह्या परंपरेनें होईल. म्हणजे 'इ' होणें पहिल्या पायरीचा अपभ्रंश नसून पहिल्याच्या अपभ्रंशाचा अपभ्रंश आहे. दुसरें उदाहरण 'कृत' ह्या धातूसाधिताचें."

(राजवाडे ज्ञानेश्वरी प्रस्तावना.)

वर उल्लेखिलेल्या प्राकृत भाषांशिवाय आणखी पुष्कळ वाङ्मभाषा आहेत. मुख्य वर दिल्याच आहेत. प्रांतपरत्वें त्यांना नांवें पडलीं आहेत. एकट्या महाराष्ट्रीच्या बाबतींत सुद्धां फार वादग्रस्त आहे. मागधीवाच अर्धमागधी म्हणून एक प्रकार आहे. त्याला अर्धमहाराष्ट्रीही म्हणता येईल. पैशाची भाषेचा चुलिकापैशाची म्हणून एक भेद आहे. दोन भाषांच्यामध्यें एक संधीकाल असतो. एक भाषा मरत असते व तिच्या जागीं दुसरी नवी भाषा येत असते. पाश्चात्य लोकांच्या मतें एक भाषा जाऊन दुसरी भाषा तिच्या जागीं येण्यास अजमासें दोनशें वर्षें लागतात. संधिकालाची मर्यादा त्यांनीं साधारणपणें २०० वर्षें घातली आहे. प्राकृत भाषांच्या बाबतींतसुद्धां प्रत्येक प्राकृत भाषेचा एक एक निराळाच अपभ्रंश होता शौरसेनी अपभ्रंश, मागधी अपभ्रंश, इत्यादि असे प्रकार होतेच. व त्याबरोबर दुसरा किंवा त्या सर्वांचा एकवटून एक निराळाच प्रकार उत्पन्न झाला व त्यालाच लोक "अपभ्रंश" म्हणू लागले. मराठी भाषेच्या दृष्टीनें ह्या अपभ्रंश भाषेचें आपणास फार महत्त्व आहे. कारण मराठीच्या उत्पत्तींत इतर भाषांचा कांहीं थोडा फार हात असला तरी अपभ्रंश भाषेचा हात बराच आहे व तो कोणकोणत्या बाबतींत दृग्गोचर होतो हें पुढें स्वतंत्र रीतीनें मराठी भाषेचें व्याकरण ह्या सदराखालीं सांगणारच आहों. प्राकृत भाषा, अपभ्रंश, लाटी, आभीरी इत्यादि

पद्य महाराष्ट्रींत लिहिलें आहे. अगदीं जुन्या प्राकृत व्याकरणांत महाराष्ट्री हें नांव सांपडत नाहीं. महाराष्ट्री म्हणून जी प्राकृत आपण समजतों तिच्यामध्यें नाहींत संस्कृतमधील शब्द प्राकृतमध्यें येतांना कधीं कधीं आपलीं लिंगें बदलतात. संस्कृतमधील चतुर्थी विभक्ति नाहींशी झाली आहे. द्वितीया व दुसऱ्या विभक्तींसाठीं षष्ठी वापरतात. सप्तमीसाठीं कधीं कधीं द्वितीया घालतात. परस्मैपद, आत्मनेपद हा भेद पार काढून टाकून सर्व धातू एकजात परस्मैपदी बनविले आहेत. दोन विजातीय व्यंजनें कधींही एकमेकांजवळ येऊं शकत नाहींत. प्रत्येक व्यंजनांत स्वर असलाच पाहिजे. काळ व अर्थ ह्यांचें संस्कृतमधील अवडंबर प्राकृतांनीं बरेंच कमी केलें आहे. ह्या साधारण खुणांखेरीज प्रत्येक प्राकृताला स्वतःच्या कांहीं निराळ्या स्वतंत्र खुणा आहेत.

महाराष्ट्री प्राकृतांत पुढें दिलेल्या खुणा दिसून येतात. १ पंचमीचे प्रत्यय 'ओ आणि उ कधीं कधीं होतात उदा०—वच्छाओ, वच्छाउ. घणाओ-घणाउ. २ 'त' चा लोप होतो. 'पिता' चें 'पिआ, असें रूप होतें ३ 'र्य' चा 'ज्ज' होतो. पर्याय व आर्यपुत्र हे शब्द पज्जाअ व अज्जउत्त असे होतात. ४ 'थ' चा 'ह' होतो. 'कथा' शब्दाचें 'कहा' असें रूपांतर होतें. 'भू' धातूचें रूपांतर 'हु' मध्यें होतें शौरसेनींत जरा त्यापेक्षां निराळा प्रकार आहे. पंचमीचे प्रत्यय 'दो, दु' आहेत—रामादो रामादु. 'त' चा 'द' होतो उ. पिदा 'र्य' चा य्य होतो 'पय्याय अय्यउत्त. 'थ' चा 'ध' होतो उदा०—'कथा' चें 'कधा' होतें. 'ननु' बद्दल ण होतें. सवोच नाचें 'हुवे' रूप मिळतें. 'भू' मधील 'भू' शौरसेनींत नाहींसा होत-नाहीं. मागधीमध्यें शौरसेनीसारखेच फरक होतात. व कांहीं निराळे स्वतंत्रही आहेत. उदाहरणार्थ 'स्' चा 'श्, 'र्' चा 'ल्' होतात. प्रथमेचे एकवचनाचा प्रत्यय 'ए' आहे. 'क्ष' चा 'क' होतो. न्य्, ण्य्, ज्ञ्, ञ्ज्, ह्या सर्व संयुक्त व्यंजनांबद्दल ञ्ञ् हें व्यंजन येतें त्याच प्रमाणें ज्, य्, र्य् ह्यांबद्दल 'य' व्यंजन येतें. 'अहम्, वयम्' ह्या सर्वनामांबद्दल 'हगे' हें सर्वनाम वापरतात. 'स्था' चें रूपांतर 'चिष्ठ' मध्यें होतें, पैशाचीमधील फरक पुढीलप्रमाणें आहेत. ण् आणि न् ह्यांबद्दल न्

येतो.' न्य्, ण्य्, ज्ञ ' ह्याबद्दल ' ञ्ज् ' येतो. ' त् ' आणि ' तद् ' ह्यांबद्दल द् होतो. ' ल् ' चा ' ळ् ' होतो. ' ट ' चा ' ड ', ' र्य् ' बद्दल ' रिय् ' य्य, य्, बद्दल ल् अशीं रूपें होतात.

ह्या सर्व प्राकृत भाषांबरोबर शिलालेखांत वापरलेल्या प्राकृत भाषांचा उल्लेख केला पाहिजे. पाली भाषेच्या नंतरचीं हीं रूपांतरें होत. ज्याअर्थी शिलालेखांत सम्राट् अशोकाच्या स्वभावांत नैतिक परिवर्तन झालेल्याचें व त्यानें लोकांचें हिंस्र मन हिंसेपासून वळवून निर्वाणाच्या मार्गाकडे लावण्यासाठीं आपलें परिवर्तन आपल्या साम्राज्याच्या चारी कोपऱ्यांत खोदविलें त्या अर्थी ते लेख ज्या ज्या प्रांतांत खोदवले त्या त्या प्रांतांतल्या बोलीमध्येंच खोदवले असले पाहिजेत. त्या लेखांचे सन खिस्तपूर्व २५२–२४२ पर्यंत येतात. देशपरत्वें बोलींत पडणारे फरक ह्या लेखांच्या भाषेंत दृष्टीस पडतात. उत्तरेस शहाबादगर्हि व मणशेर येथें लेख आहेत; व त्यांच्या जवळच डेहराडून जिल्ह्यांत खालशी येथेंही लेख आहत. ह्या दोन्ही जागच्या लेखांची लिपी एकच खरोष्ट्री आहे, तरी भाषेंत वर्णप्रक्रियेसंबंधीं फरक पडले आहेत. खालच्या बाजूस तीन ठिकाणीं लेख आहेत. काठेवाडांत गिरनार, ठाणा जिल्ह्यांत सोपारा, व पूर्वेस गंजम जिल्ह्यांत टवली व जौगड ठिकाणीं तेच लेख ब्राह्मी लिपींत लिहिले आहेत. ह्यांमध्यें भाषेचे बारीक बारीक भेद आहेत. भाषा प्राकृतच आहे. पण एक लेख दुसऱ्यापेक्षां थोडा का होईना निराळा लागतो. ह्याचें कारण प्रांतपरत्वें भाषेमध्यें पडणाऱ्या फरकाशिवाय दुसरें कोणतें असणार ? मूळ अशोकानें आपल्या स्वभाषेंत ते जाहिरनामे काढले व राज्याच्या चारी सीमांस चालणाऱ्या भाषांत ते लिहविले. अशोकाच्या वेळेस म्हणजे खिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत प्राकृत भाषा सर्वमान्य होत्या. बुद्ध, महावीर ह्यांच्या वेळीं पाली–प्राकृताची भरभराट होती. त्या वेळीं प्राकृताचें आद्य रूप पाली हें प्रचलित असावें. पाली आणि पुढच्या प्राथमिक प्राकृत ह्यांच्या मधील दुवा ह्या खोदीव शिलालेखावरच्या भाषा साधतात. ह्या भाषाही प्राकृतांचींच रूपांतरें होत. संस्कृत त्या वेळीं अजीबात नव्हती असें म्हणतां यावयाचें नाहीं. कारण, बुद्धाच्या कांहीं २–३ शतकें अगोदरच लौकिक संस्कृताचें व्याकरण भगवान् पाणिनीनें रचलें. त्या वेळेस ती भाषा बोल-

त्यांत असलीच पाहिजे. त्याच्यापूर्वी एक दोन शतकें भास्काचार्यांच्या लेखांतही संस्कृत तत्कालीन बोली होती ह्याचा पुरावा मागें दिलाच आहे. एवढेंच नव्हे तर खुद्द प्राकृत सर्वमान्य झाल्या असतांना देखील संस्कृत कांहीं ठिकाणीं बोलली जात होती. महर्षी पतंजलीनें आपलें व्याकरण-महाभाष्य लिहिलें त्या वेळीं संस्कृत बोली असावी असा तर्क करण्यास पुरेसा पुरावा आहे. पतंजलीचा काळ ' अरुणद्यवनः साकेतम् ' मध्यें उल्लेखिलेल्या मिनन्डर ( मिलिंद ) च्या स्वारीच्या वेळानें ठरण्यासारखा आहे. ख्रिस्तपूर्व १५० पर्यंत संस्कृत कोठें तुरळक तुरळक पाहिजेल तर म्हणा पण बोलली जात होती हें खास. भाषेच्या बाबतींत नक्की काळ सांगणें जरा धोक्याचें असतें. अमकी भाषा मृत झाली केव्हां व दुसरी तिच्या जागीं आली केव्हां ह्या प्रश्नांचीं उत्तरें शतकातच दिलीं पाहिजेत. भाषेचें आयुर्मानही मोठें असल्यामुळें तिला जन्मण्यास व मरण्यास शतकें लागलीं तर त्यांत नवल कसचें ? शिवाय एक भाषा मृत होऊन नाहींशी होण्याच्या मार्गास लागली असतानाच उत्तर, भाषा अपभ्रंश म्हणून सुरू असते. त्यामुळें एका भाषेच्या काळांतच दुसऱ्या तज्जन्य भाषेचा काळ मिसळतो. अशीच स्थिति संस्कृतची झालेली आहे. प्राकृत भाषा जरी सर्वमान्य झाल्या होत्या तरी संस्कृत भाषेचा अवशेष ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकापर्यंत सांपडतोच. प्राकृतमध्यें ग्रंथ लिहिण्यास इ. स. च्या पहिल्या शतकापासून सुरुवात झाली. शातवाहन हाल राजानें लिहिलेलें शृंगाररसमय ७०० काव्यांची गाथा वगैरे जुनें प्राकृत वाङ्मय ज्या वेळेस लिहिलें त्या वेळेस प्राकृत भाषा बोलल्या जात असाव्यात. त्यांचा काळ ख्रिस्तपूर्व ५०० पासून ख्रिस्तोत्तर ३०० पर्यंत धरला तर वावगें होणार नाहीं. पुढें कांहीं दिवस शुङ्ग, काण्व, गुप्त, चालुक्य वगैरे सनातनधर्मराजाच्या प्रोत्साहनानें संस्कृत भाषेचें आणि संस्कृत वाङ्मयाचें पुनरुज्जीवन झालें; पण लोकांमध्यें प्राकृत म्हणा किंवा तदुद्भव अपभ्रंश म्हणा चालू झाल्या अपभ्रंश भाषा साधारणपणें इ. स. ४०० पासून १००० पर्यंत सुरू असाव्यात. व त्यांच्यानंतर सध्याच्या बोली सुरू झाल्या. अपभ्रंश भाषा सध्याच्या बोलींच्या जननी होत. बाकीच्या संस्कृत पाली-प्राकृत ह्या सर्व भाषांचा परात्पर मातृपणा असेल पण बंगाली हिंदी गुजराथी आवढी, मराठी

इत्यादि सर्व बोलींच्या प्रत्यक्ष जन्मदात्र्या अपभ्रंश भाषा ठरतात. राजवाडे ( ज्ञाने–प्रस्तावना ) यांनीं दिलेलें कोष्टकही भाषेचे काळ ठरविण्यास उपयोगीं आहे. उत्तर सीमा एकच आहे पण पूर्व सीमा मात्र त्यांनीं फार पलीकडे नेली आहे. तीही भाषांच्या प्रथम स्वरूपाची सीमा म्हणून मान्य होण्यासारखी आहे.

| | |
|---|---|
| संस्कृत | वैदिक ख्रि. पू. ३००० पूर्वी |
| | ब्राह्मण ख्रि. पू. ३००० पासून ख्रि. पू. १५०० पर्यंत |
| | लौकिक ख्रि. पू. १५०० पासून ख्रि. पू. २०० पर्यंत |
| प्राकृत | पाली ख्रि. पू. १५००—४०० ख्रि. पू. |
| | शौरसेनी ख्रि. पू. ५००—१५० ख्रि. उ. |
| | मागधी ख्रि. पू. ५००—१५० ख्रि. उ. |
| | पैशाची ख्रि. पू. ५००—१५० ख्रि. उ. |
| | महाराष्ट्री ख्रि. पू. १०००—१५० ख्रि. उ. |

शौरसेनी, मागधी, पैशाची, महाराष्ट्री ह्या चारी भाषांचे अपभ्रंश ० शकापासून—५०० शकोत्तर पर्यंत.

व्रज, मैथिली, बंगाली, आवटी, काश्मिरी, हिंदी, गुजराथी, मराठी इत्यादि बोली त्यानंतरच्या आहेत.

हा सर्व ठोकळ मानानें हिशेब झाला. ह्यापेक्षाही जरा बारकाईनें काळाच्या सीमा ठरविल्या पाहिजेत. निदान अपभ्रंशाचा अस्त आणि बोलींचा उदय ह्या दोन गोष्टी आपणास जास्त नक्की केल्या पाहिजेत. अपभ्रंशाच्या अस्तित्वाची साक्ष देणारे अगदीं शेवटचे ग्रंथ पाहिले पाहिजेत व त्याचबरोबर वर्तमानकालीन बोलींच्या उदयाचीं चिन्हें कोणत्या ग्रंथांत जास्तींत जास्त अगोदर सांपडतात, ते ग्रंथ पाहिले पाहिजेत. ह्या दोन तऱ्हाच्या पुराव्यानें अपभ्रंशाचा अस्त आणि बोलींचा उदय ह्यांचे काळ ठरतील. अपभ्रंशाबद्दलचे उल्लेख प्रथम देतों.

* त्यापैकीं पहिला राजशेखर नावाच्या कवीच्या काव्यमीमांसेंत.

* डॉ. गुणे वि. विस्तार. आक्टोबर, १९२२

सांगतो. काव्यपरीक्षेची सभा कशी असावी ह्याबद्दल त्यानें असें सांगितलें आहे कीं, पश्चिमेला अपभ्रंश कवि व त्याच्या पलीकडे चित्रें काढणारे, रंगविणारे, रत्नकारादि कसबी लोक बसवावेत ( पश्चिमेनापभ्रंशिन कवय । तत पर चित्रलेप्यकृतो माणिक्यबंधक वैकटिका' स्वर्णकार वर्धकि लोहकारा अन्येऽपि तथाविधाः ) राजशेखराच्या वेळीं अपभ्रंश भाषा उपयोगांत असल्या पाहिजेत व त्यामध्यें वाङ्मयही तयार होत असलें पाहिजे. राजशेखर नवव्या शतकाच्या शेवटीं होऊन गेला

रुद्रटाच्या " संस्कृत प्राकृत चान्यदपभ्रंश इति त्रिधा " ह्या श्लोकावर टीका करतांना टीकाकार नमिसाधु अपभ्रंशाचे निरनिराळे भेद दाखवून त्याच्या लक्षणाविषयीं म्हणतो—" तस्य च लक्षण लोकादेव सम्यगवसेयम् "—त्याचें लक्षण लोकांमधूनच नीट समजून घ्यावें. प्राकृताबद्दल बोलतांना त्याचें लक्षण—' प्रयत्नान्तरादवसेयम् '—इतर प्रयत्नावरून समजावें असें म्हणतो त्यावरून त्याच्या वेळेस अपभ्रंश भाषा प्रचलित असाव्यात. नमिसाधूचा काल अकरावें शतक आहे. अपभ्रंश भाषा ह्याच काळाच्या सुमारास जिवंत होता. ह्याबद्दल आणखी पुरावा दोन ठिकाणांहून मिळतो एक हेमचंद्राच्या प्राकृत व्याकरणावरून व दुसरा प्राकृत पिंगलावरून.

हेमचंद्राच्या व्याकरणांत अपभ्रंश प्रकरणांत अपभ्रंशाची दोन उदाहरणें दिलीं आहेत. त्यांत एकांत मुंजराजासंबंधीं उल्लेख आहे व दुसऱ्यांत मुंजाळाचा उल्लेख आहे पैकीं पहिला मुंजराजा दहाव्या शतकाच्या मध्यावर होऊन गेला, व मुंजाळ हा १०९४ मध्यें गुजराथच्या गादीवर असलेल्या सिद्धराज राजाचा प्रधान होता प्राकृत पिंगल नावाच्या प्राकृत छंद शास्त्रावरच्या ग्रंथांत ' कण्ण ' राजाचा उल्लेख आहे हा कण्ण अथवा कर्ण कलचुरी घराण्यांतला चेदिराजा ११ व्या शतकाच्या मध्याच्या

---

१ हिह डिउ जइ नीसरहि जाणउ मुंज सरोसु } हेमचंद्र
२ पडिविंब अमुंजालु जलु जहिं अडाहिउ पाउ }

३ कण्ण चलन्ते कुम्भ चलइ पुण्वि असरणा, गुरुविक्कम विक्कम जिणिअ जुज्झ ता कण्णपरक्कम कोइ बुज्झ. प्रा पिं

सुमारास होता. ह्या दोन पुराव्यावरून इसवी सनाच्या अकराव्या शतकात धुगधुगीत का होईना पण अपभ्रंश भाषा जिवंत होत्या.

आता दुसरी बाजू पाहू. बोलीच्या उदयाचें प्रमाण जुन्यात जुनें कोठपर्यंत मागें नेता येतं हे पाहू. बोलींतसुद्धा इतर बोलींशीं आपल्यास काहीं कर्तव्य नाहीं. आपणास आपल्या मराठीच्या उगमाकडे पहावयाचें आहे. तेव्हा त्याच भाषेतील जुने उल्लेख तपासू. मराठी भाषेतील अगदीं पहिल्या जुन्या ग्रंथाची तारीख जवळ जवळ नक्की माहिती आहे. ज्ञानेश्वरीच्या शेवटीं ज्ञानरायांनीं आपल्या ग्रंथाच्या समाप्तीचा काळ एका ओंवीत सांगितला आहे—

"शके बारासतें बारोत्तरें । तै टीका केली ज्ञानेश्वरें ॥
सच्चिदानंद बाबा आदरें । लेखकु जाहला ॥    ज्ञानेश्वरी १८१०

ज्ञानेश्वरीचा काळ शके १२१२ आहे. ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ केवळ अर्थाच्याच दृष्टीनें नव्हे तर भाषेच्याही दृष्टीनें सर्वोत्कृष्ट ग्रंथ मराठी भाषेंत लिहिणाऱ्या श्री ज्ञानोबांची भाषा किती प्रौढ असली पाहिजे. भाषेच्या प्रथम स्थितींत वेदांतासारख्या विचारप्रधान विषयावर ग्रंथरचना होत नाहीं. मनुष्याच्या उत्क्रांतीमध्येंसुद्धा मनाला किंवा बुद्धीला वेदांत विषयातील घडे गिरवण्यात प्रेम वाटणें ही अवरची पायरी आहे. प्रथम इंद्रियांना प्रत्यक्ष प्रतीत होणाऱ्या गोष्टींकडेच मन वळणार. त्यांच्या योगानेंच मनाला चमत्कार वाटणार त्याच्याबद्दलच मन विचार करणार व तेंच भाषेमध्यें उमटणार. वेदांतासारख्या गूढ व इंद्रियातीत विषयाच्या प्रतीतीकडे मनाचें आकर्षण करून घेण्याची पात्रता येण्यासाठीं बुद्धीचा विकास विलक्षण झाला पाहिजे मराठीमधील ज्ञानेश्वरी हा ग्रंथ जर पहिला मानावयाचा तर एकदम अशी प्रौढ अवस्था भाषेस अगदीं प्रथमच कशी प्राप्त झाली ह्याविषयींचें कोडं पडतें ज्ञानेश्वरीच्या पूर्वी वेदांतांशिवाय काहीं तरी इतर भावनाप्रधान वाङ्मय लिहिलें असलें पाहिजे. व त्यामध्येंच भाषेचें बालपण असलें पाहिजे. मराठीच्या बालपणाची अधुक का होईना पण काहीं तरी कल्पना देणारें वाङ्मय दुर्दैवानें आज उपलब्ध नाहीं. त्याच्या अभावीं ज्ञानेश्वरीच्या पूर्वीचा काळ म्हणजे

सर्व अंधकारमय आहे व त्या निबिड अंधकारांत कोठें कोठें कोपऱ्यात कांहीं तुटपुंजे शिलालेख, ताम्रपत्रें, उल्लेख, आपआपल्या परीनें प्रकाश पाडण्याची खटपट करतात. ह्या प्रकाशानें थोडीशी वाट काढणें शक्य आहे. ज्ञानेश्वरींतील भाषेच्या प्रौढ अवस्थेवरून ज्ञानेश्वरीच्या पूर्वी कांहीं तरी शतकें, दोन तीन कां होईना, पण मराठी भाषा बोलली जात असली पाहिजे. ज्ञानेश्वरींत सांपडणारी उपमेंतील विविधता व त्या ग्रंथाच्या एकदर सौंदर्याबद्दल जरी ग्रंथकर्त्यांच्या बुद्धिमत्तेस श्रेय दिलें तरी इतकी शब्दसंपत्ति, इतकें कल्पनाप्राचुर्य, वाटेल तसा आकार घेण्याची भाषेची क्षमता, मनांतील भावार्थ हरतऱ्हेनें विशद करण्याची हातोटी, वगैरे भाषेंतील वरवर दिसणारे, बुद्धीला पटणारे व हृदयाला उचंबळविणारे असे दोन्ही प्रकारचे गुण भाषेंत कांहीं ती जन्मतांच एकदम येत नाहींत. तेव्हा त्या ग्रंथाच्या पूर्वी भाषा बोलली जात असली पाहिजे; एवढेंच नव्हे तर त्या भाषेंत भावनाप्रधान वाल्वाङ्मय तयार झालें असलें पाहिजे; व तसल्या संस्कृतींत व परंपरेंतच ज्ञानदेवांच्या कर्त्यांच्या बुद्धीला वळण मिळून विकास झाला असावा. त्याशिवाय असला सर्व उत्तर वाङ्मयाची जननी शोभणारा, सर्व उत्तर कवींना प्रतिभा प्राप्त करून देणारा ग्रंथ ती ज्ञानदेवांची बुद्धि प्रसवणार कशी ? अशा विचारसरणीनें मराठीचा उत्पत्तिकाल ज्ञानदेवांच्या मागे दोन तीन शतकें नेण्यास कांहींच हरकत नाहीं. ह्याच कालाच्या अनुरोधानें कांहीं शिलालेख सांपडतात. सर्व शिलालेख त्रुटित आहेत. कोठें कांहीं शब्दच सांपडतात तर कोठें एकादी दुसरी ओळ सांपडते.

ज्ञानेश्वरीच्या पूर्वी सत्रा वर्षें म्हणजे शके ११९५ मध्यें कोरलेला पंढरपुरच्या श्रीविठ्ठलाच्या मंदिरामधील शिलालेख आहे. ह्यालाच लोक भाविकपणानें "चौऱ्यायशीची शिळा" म्हणतात. ह्या शिळेस पाठ लावली म्हणजे मनुष्य चौऱ्यायशी योनींतून मुक्त होतो अशी समजूत आहे. श्रीविठ्ठलाचें मंदिर बांधण्यासाठीं वर्गणी गोळा करण्यांत आली होती. त्यावेळेस ज्यांनीं ज्यांनीं मदत केली त्यांचीं नांवें ह्या शिळेवर कोरलीं आहेत. जरी नांवेंच पुष्कळशीं आहेत तरी त्यांतकीं कांहीं नांवें व शब्द मराठीच्या व्याकरणाच्या नियमांनीं जखडलेले सांपडतात. उदा-

इरणार्थ–" चालावेया, पैकाचा, रामचंद्रदेवरायें, देवरायासी, करनु, सेंठी, तेयाची, विठ्लाची आण " इत्यादि; व शेवटीं " स्वति श्री सकु ११९५ श्रीमुख सवत्सरे फागतिपुर श्रीविठ्ठलदेवरायासिं तिसासिति फुलें दांडें आचंद्रार्क चालावे आनाना भक्ति मालिआ दत्त पैकाचा विवरु " ही ओळ सांपडते. माळ्यानें रोज देवास फुलांची व्यवस्था करावी ह्यासंबंधीं आहे. ह्यामध्यें भाषा जुनी मराठी आहे ह्याबद्दल शंकाच नको.

ह्याच्या पूर्वीचा लेख खानदेशांत चाळीसगांवापासून दहा मैलांवर असलेल्या पाटण येथील श्रीभवानीच्या मंदिरात आहे. हा लेख ज्ञानेश्वरीच्या पूर्वी ८४ वर्षांचा आहे. मागच्या लेखापेक्षा हा लेख ज्यास्त स्पष्ट आहे. त्यामध्यें बराचसा भाग नावाच्या यादीनें व्यापला आहे. हा लेख लीलावतीचे कर्ते प्रसिद्ध गणिती भास्कराचार्य यांच्या चांगदेव नावाच्या नातवानें लिहिला आहे. देवगिरीच्या सिंघण यादवाचे मांडलिक म्हणून असलेल्या निकुंभ नांवाच्या राजकुलाच्या आश्रयानें ज्योतिषशास्त्राचें अध्ययन, अध्यापन करण्यासाठीं मठाच्या स्थापनेसंबंधीं हा लेख आहे; व मठाला कोणकोणत्या गोष्टी द्यावयाच्या त्यासंबंधीं ह्यात वर्णन आहे. लेखाच्या शेवटच्या चार ओळी मराठीचें पूर्वस्वरूप प्रगट करतात. त्या खालीं देतोः—

१ इया पाटणीं जें केणें उघटे तेह्याचा असि आऊं जो राऊला होता ग्राहकापासी तो मठा दिन्हला । ब्राह्मणा जें विक(ते) यापासी ब्रह्मोत्तर ते ब्राह्मणी दिन्हले ॥ ग्राहृ—

२ का पासी दामाचा विसोवा आसु पाठी नग(रे) दिन्हला । तलहा इया बैला सिद्ध (वें) बाहिरिली आसु पाठीं गिधयें ग्राहकापासी । पांच पोफली ग्राहकापासी ॥ पिह—

३ ले आघाणे आदाणाची लोटी मठा दिन्हली । जे तो घाणे वाहती ते तीया प्रति पलि पलितेला । एय(जें) मविजे तें मढीजेन मापे मवावें मापाउ मढा अद । अर्द—

४ मापहारी । (रु)पाचे सुक । तयाभूमिः ॥ पवरा पाटविह्रक [ ओड् ] आम अ–बोले–कामतामध्यें च–य–(टा) ॥ एकल (टा) ॥ पंडितांचा कामतु । [चि] ते आम—

मीच [उ]रा ॥ धामी [सी]चो (अ)सोटि (आ)

ह्यामध्यें " इया, पाटणी, केलें, देहाचा, आमणा, दिव्हरा, सेलिया, मविजे, मवाये " इत्यादि मराठी व्याकरणानें मान्य केलेलीं रूपें सांपडतात.

ह्याच्या मागचा परळ येथील सरकारी बंगला बांधीत असतांना सांपडलेला शिलालेख. -हा शके ११०९ मध्यें कोरलेला आहे. म्हणजे ज्ञानेश्वरीच्या पूर्वीचा १०३ वर्षांचा ठरतो. ह्यांतील शेवटच्या दोनच ओळी मराठींत आहेत. त्यांत असा मजकूर आहे. " वो कोणी हुविए शासन लोपी तेच्या येथ नामाची माल सकुटुंबी आपटे " ह्यामध्यें कोणी, हुविए ( हे ), लोपी, तेच्या, आपटे इत्यादि शब्द मराठी विकृतीचे आहेत.

ह्याच्या पूर्वीचा पुरावा शक १०५१ मधील मिळतो. कल्याणीच्या चालुक्य घराण्यातील सोमेश्वर नांवाच्या राजानें लिहिलला " मानसोल्लास किंवा अभिलषितार्थचिन्तामणी " नांवाचा एक संस्कृत ग्रंथ आहे. सोमेश्वराची राजवट शके १०४९–१०६१ पर्यंत होती. त्या ग्रंथांतील दोन ओळी मराठीची साक्ष पटवितात. त्या ओळी अशा:—

जेणें रसातळ उणु मत्स्यरूपें वेद आणियले मनु शिव वखाणियले ।
तो संसारसागर तारण मोह तो रावो नारायणुं
यो गोवी ( गोपी ) जेणें गाईजे मटुपरि रूपें निर्हांगो मयसेकः देशनेल
मुल्घुराजन मास वकसे.

ह्याच्या पूर्वीचा श्रावणबेळगोळा येथील जैन मूर्तीच्या पायथ्याशीं कोरलेला लेख आहे ह्यामध्यें दोनच ओळी मराठींत आहेत " श्री चावुण्डु राजे करवियलें " ही एक व दुसरी " श्री गंगराजे सुत्ताले करवियलें " ही ओळ. ह्यांतील चावुंडराज किंवा चामुण्डराज हा गंग-राज घराण्यातील एका राजाचा प्रधान होता असें राजवाड्यांचें मत आहे; व त्याचा काळ त्यांनीं शक ९०५ पर्यंत मागें नेला आहे. गंग घराणें दोन ठिकाणीं नांदलें. एका शाखेनें कलिंगांत मुखलिंग शहरीं राज्य केलें व दुसरीनें म्हैसूर येथें राहून पश्चिमेकडच्या प्रदेशावर राज्य केलें. ह्या शाखेला पश्चिमेकडील गंग म्हणत व कालाच्या दृष्टीनें कलिंगातील

गंगांच्या नंतरचे हे ठरतात. दहाव्या शतकाच्या शेवटीं चोल घराण्यांतील 'राजराज' राजानें सर्व दक्षिणेकडील राजांचा बिमोड करून आपल्या प्रांतांत सर्व मुलुख सामील करून घेतला. हा त्या लेखाचा व त्यांत उल्लेखिलेल्या चावुण्डराजाचा इतिहास आहे.

ह्याच्याही पूर्वीचा लेख एका ताम्रपत्रावरचा आहे. ह्याच्यावर वेळ लिहिलेली नाहीं. विजयादित्य नांवाच्या राजाचा उल्लेख आहे. तिथि वैशाख वद्य अष्टमी आहे व ती मंगळवारीं पडलेली आहे. पंचांगांतील गणिताच्या साहाय्यानें वैशाख वद्य अष्टमी मंगळवारीं शक ६५८ मध्यें पडते असें राजवाड्यांनीं ठरविलें आहे. व विजयादित्य चालुक्याची राजवट फ्लीट व भाण्डारकर यांच्या मतें सन ६५५ मध्यें संपली आहे. नांवाची मानगड पूर्वीच्या राजांच्या बाबतींत होत असल्यामुळें व कांहीं कांहीं बिरुदें एकाच अर्थाचीं असल्यामुळें थोडीशीं वर्षें मागें पुढें करून हा लेख मराठींतील अगदीं जुन्यातला जुना मानण्यास कांहीं हरकत नाहीं. ह्यामध्यें खालील ओळ भाषेच्या मराठीपणाची साक्ष पटवीत आहेः— "राज्य करित दक्षिणावरे दिगुविजय यात्री विक्रयं करवून करहाट व कमलेश्वर देवासनिधी कटक मेलिकार करयुतन सर्पयाग करित धरवून पढिस." हा लेख चिकुर्डे येथील ताम्रपत्रावरचा लेख म्हणून प्रसिद्ध आहे.

ह्याच्याही पूर्वीचा मराठीच्या अस्तित्वाचा दाखला आजपर्यंत मंगळवेढ्याच्या लेखांत विद्वान लोक मानीत असत. त्यावर शक ४१० दिला आहे. पण ह्याबद्दलची गैरसमजूत दूर झाली आहे. ह्यांतील शक ४१० हा शालिवाहन शक नसून शिलाहार शक आहे. शिलाहार शकाचा आरंभ शालिवाहन शकाच्या ७१५ व्या वर्षी झाला. तेव्हां साहजिक वरचा शिलाहार ४१० मधील लेख ११२५ शालिवाहन शकांतील ठरतो. मराठीच्या उत्पत्तीचीं पूर्वचिन्हें शक ६५८ मध्यें दिसतात असें चिकुर्डे येथील ताम्रपटाच्या आधारानें म्हणता येण्यासारखें आहे.

मराठींतील जुन्यांत जुनें वाङ्मय म्हणजे ज्ञानेश्वरी, विष्णुशर्म्याच्या हितोपदेशाचें मराठी भाषांतर आणि तिसरें श्रीपतिकृत मराठी ज्योतिषरत्नमाला हें होय. पैकीं ज्ञानेश्वरीचा काळ निश्चित आहे. हितोपदेशाचें भाषांतराच्या भाषेवरून तें ज्ञानेश्वरीच्या पुष्कळ

पुढचें असावेंसें वाटतें. ज्ञानेश्वरींत " लिये," हेयाचा, प्यावेयासी, जेवावेयासी, इयामाजी, पुढेल, कार्इ, मिया, कवणु, स्वामियें, होआवा, कुमारिया, आंजुळिया, पाणियाआतु, मज लागोनी इ.इ. शब्द भाषेच्या जुनेपणाची साक्ष देतात. तेच शब्द हितोपदेशाच्या भाषांतरांत निराळ्या स्वरूपांत सांपडतात. उदाहरणार्थ तये, त्याचा, प्यावयासी, जेवावयाची, यामध्यें, पुढेलि, काये, म्या, कोणु, स्वामिने, होवा, कुमारीनें, आंजुळीत, पाणियांतु मला इ. इ. ह्या सर्व शब्दांत ज्ञानेश्वरीच्या शब्दांचा प्राचीनपणा खास दिसत नाहीं

ज्योतिषरत्नमालेचा कर्ता शके ९६१ मध्यें झाला असें दीक्षित म्हणतात. त्यानें आपल्या संस्कृत ग्रंथाचें भाषांतर केलें. पण भाषा ९६१ मधील दिसत नाहीं. भाषा बरीच नरमावल्यामुळें ३–४ शतकं पुढची असावीशी वाटते. व त्याला प्रमाण भाषांतराच्या शेवटच्या 'ओवींपुढें शक १३६९ पासून १३७३ पर्यंतचे आकडे लिहिले आहेत. भाषांतर करण्यास इतकीं वर्षे लागलीं असावींत भाषेचा नरमपणा व शेवटचा लिहिलेला शक ह्या दोन्ही गोष्टींबद्दल नक्कलकाराला जबाबदार धरता येण्यासारखें आहे. कारण नक्कलकारानें किंवा शुद्ध करणारानें जुन्या ग्रंथाची जुनी भाषा नरमावल्याचीं उदाहरणें वाङ्मयाच्या इतिहासांत सांपडतात. ज्ञानेश्वरींतील ज्ञानोबारायांच्या काळाच्या भाषेचें दुर्बोध वाटणारें वळण काढून आपल्या वेळच्या भाषेचा ठसा एकनाथस्वामींनीं ज्ञानेश्वरीवर उठविल्याचा ऐतिहासिक पुरावा आहे. तेव्हा ह्या श्रीपतीच्या ज्योतिषरत्नमालेच्या अर्वाचीन वळणाबद्दल आश्चर्य वाटावयास नको

ह्या सर्व विवेचनावरून मराठीच्या उत्पत्तीचा काळ नक्की ठरविता येण्यासारखा आहे शकोत्तर १० व्या शतकाच्या वेळीं मराठीस मराठीपणा आला होता असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं कोरीव लेखांपैकीं ६५८ मधील चालुक्य ताम्रपत्राचा पुरावा व वाङ्मयापैकीं श्रीपतीची रत्नमाला, हीं दोन्हीं जरी शकामय सोडून दिलीं तरी ११०९ शकांतील परळचा लेख स्पष्टच आहे. व वाङ्मयांतील ज्ञानेश्वरीचें वर्ष नक्की माहिती आहे. तेव्हा साधारणपणें शकोत्तर १००० किंवा खिस्तोत्तर १००० हा भाषेच्या उगमाचा काळ मानण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. ह्यालाच हिंदी, गुज-

राथी, बंगाली, व्रज, इत्यादि उत्तर हिंदुस्थानांतील बोलींकडूनही पुरावा मिळतो. कारण त्या भाषांत वाङ्मय त्याच सुमारास सुरू झालें आहे. एकीकडे वर्तमानकालीन बोली जन्मास येत होत्या व दुसरीकडे त्यांच्या जन्मदात्र्या अपभ्रंश भाषा अस्तप्राय होत होत्या. अपभ्रंश ह्या कांहीं निराळ्या भाषा नव्हत्या. प्राकृत आणि वर्तमानकालीन बोली ह्या दोहोंमधील संधिकाळाची भाषा अपभ्रंश. देशावरुन भाषेस नांव पडतें तसा कांहीं प्रकार अपभ्रंशांत दिसत नाहीं. 'अपभ्रंश' हें कोणत्याही देशाचें नांव नव्हतें. अपभ्रंश म्हणजे मूळ उच्चारापासून खालीं येणें—मूळ उच्चार नरमावणें. तेव्हां ज्या कांहीं चार पांच प्राकृत होत्या त्यापैकीं प्रत्येकीच्या संधिकाळांत अपभ्रंश म्हणून एक प्रकार झाला. व त्या स्वरूपांत सुद्धां 'भविसत्तकहा सनत्कुमारचरित,' 'तिहिमहा-पुरिसगुणालंकार' इत्यादि वाङ्मय तयार झालें. संस्कृत, प्राकृत, अप-भ्रंश, हीं सर्व भाषांचीं नांवें देशावरून पडलींच नाहीत. हें असें भाषांचें स्थितिदर्शक नामाभिधान कोणी तरी पंडिताने केलें असावें.

संस्कृतपासून प्राकृत, प्राकृतपासून अपभ्रंश व अपभ्रंशापासून वर्तमान-कालीन बोली कशा उत्पन्न झाल्या हे पाहिलें. त्यांच्या उत्पत्तीबरोबर त्यांचा अदमासें काळही खालीं देतो:—

| भाषा | काळ |
|---|---|
| वैदिक संस्कृत | ३००० खि. पू. |
| पाणिनीय संस्कृत | ८०० खि. पू. |
| लौकिक संस्कृत | ४०० खि. पू.<br>२०० खि. उ. |
| पाली<br>ग्रांथिक पाली | ७०० खि. पू. |
| शिलालेखी प्राकृत | ३०० खि. पू. |
| प्राकृत | १०० इ. स. |
| अपभ्रंश | ५०० इ. स. |
| वर्तमानकालीन बोली | १००० इ. स. पासून |

मराठीच्या उत्पत्तीबद्दल जीं कांहीं मतें प्रचलित आहेत त्यांना वरील विवेचनांत उत्तर आहे. पण त्याच्याहीपेक्षा योग्यतर उत्तर पुढच्या प्रकरणांत व्याकरणावरचीं येणाऱ्या विवेचनावरून मिळेल. कोणी पालीपासून मराठीचा उगम मानतात. कोणी महाराष्ट्रीपासून मानतात. कोणी मागधी, अर्धमागधीपासून मानतात. इतकें मतवैचित्र्य सांपडण्याचें कारण प्राकृत समजल्या गेलेल्या भाषांमधील सारखेपणा हें होय. पालीपासून किंवा मागधीपासून उत्पत्ति मानावयाची म्हणजे ख्रिस्तपूर्व ६०० पासून ख्रिस्तोत्तर १००० पर्यंत म्हणजे दीड हजार वर्षांत भाषेत कांहीं फरकच झाले नाहींत असें मानण्याची आपत्ति येईल. अशी स्थिति असणें हें भाषाशास्त्राच्या नियमाच्या विरुद्ध आहे. मधले दुवे सांपडलेच पाहिजेत महाराष्ट्री आणि मराठी ह्या दोन्ही शब्दामध्यें केवळ नामसादृश्य दिसतें म्हणून महाराष्ट्रीपासून मराठीची उत्पत्ति मानावयाची नाहीं. भाषाभाषांचीं नातीं ठरवितांना नुसत्या शब्दसाम्यावर विसंबून चालावयाचें नाहीं. त्याला व्याकरणसाम्याची जोड द्यावी लागते. ही जोड अपभ्रंश भाषेशीं जितकी जुळते तितकी दुसऱ्या कोणत्याही भाषेशीं जुळत नाहीं

एकाच ( संस्कृत ) भाषेचीं स्थित्यंतरें कोणत्या वेळी झालीं हें मागच्या रकान्यांत दिलेल्या कोष्टकावरून समजून येईलच. प्रत्येक स्थित्यंतराच्या वेळीं जरूर कारण घडून आलीं. एका भाषेपासून दुसरी पोटभाषा निघण्यास भाषाशास्त्राच्या नियमानें पुष्कळ कारणें आहेत. दुसरीं सामाजिक कारणेंहि पण असतात समाजातील उत्पातांचें सर्व चित्र भाषेंत उमटतें समाजात खळबळ किंवा संस्कृतिसंस्कृतींची भेसळ, धर्मक्रांति किंवा राज्यक्रांति ह्या दोन्हींमुळें होत असते ह्यामुळें भाषेचें शुद्ध नागर स्वरूप नाहींसें होऊन अपभ्रष्ट होतें. व पुढें कांहीं दिवसांनीं दुसरी भाषा सुरू होते वैदिक आर्यांची भाषा शुद्ध तजस्वी होती. पण अनार्यांपैकीं नागलिच्छिवि वगैरे जातींशीं संबंध आल्यामुळें पाली किंवा प्राली भाषा उत्पन्न झाली. त्याच वेळेस उत्तर हिंदुस्थानांत परकी धर्मांचा व मताचा धूमधडाका सुरू होता. महावीर, बुद्ध ह्या स्वकीयांनीं धारखे हल्ले चालविले होते व त्यावरोवर कांहीं परकीयांनींही—अलेक्झांडर वगैरेंनीं—हल्ले चालविले, अशी कांहीं दिवस स्थिति होती पुढें शैशुनाग—नंद—मौर्य—

शुग–काण्व–गुप्त अशा एकामागून एक राजवटी आल्या. त्यांपैकीं काहींनीं मौर्य–कुशान वगैरे राजांनीं बौद्ध धर्माची तळी उचलून धरली शुग–काण्व गुप्त वगैरे राजांनीं अश्वमेध यज्ञ करून जुन्या कर्मकाण्डाचा पुनरुद्धार केला, व त्याचबरोबर संस्कृत भाषेतही पुन जोर आणून सोडला. पुन हर्षवर्धन राजाच्या वेळेस सनातनी धर्माची बाजू सावरण्यास जरी शशांका सारखे राजे होते तरी बौद्ध धर्म पुन डोके वर काढू लागला होता, व त्याबरोबर प्राकृत भाषाचीही भरभराट होऊं लागली दक्षिणेंत मात्र आंध्र, चालुक्य, शक, वर्लभ, क्षत्रप शिलाहार, राष्ट्रकूट राजांनीं सनातन धर्माचा पुरस्कार केला. मराठी इत्यादि वर्तमानकालीन बोलींमध्यें संस्कृत शब्दांचें जें प्राचुर्य सांपडतें त्याचें कारण उपरिनिर्दिष्ट राजांच्या दरबारीं संस्कृतला मिळालेला मानच होय. प्राकृतपासून निघालेल्या अपभ्रंशा पासून सध्याच्या बोली निघण्याच्या वेळीं अशीच दोहींकडून क्रांति ओकावत होती पूर्वी हिंदुस्थानावर परकी धर्माच्या व संस्कृतीच्या स्वाऱ्या झाल्या हें खरें, पण त्यांतल काहीं लोक आपल्या देशांतीलच होते बाहेरून जे आले त्यांच्या डोक्यांत इतकें धर्मवेड शिरलें नव्हतें. पण ६ व्या शतकाच्या नतर ज्या क्रांत्या होऊं लागल्या त्या पूर्वीच्या सर्वां हून भिन्न व जबर अशा होत्या. एक क्रांति मुसलमानांनीं केलेल्या स्वाऱ्यांनीं झाली व दुसरी क्रांति कुमारीलभट्ट व शकराचार्य यांनी विहारांत व दर बारांत दबून राहिलेल्या बुद्धधर्माच्या केलेल्या नायनाटानें झाली. ह्या दोन गोष्टींनीं समाजांत मोठीच खळबळ उडवून दिली विचारक्रांति इतकी झाली कीं, तिचा परिणाम अपभ्रंशापासून वर्तमानकालीन बोली उत्पन्न होण्यांत दिसून आला. दक्षिणेंत मुसलमानाची चावटळ काळाच्या दृष्टीनें फार पुढें आली हें खरें. अल्लाउद्दिन खिलजी ह्यानें व त्याच्या मलिक काफूर नावाच्या बाटग्या सेनापतीनें यवनी संस्कृतीच्या निशाणाचें टोक इकडच्या लोकांस प्रथम दाखविलें हें खरें, पण वर उत्तरहिंदुस्थानांत ज्या काहीं गोष्टी घडून येत असत त्यांचा सुगावा फार लौकरच लागत असे " तुर्की मूर्ति फोडल्या " अशा प्रकारची तक्रार ज्ञानदेवसमकालीन नामदेव आपल्या अभं गात करतो आहे. ही तक्रार महमुदानें सोमनाथाची मूर्ति फोडली

तिजबद्दलची असावी. मलीक काफूरनें रामेश्वरी मशीद फार पुढें जरी बांधली असली तरी ९ व्या शतकापासून जें वावटळ उठलें होतें त्याच्यांतील यवनांचे छापे व धूलिनिपात ह्यांनीं दक्षिणेंतील लोकांना नवीन भाषा केली असावी ह्याबद्दल शंका नाहीं.

दुसरी विचार क्रांति आपल्याच लोकांनीं घडवून आणली. बौद्ध धर्माला गुप्त राजांनीं जरी दुर्लक्ष केला होता तरी तो कधीं कधीं आपलें डोकें वर काढीत असे. सातव्या शतकापर्यंत त्याचे पुरस्कर्ते राजेलोकांतसुद्धां आपल्याला असत मग सामान्य लोकांत किती तरी असले पाहिजेत. शिवाय नालंदा-सारख्या विश्वविद्यालयांत राहून हिंदुधर्माविरुद्ध ग्रंथ रचनेचें काम बुद्ध भिक्षू करीतच होते. तेव्हां कुमारिलभट्ट, शंकराचार्य ह्यांनीं बौद्ध धर्मांतील सनातनी धर्मास धमन अशीं मतें लोकांचीं मनें वळविण्याकरता प्रतिपादिलीं ह्याबद्दल शंकराचार्यांवर 'प्रच्छन्नबुद्ध' असा आरोपही आला. ह्या दोन्ही क्रांतींच्या सुमारासच अपभ्रंशापासून सध्याच्या बोली तयार झाल्या. अशा तऱ्हेनें मराठी एकदा उत्पन्न झाली. उत्पन्न झाली त्यावेळेस ओघ अगदीं लहान करांगुलीएवढा होता गंगेच्या पुढच्या अवाढव्य स्वरूपाची कल्पना विष्णुपदाजवळ किंवा गंगोत्रीजवळ कशी येणार ! येवढेंच नव्हे, प्रत्यक्ष उगमाजवळ पाण्याचा मागमूसही नसतो. गोदेचें स्वरूप मोठें फार पुढें झालें. पण गौतम ऋषींनीं ज्या ठिकाणीं आपल्या जटा आपटल्या तेथें काय आहे ! भाविकपणानें तेथें उगम आहे असें मानावयाचें मात्र तसेंच भाषारूपी सरितूची गोष्ट आहे. भाषा विराट स्वरूप कालांतरानें मिळविते, अगदीं प्रथम तिचा प्रवाह मंद झुळ झुळ असतां वाटेंत जशा जशा दुसऱ्या बहिणी, उपनद्या आपापला करभार घेऊन येतात व तिच्यामध्यें विलीन होतात तसतसा नदीचा दरबार मोठा होतो भाषेसही पोसण्याचें काम इतर भाषा व तिच्या पोटभाषा करीत असतात मूळची ची लहान मराठी भाषारूपी सरित् तिनें एवढें विराट स्वरूप कसें धारण केलें ह्याचा उलगडा तिच्या उत्पत्ति काळापासून म्हणजे इ स. १००० पासून सध्या १९२४ पर्यंतच्या वर्षांपर्यंत तिच्यावर इतर दुसऱ्या भाषांनीं केलेल्या परिणामाच्या विवेचनावरून होण्यासारखा आहे. तेंच विवेचन पुढील प्रकरणांत करूं.

## प्रकरण १२ वें.

—:०:—

### मराठी भाषेवर इतर भाषांनीं केलेले परिणाम.

(१) संस्कृत--मराठी भाषा संस्कृत-प्राकृत-अपभ्रंशद्वारा उत्पन्न झाली. बोली म्हणून तिला लोक वापरू लागले. तिच्या अंगीं स्वतंत्र भाषेचें अस्तित्व आलें, मराठीपणा तिच्या अंगीं पूर्ण आला. वाढ झाल्या नंतर पुन: कांहीं कालानें संस्कृतनें तिच्यावर पगडा बसविला. आईचें किंवा आजीचें नातें अगोदरचें होतेंच, पण पुढें स्वतंत्र झाल्यानंतरसुद्धा आपला ताबा भालविण्यास संस्कृतनें कमी केलें नाहीं. प्राकृत भाषात तत्सम, तद्भव व देश्य असे तीन प्रकारचे शब्द असत. पण त्यातल्यात्यात तद्भव ( संस्कृत शब्दापासून झालेले ) व देशी शब्दांचाच भरणा बहुतेक असे. तत्सम ( संस्कृत शब्द ) अगदीं थोडे किंवा नव्हतेच असें म्हटलें असता चालण्यासारखें आहे. प्राकृत भाषांनीं बोली म्हणून फार मोठी कामगिरी बजावली हें खरें पण हिंदुधर्माच्या दृष्टीनें प्राकृत भाषांनीं हिंदु धर्माची फार चेष्टा केली म्हणून त्या सर्वांवर व विशेषत. पाली, मागधी, अर्धमागधीवर सर्व संस्कृत व हिंदुधर्माभिमान्यांचा रोष होता. बुद्ध व महावीर ह्यांनीं आपलीं धर्ममतें प्राकृतद्वारा प्रतिपादिलीं व हिंदूच्या सनातनीय धर्माच्या किंवा यज्ञयागादिकाच्या धर्मावर हल्ला चढविला. हिंदुधर्मास ओहटी व तदनुषंगें संस्कृतबद्दल तिट्कारा प्राकृतमध्यें झालेल्या वादविवादांनीं उत्पन्न केला. संस्कृत पडली पंडिताची-थोडक्याची-भाषा. प्राकृत पडल्या बहुजनसमाजाच्या भाषा. तेव्हा अर्थातच हिंदुधर्माची कुचेष्टा जास्त फैलावत गेली. त्यातच यज्ञयागातील हत्या व इतर मांत्रिक थोतांड ह्याची भर पडली. सनातन धर्माविरुद्ध उसळलेली ही लाट त्याना मोठ्या प्रयासानें थांबवावी लागली. संस्कृत भाषेचें पुनरुज्जीवन करणें हा त्यापैकीं एक मार्ग होता. जुन्या संस्कृत ग्रंथांचीं नवीन संस्करणें करून सर्व मताचा समन्वय करण्याचा प्रयत्न

झाला. सनातन धर्मांच्या मतांत झालेल्या वखेडा काढून टाकून त्यामध्यें एकसूत्रता आणून सोडली. बौद्ध किंवा जैन मतांचा फैलाव ज्याप्रमाणें राजाश्रयानें झाला त्याचप्रमाणें हिंदुधर्माचें पुनरुज्जीवनही सनातन धर्माभिमानी राजांच्या आश्रयानें झालें. नष्ट झालेलें सर्व परत आणण्याचे प्रयत्न शुंग, काण्व, गुप्त राजांच्या अमदानींत करण्यांत आले. त्याच वेळेस प्राकृत भाषांत संस्कृत शब्दांचा, वाक्प्रचारांचा इतका बेसुमार भरणा झाला कीं, त्याचा परिणाम त्याच्यापासून निघालेल्या वर्तमान-कालीन बोलींवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. गुप्त–राज्य ज्यांनी ज्या भागावर अमल गाजविला त्या भागांतील सध्यांच्या बोली जर पाहिल्या तर त्यामध्यें–हिंदी, बंगालीमध्यें जवळ जवळ ४/५ किंवा ९/१० शब्द अस्सल संस्कृत सांपडतात असें आढळून येईल. मराठींतही त्याचा भरणा कांहीं कमी नाहीं. प्राकृत भाषा असूनसुद्धां संस्कृतमध्यें लिखाण करण्याची जी एक सवय पंडितांना लागली होती ती सवय पोटी उत्पन्न झाल्यावरही चालू राहिली. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानदेवी बोलींत लिहिली तर त्याच्या वडील बंधूनीं आपला वेदांतज्ञानाचा ठेवा संस्कृतच्या कुलुपांत ठेवून दिला. नद्यांच्या दोन्ही काठांवर दोन्ही भाषांत वाङ्मय सारखें तयार होत होतें. अशा वेळेस संस्कृतचा मराठीवर परिणाम झाल्याखेरीज कसा राहणार ! पंडित लोकांत मराठी भाषेचा तिटकारा असे व त्यांच्याविरुद्ध ज्ञानेश्वर एकनाथ ह्यासारख्या अधिकारी लेखकांना तशा पंडितांचा " संस्कृत काय देवापासून आली " व " देशी लेंण काय चोराचे " अशा रोकठोक शब्दांनीं समाचार घ्यावा लागला. भाषाभिमानाबद्दल एकनाथस्वामी व त्यांचा मुलगा पंडित हरि ह्या दोघामध्यें उभा दावा होता. एक मराठीचा कैवारी तर दुसरा संस्कृतचा अभिमानी. मुलानें तर संस्कृतच्या अभिमानानें व बाप मराठींत कवन करतो म्हणून पैठणच्या पंडिताच्या सांगीवरून आपल्या प्रत्यक्ष बापाचा " बापपणा " पार झुगारून दिला होता. इतक्या विकोपास भाषाचा अभिमान पोहोंचला होता. पंडितांत असे एकांडे शिलेदार होते म्हणूनच संस्कृतनें मराठीवर केलेला परिणाम दृग्गोचर होतो. पुढें राजे शिवाजी यांच्या अमदानींत मराठीनें संस्कृतपासून पुन: मदत घेतली. मुसलमानी रियासतीचा अमल जिकडे तिकडे

सुरू होता. जेथें पहावें तेथें फारशी किंवा आरबी किंवा तुर्की शब्द, घरादारात, दरबारात, देवघरातसुद्धा यावनी शब्द. दरबारात तर त्याची रेल्चेल झालेली. जेवढें मुसलमानी आढळें तेवढें सर्व महाराजाच्या कपाळाची तिडिक उठवी व त्यातल्या त्यात हरहमेशा तोंडात येणाऱ्या ह्या फारशी शब्दांनीं तर फारच किळस आणली. त्यामुळेंच फारशी शब्दाचें राजदरबारातून उचाटण करण्याचें महाराजांनीं मनावर घेतलें, आणि त्याप्रमाणें राजव्यवहार कोश तयार करण्यास त्यांनीं हुकूम सोडला. ह्या कोशात सर्व मदत संस्कृतपासून घ्यावी लागली. पेशव्यांच्या कारकीर्दीत हीच प्रवृत्ति जास्त जोरात चालली. जिकडे तिकडे ब्राह्मणांचेंच प्रस्थ माजल्यामुळें रोजच्या व्यवहारातसुद्धा अगदीं 'देशी लेणें' घातलेले शब्द योजणें कमीपणाचें व ग्राम्य ठरून त्याऐवजीं तत्सम शब्द वापरण्यास येऊं लागले. अस्सल देशी शब्दाचा तिटकारा व त्याऐवजीं संस्कृत शब्दाचा उपयोग ह्या दोन गोष्टी विपळूणकराच्या मराठींत व सध्याच्या मराठींतही दिसून येतात. भाषेस प्रौढत्व आणणें हाच केवळ त्यात उद्देश असतो. जुन्या बखरींत किंवा जुन्या ऐतिहासिक लिखाणात संस्कृत शब्द फारसे आढळत नाहींत. मराठीच्या सध्याच्या स्वरूपात संस्कृत शब्दाची इतकी रेल्चेल झाली आहे कीं, मराठी आणि संस्कृत ह्या दोन्हींमध्यें प्राकृत किंवा अपभ्रंश ह्याशिवाय अन्यजनक संबंध मान ण्याकडे प्रवृत्ति होते वर्णप्रक्रियेच्या नियमानें झालेले फरक जर बाजूला काढले तर आपण शुद्ध पाणिनीय संस्कृतच सध्या बोलत आहोंत असें म्हटलें तर अगदींसुद्धा अशास्त्रीय ठरणार नाहीं मधील प्राकृत वगैरे पायऱ्या केवळ वर्णअपभ्रंश आहेत इतकेंच

वर सांगितलेल्या राजवटीच्या आश्रयानें संस्कृतनें आपलें वर्चस्व बोलींवर गाजविलें हें खरें पण त्याशिवाय इतरही पुष्कळ कारणें झालीं. संस्कृतशब्दाच्या लोंढ्याखालीं 'बोली,' बहुतेक बुडूनही गेल्या ह्याला दुसरीं जबर कारणें झालीं. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, दासोपंत, तुकाराम, रामदास, श्रीधर वगैरे कवींनीं मराठींत सारस्वत लिहून भाषेची चांगली जोपासना केली. पण ज्या विषयावर त्यांनीं वाङ्मय रचलें, तो विषयच असा होता कीं, त्यामध्यें मुख्य मुख्य पुष्कळसे शब्द थेट संस्कृतमधून घेतल्या

शिवाय गत्यंतर नव्हतें. विषय वेदांत प्रतिपादन किंवा ईश्वरभक्तिनिरूपण हा असावयाचा संस्कृत भाषेंत असल्या विषयाचें विवेचन थोरांच्या जन्मापूर्वी शेंकडों हजारों वर्षांपूर्वी चालविलें होतें. त्यामुळें त्यासबंधीं शब्द, कल्पना, उपमादि अलंकार, पारिभाषिक शब्द इत्यादि सर्वमान्य व सर्वतोमुखीं होऊन बसले होते. नामदेव, एकनाथ, श्रीधरादि कवींच्या मराठी वाङ्मयांत मराठीकरण तर आहेच; पण कांहीं शब्द जसेच्या तसे संस्कृतमधून घेतले आहेत. मुख्य गोष्ट म्हणजे मराठीच्या भक्तांना संस्कृतबद्दल कधींच परकेपणा वाटला नाहीं. संस्कृतनें जे हल्ले केले ते सर्व प्रेमानें केले, व ते परतविण्याचें पातक कोणी केलें नाहीं संस्कृत ही एक देवाची, वेदांची व धर्मवाङ्मयाची भाषा म्हणून तिच्याबद्दल आदर, व मातृभाषा म्हणून तिजबद्दल वाटणारें प्रेम ह्या दोन गोष्टी त्यांच्या मुळाशीं होत्या.

संस्कृतबरोबर मराठीच्या इतर बहिणींनीही मराठीला शब्दरूपी भेट देऊन आपलें नातें जाणविलें आहे भाषा एकमेकींजवळ असल्यावर एकमेकींचा संपर्क म्हणा अगर उपसर्ग म्हणा, पोंहचल्याशिवाय कसा राहणार ! त्याप्रमाणें बंगाली सिंधिसारख्या दूरदूरच्या बहिणी जरी सोडून दिल्या तरी जवळच्या गुजराथी, व्रज, हिंदी वगैरे आर्योद्भव भाषांनीं व कानडीसारख्या अनार्यभाषांनीं मराठीवर परिणाम केला आहे. कविचरित्रकार नाभाजी व प्रियदास, कबीर, शेखमहमद ह्यांच्या वाङ्मयानें मराठींत बरेच उर्दु व हिंदी शब्द आले आहेत. नामदेवाच्या वेळीं व्रज भाषेनें तर बरेच शब्द घुसडून दिले व ते लोकांस समजत असत. भासल्यासाठीं म्हणून नामदेवाचा गुरु विसोबा खेचर याचा एक अभंग देतों. अवतरण चिन्हांत दाखविलेले सर्व शब्द व्रज भाषेंतले आहेत.

'मूळ' वदनाचा 'उदानु' नेत्राचा । 'अगुळ' हस्ताचा स्वामी माझा ॥
मुगुटत्रयाचा 'केवळ्या' सगळीकाठी । पवित्र तळवटी चरण ज्याचे ॥
'खेलिते' भागलो पोंकू वेडावले । 'अगुळ' मागी झालीं थकित तया ॥
'दकारा' वदनाचा आला वर्णावया । जिव्हा चिरलिया नकळे त्यासी ॥
सद्भावें शरण 'अवाङ' जोडोनी । खेचर विसा चरणीं निवटला ॥

वरच्या अभंगातील अवतरणातील शब्द व्रजभाषेतील सख्या विशेषणें असून त्यांचा अर्थ येथें देतों -मूळ=१, उदानु=२, अगुळ=१०, केवळ्या=१,

बेलिते=६, पोकु=४, टकार=१०००. व्रजभाषा कृष्णाची व त्याच्या गोपगोपींची भाषा असल्यामुळें सर्व भक्तांना ती विशेष जिव्हाळ्याची वाटत असे. संत उत्तरेकडचा असला काय किंवा दक्षिणेकडचा असला काय, भक्तिचा जिव्हाळा सर्वांना सारखाच. रामानंद कबीर, वल्लभ, चैतन्य, नाभाजी, प्रियदास, सूरदास, तुळशीदास, नरसी मेहता, मिराबाई इत्यादि संतांच्या वाङ्मयाशीं इकडच्या लोकांचा परिचय असे. नाभाजीच्या कविचरित्रांत इकडच्या काहीं रामदासानुयायांचीं चरित्रें गोंविलीं आहेत. व महिपतीनें आपले भक्तलीलामृत मूळ नाभाजीचा ग्रंथ व त्याच्यावरची प्रियदासाची टीका हे दोन्ही पुढें ठेऊनच लिहिला आहे. श्री समर्थांचे मठ हैद्राबाद संस्थानांतही पुष्कळ आहेत. वाङ्मयातील असला हा विनिमय भाषेवरही उमटला आहे महानुभाव चक्रधरांनीं एक उत्तरमहाराष्ट्रांत निराळाच 'मानभाव' म्हणून पंथ काढला त्या पंथाचें वाङ्मय तयार केलें आणि अन्यधर्मीयांपासून अगदीं दूर ठेवलें. ग्रंथ लिहिण्याची व वाचण्याची त्यांची एक किल्ली असे. ती किल्ली त्यांच्या महंतानाच तेवढी माहिती असे. ह्या पंथाच्या वाङ्मयानें बरेच हिंदी शब्द मराठींत आणले. यात्रेकरू जे यात्रेसाठीं फिरत, तेही येतांना बऱ्याच भाषेंतले शब्द आपल्या बरोबर घेऊन येऊन मराठींत खोवीत असत.

आर्य भाषांपैकीं आणखींही काहीं इतर आर्यभाषांचा मराठीशीं संबंध आला आहे. हा संबंध काहीं सान्निध्यामुळें आलेला नाहीं. तर त्या भाषा बोलणारे लोक जेते होते म्हणून आला आहे. ह्या फार दूरच्या आर्य भाषा आहेत. हिंदुस्थानांतील जवळच्या आर्य भाषांचा संबंध वर दिला आहे पोर्तुगीज, फ्रेंच, इंग्लिश इतक्याच लोकांचा आणि मराठी बोलणाऱ्यांचा संबंध फार आला. त्यातल्यात्यात सुद्धा फ्रेंच लोकांचा फारसा आलेला नाहीं त्यांनीं फक्त फिरंगी (Frank) सारखे शब्द घुसडले इतकेंच. पोर्तुगीज लोकांचा आणि अस्सल मराठी बोलणाऱ्यांचा फार संबंध आला नाहीं. तो जर आला असता तर जाणवला असता. पोर्तुगीज लोकांच्या वेळेस अस्सल मराठी पुर्णप्रांतांत सध्याप्रमाणें बोलली जात नसून पैठणपासून

पीडच्या मार्गानें पदरपूरपर्यंतच्या टापूत बोल्ली जात होती. ह्या टापूतील लोक व भाषा परकीयांच्या संपर्कापासून पुष्कळ दिवस अलिप्त राहिल्या ह्या लोकांचा संबंध आला तो बहामनी राज्यात असलेल्या म्लेंछ मुसलमानांशीं आला. व त्याचा परिणामही भाषेवर झाला पोर्तुगीज लोकांचा संबंध पश्चिम किनाऱ्यावर रहात असलेल्या कोळी लोकांशीं आला. त्या कोळ्यांची भाषा अस्सल मराठी नसून तिचीच एक पोटभाषा होती. दक्षिण कोंकणातील मराठीच्या पोटभाषेवर पोर्तुगीज भाषेचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. शिवाय पोर्तुगीज लोक वाङ्मयाच्या, व धर्माच्या बाबतीत फारच उपद्यापी होते. धर्मात त्यानीं केलेले उपद्याप अद्याप अगावर शहारे आणतात. वाङ्मयाच्या बाबतींत कोंकणी मराठींत पादर स्टीफन यानें ख्रिस्तपुराण रचलें आहे. इकडे छत्रपति शिवाजी राज्य करीत होते व तिकडे स्टीफन आपलें ख्रिस्तपुराण लिहित होता. पाद्री, नाताळ, लिलाव वगैरे शब्दात त्यानीं आपला अवशेष मागें ठेवला आहे. शेवटीं इंग्लिश भाषेचा संबंध, राज्यकर्ते म्हणून ह्यांचा संबंध असल्यामुळें इंग्लिशमधील कित्येक शब्द आजवर मराठींत आले आहेत व अद्याप आणखीही येतील. रोजच्या व्यवहारात ह्याच्या समापणात किती तरी इंग्लिश शब्द आपण वापरतों चिपळूणकराना ह्या इंग्लिश शब्दाची भीति वाटून त्यानीं मराठीच्या धतीनें लेख लिहिण्यास सुरुवात केली. आणि जाणत्या लोकांचीं मनें सरकतोदधिकडे आकर्षण करून घेतलीं त्यांच्या प्रयत्नास काहीं थोडेसें यशही आलें. परतु असें सारखें कोठवर करावयाचे ? रोजच्यारोज नवे नवे शब्द येणारच व मराठींत घुसडणारच. टेबल, बुक, टाइम, ठेशन, स्टूल, स्कूल, स्क्रू, असे किती तरी रोजच्या व्यवहारातले शब्द सागता येतील.

अनार्य भाषापैकीं कानडी, फारशी ( ह्यामध्यें अरबी, तुर्की ह्यांचा समावेश केला आहे ) ह्या भाषाचा मराठीशीं संबंध आला आहे. भक्तिमार्गी जेवढ्या सतानीं मराठींत कवित्व केलें त्यांपैकीं काहीं नाथ पथी होते व काहीं नारायणपथी होते ह्या आदिनारायण पथ मूळचा दक्षिणेंतील, त्याचा मूळ प्रवर्तक रामानुजाचार्य. भक्तिमार्गीयाचें मुख्य दैवत विठोबा- तोही विजयनगरचा त्याला " कानडें परब्रह्म " असें नाम

देवानें म्हटलें आहे. कानडी भाषेचा मराठी भाषेवर परिणाम होण्यास हें एक कारण. ह्यापुढें बहामनी राज्यात व पुढें त्याचीं पाच शकलें झाल्यानंतर त्या पाचही राज्यांचा कांहीं भाग कानडी बोलणारा व काहीं भाग मराठी बोलणारा असल्यामुळें दोन्ही भाषांचा एकमेकींवर परिणाम झाला, हें दुसरें कारण पुढें शहाजी राजे ह्यांनीं दक्षिणेस स्वाऱ्या केल्या, येवढेंच नाहीं तर दक्षिणेंत तंजोरच्या पाळेगाराकडून जहागीरही संपादिली. त्यामुळें त्याच्याबरोबर मराठी बोलणारीं पुष्कळ कुटुंबें कर्नाटकात जाऊ येऊ लागलीं व त्यामुळें भाषांत सरमिसळ झाली शिवाय दोन्ही भाषा अगदीं जवळजवळच्या, एकमेकींच्या शेजारशेजारीं असल्यामुळें एकीचा शेजार दुसरीस भोंवला ह्यांत कांहीं नवल नाहीं. कानडीचा संबंध मराठी जन्मास येण्यापूर्वीच प्राकृतशीं आला होता. हेमचंद्रानें देशीनाममाला म्हणून जो कोश लिहिला आहे त्यांतील १५० शब्द कानडी आहेत. कर्नाटक हें नांव महाभारतांत आहे. त्याच संस्कृत शब्दाचा ' करिनाडु ' असा अपभ्रंश झाला आहे. " कालवणें, गोंधळ, फोड ( जीवाचें ), कोलती, खड्डा, गाडी, गुण्डा गुच्छा, गुंज, जीन, चड्डा, झड, अप्पा, आंघळणें, आगरु, आड, आपटणें इत्यादि मराठींत सांपडणारे शब्द जातीनें कानडी आहेत ज्ञानेश्वरींतही कांहीं कानडी शब्द सांपडतात. उदाहरणार्थ–अद्यालु ( भय ), उळींग ( सेवा ), ओगर ( जेवण ), उडव, कर्तकटा, कडसण, मातु, मेच्छु, रावळें इत्यादि.

फारशी भाषेनें केलेला परिणाम पुष्कळ ठिकाणीं दिसून येतो कांहीं कांहीं फारशी शब्दांचे परकी स्वरूप इतकें टस झाले आहे व मराठीशीं इतके मिसळून गेलें आहे कीं, फारशी स्वरूप हुडकून काढण्यास फार प्रयास पडतात फारशी भाषेचा आणि मराठीचा संबंध थोडीथोडकीं नाहींत तर ३५०—४०० वर्षे जवळ जवळ कायम राहिला राज्यकर्ते म्हणून मुसलमानांचा मराठी भाषा बोलणाऱ्यांशीं संबंध आलाच, पण आणखी दुसरींही इतर कारणें भोंवलीं ह्या फारशी संबंधावर दृष्टि ठेवून मराठी भाषेच्या स्थितीचा कालक्रम ठरण्यासारखा आहे. सन १२९० पासून १३९० पर्यंत शुद्ध मराठी भाषा प्रचारांत होती. पुढें १३९० पासून १६३० पर्यंत फारशी शब्दांचे लोंढे येण्याची कमाऊ

झाली. बहामनी राज्यामुळें त्यास जास्तच प्रोत्साहन आलें. १४५० मध्यें त्याची कमाल मर्यादा होऊन गेली. ह्या लोंढ्यास बांध घालण्याचे १६५६ पासून १७२८ पर्यंत पुष्कळ प्रयत्न झाले. त्यामध्यें शिवाजीराजे यांनीं रघुनाथ पंडिताकडून १६६९ मध्यें राजव्यवहार कोश तयार करविला. अशा कांहीं प्रयत्नांनीं ही लाट कांहीं दिवस थोपवून धरली. पण पुनः लगेच छत्रपति राजाराम महाराज यांचे कारकीर्दींत गोष्टी पुनः पूर्वस्थळावर आल्या. ' अमात्य ' शब्द जाऊन त्याबद्दल ' हुकमत पन्हा ' शब्द आला, शाहूच्या कारकीर्दीत तेंच धोरण पुढें चाललें. ' सेना–खास–खेल–बहादूर ' वगैरे फारसी पदव्या देण्याचा प्रघात पुनः सुरू झाला. १७२८ पासून १८१८ पर्यंत पत्रव्यवहारांत फारशी शब्द किती तरी येत असत. सध्यां ज्याप्रमाणें इंग्लिश शब्द मनमुराद आपण वापरतों, त्याप्रमाणें त्या काळांत फारशी व अरबी शब्द त्यांना वापरावे लागत. लोकांना त्यापुढें इलाजच चालत नसे. प्रत्यक्ष शिवाजी राजे जरी ह्या प्रवृत्तीच्या विरुद्ध होते तरी मायबोलची भाषेची परिस्थिती इतकी फारशीमय झाली होती कीं, जरी त्यांनीं राजव्यवहारकोश संस्कृत शब्दांचा तयार करविला; तरी सन १६७७ च्या पुढें महिन्याच्या २६ व्या तारखेस यशवंतराव शहाजी कदम यांना त्यांनीं लिहिलेल्या पत्रांत फारशी शब्दांची किती रेलचेल झालेली आहे हे प्रत्यक्ष त्या पत्रावरूनच दिसेल. तें पत्र खालीं देतोंः—

" स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ४ पिंगल संवत्सरे श्रावण शु० ७ गुरुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति यांनीं यशवंतराव शहाजी कदम नामजाद कोट चाल्युजनुर यासी आज्ञा केली ऐसी जे—

' कोट '' मजकुरीं ' ' हसमें ' ' नामजाद ' आहे व एक ' जिनस ' ' ही ' ' शिलक ' थोडा बहुत आहे. ऐशीयासी त्याच्या लिहिणीयासी लिहिणार पाहिजे. म्हणून त्यावरी तिमाजी नारायण यासी ' जमा ' करून पाठविले आहे ' तैनात ' ' दरमाहे ' होन प्रार ३ तीनरास केले असेत हा मोा पासून ' बजावाटा '' उखेटी ' मोा ' बजा ' करून बाकी ' बेरीज ' माहे ' दर माहे ' आदा, ' करीत जाणे. आणि त्याचे हाते ' कूट '' मज-

कुरी ' लिहिणियाचें काम घेत जाणें—कागदपत्र लिहिणीयामा देत जाणें—' मजुरा ' असे लेखनसीमा.

त्र्यंबकसुत मोरेश्वर.

ह्या पत्रांत अवतरणांत घातलेले शब्द फारशी किंवा अरबी आहेत. मराठी भाषा फारशीच्या अशी इतक्या कचाटींत सांपडण्याचीं कारणें राजसत्तेच्या बरोबर येणारीं इतर होतीं हें सांगायला पाहिजेच असें नाहीं. एक राजसत्ता आली म्हणजे तिच्याबरोबर राज्याचीं खातीं, दरबार, कारागिरी, धंदे, फौजफाटा वगैरे बाबी येतातच. आणि त्या सर्वांचा भाषेवर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. मुसल्मानांत इतर लोकांपेक्षा विशेष गोष्टी होत्या त्यांच्यांत धर्माचें वेड विलक्षण असल्यामुळें ते लोक नुसतें राजकारणच करून थांबले नाहींत. त्यांनीं बळजबरीनें कित्येक लोकांस धर्मांतर करावयास लावलें व त्या बाटल्या लोकांनींही आपले आधिभौतिक फायदे साधण्यासाठीं " मुसलमानपणांत " प्रत्यक्ष मुसल्मानांवरही ताण केली व त्यांना लाजवलें. ईश्वाच्या घरादारांत भाषा फारशीशब्दमयच झाली. मुसलमानांचे फकीर दुसऱ्या मार्गानें व्याख्यानें देऊन आपलें धर्मवेड लोकांत पसरवीत असत. इतर परकी भाषांचे परिणाम आणि फारशी भाषेनें केलेला मराठीवर परिणाम ह्यांत फार तफावत आहे. इतर भाषांनीं कांहीं शब्द आणून सोडले इतकेंच. वाक्यरचना, शब्दसिद्धि वगैरे गोष्टींत इतर भाषांनीं हात घातला नाहीं. पण फारशीची गोष्ट तशी नाहीं. तिनें शब्द तर अपरंपार दिलेच व आणखी वाक्यरचनेंत व शब्दसिद्धींतही ढवळाढवळ केली. वाक्प्रचार व म्हणीही फारशी भाषेंतील मराठींत रूढ होऊन बसल्या आहेत. फारशी प्रत्ययांची मदत नवे शब्द सिद्ध करण्यासाठीं घेण्यांत येऊं लागली. संस्कृत शब्दांना फारशी प्रत्यय लावण्यांत कांहीं परकीपणा वाटेनासा झाला जाणत्या माणसाला जरी ती विकृति—दाढीवाल्याला पगडी घातल्याप्रमाणें—दिसत असे तरी इतर लोकांच्या दृष्टीपुढें त्याचें वैरूप्य झाकलें जात असे. हिंदु लोकांत धर्माच्या बाबतींत ज्याप्रमाणें परमतसहिष्णुता सांपडते—वाटेल तीं धर्ममतें आलीं, तरी त्यांच्यांतील चांगला तेवढा भाग घेऊन त्याचा परकीपणा काढून टाकून त्याला हिंदु-

पण घावयाचा ही जी हिंदु लोकांत प्रवृत्ति दिसून येते ती त्यांच्या भाषांमध्यें सुद्धां दिसून येते. परकी भाषा आली, तिच्यातील जेवढें घेईल तें स्विकारावयाचें व त्याला मराठी रूप द्यावयाचें. फारसी शब्दाचें तसेंच झालें. त्यांनीं कांहीं दिवस आपलें स्वतंत्र अस्तित्व जाणवलें; परंतु त्यांच्यावर जेत्याची भाषा म्हणून कांहीं भाडभीड न ठेवतां चांगला मराठीपणाचा शिक्का मारला व आपलेसें करून टाकलें. मुसल्मानांनीं लोक बाटवले असतील व हिंदूना सनातनी धर्मांत परत येण्यास अशक्य केलें असेल, परंतु धर्मापेक्षां भाषा उदारमतवादी असल्यामुळें तेथें उलटा प्रकार झाला. फारसी शब्दानाच उलटें मराठीनें बाटविलें आणि आपलेसें करून टाकलें. फारसी शब्द मराठींशीं किती एकरूप झाले आहेत ह्याची कल्पना खालील उदाहरणें वाचून येईल. साध्या माणसास ते मराठीच वाटतील. इतके ते रोजच्या व्यवहारांत किंवा भाषेच्या रोमरमांत शिरले आहेत.

१ नामें:—बदामत, इनाम, तारीख, मजूर, वजीर, पेशा, मालिक, खुर्द, बुदुक, माहे, कौल, रुपम, मुशाहिरा, मिसल, राब, बाब, यानत, मिळकत, दानत, सरकार, किल्ला.

२ विशेषणें:—बजा, बाकी, माफक, आदा, अस्सल, बदामत, फलाणा, एकटा, खुद्द.

३ शब्दयोगीं अव्ययें :—देखील, तें ( चाळीस तें पन्नास ), ऐवजीं, बद्दल, शिवाय, नजीक, दरहुकूम.

४ उभयान्वयीं अव्ययें:—व, मगर, अगर, सबब, लेकिन.

५ उद्गारवाचक:—बस्, हा, अल्बत, बेशक, खूप, वाह, शाबास, हाय, खबरदार.

६ क्रियाविशेषणें:—हमेशा, बिल्कूल, वारंवार, पेस्तर, यंदा, मुखशीट, जल्द, छान.

७ क्रियापदें ( संयुक्त ):—दम घेणें, खरेदी करणें, नजर राखणें, चालू करणें.

कांहीं जोडशब्द:—नजरचूक, अंगचोर, राजरस्ता, बाजारभाव,

5832

जगजाहीर, खरेदीखत, गैरमर्जी, कज्जेदलाल, चीजवस्त, धनदौलत, पादरासफेत, पिंवळाजर्द, बाजारहाट, मोलमजुरी.

अरबी आणि फारशीः—अक्कलहुशारी, अलदुनिया, ऐषआराम, फदफितुरी, बदागुलाम नफातोटा, जमीनअस्मान.

काहीं फारशी प्रत्यय—

१ इः—तोंडो, डोंगरी, वैद्यकी, मांत्रिकि, दोस्ती, मैत्री, कारागिरी.

२ गी, आकिः–देणगी,खोटगी, आवासकी, पाटिलकी, निमकी,पावकी.

३ दारः— ऐटदार, दुमदार, पीळदार, कसादार, पगारदार.

४ खोरः—दिवाळखोर, चाडखोर, शबेखोर, माऱखोर.

५ गारः—कामगार, माहितगार, पाळेगार.

६ जी —घड्याळजी, तबल्जी.

७ खानाः—चोपखाना, शिकारखाना, फरासखाना, दवाखाना.

८ दाणीः—मच्छरदाणी, अत्तरदाणी

९ बेः—नकारार्थीच–बेताल, बेढब, बेदर, बेचव, नापत, नापीक, गैरसोय, गैरसमजूत.

शेवटीं काहीं फारशी साधे शब्द देतोंः—

अद्दल, अमदानी, इतराजी, इभ्रत, इरसाल, उमेदवार, कसाग, कारस्थान, किफायत, खाशी, खुलासा, खुशाली, गप, जहाबाज, जिकीर, जिंदगी, तजवीज, दाखला, पसत, पोच, फद, फाजील, नामदार, मस्खरी, मातब्बरी, मौज, याद, शिकस्त, वस्ताद, शिक्का, समझ, सुमार, हमी, हिकमत इ. इ.

5832

# प्रकरण १२ वें.

—:०:—

## मराठीचें व्याकरण.

मराठीची उत्पत्ति आणि तिच्या आरंभासंबंधीं ऐतिहासिक विवेचन व त्याचप्रमाणें तिच्या आरंभापासून तिला दुसऱ्या कोणकोणत्या भाषांचा कोणकोणत्या प्रकारानें उपसर्ग पोहोंचला ह्यासंबंधींही विचार मागील प्रकरणात केलाच आहे त्यानंतर भाषेच्या व्याकरणाचा साहजीकच प्रश्न येतो. व्याकरणातील बाबींचा विचार करतांना आपणास मुख्य कारण-मीमांसेवर भिस्त ठेवली पाहिजे. भाषेंत "शुद्ध कसें बोलावें आणि शुद्ध कसें लिहावें" हें व्याकरण शिकवत असेल व व्याकरण लिहितांना हेंच अंतिम पुढें ठेवलें पाहिजे. पण भाषाशास्त्रावरच्या पुस्तकांत हा उद्देश पुढें ठेवून कसें चालावयाचें ? उलट भाषाशास्त्रांतील नियमानीं, व होणाऱ्या व्याकरणासंबंधीं चर्चेनें "भाषेचें व्याकरण शुद्ध कसें लिहावें" ह्या विषयींचा उलगडा होतो. तेव्हां येथें जें कांहीं आम्ही मराठी भाषेचें व्याकरण देणार आहों तें केव्हांही व्याकरणांतील उघड उघड बाबींचा ऐतिहासिक रूपपरंपरेसंबंधीं किंवा कारणपरंपरेसंबंधीं असणार. त्यामुळें व्याकरण म्हणून विवेचन जरा कमी दिसेल पण आपणास गोष्ट पहावयाची एकच आणि ती म्हणजे ऐतिहासिक परंपरा बरोबर लागली आहे किंवा नाहीं ही होय संस्कृत भाषेंतील प्रातिपदिकें क्रिया धातु व प्रत्यय ह्यांचा विचार मागें झालाच आहे आतां आपणास करावयाचें उरलें आहे तें इतकेंच कीं, मराठी भाषेतील व्याकरणानें मान्य केलेल्या त्यांचा-खुणांचा, चमत्कारांचा तलास लावून त्यांचा माग संस्कृतपर्यंत लावणें. संस्कृतपासून प्राकृत बोलीपर्यंत हे जे शब्द—प्रत्यय इत्यादिकांचे लोण आलें, तें आणतांना त्यांनीं वाटेंत कोणकोणत्या पाऊलवाटेनें कोंडी फोडून आणलें व येतांना कांहीं माग मरून वाटेंत गळून पडला कीं काय, अथवा वाटेंत कोप्यांत फार वेळ रहाण्याचा परिणाम त्यांच्यावर झाला आहे कीं काय हें आपणास पाहावयाचें आहे कारणाची एक मली मोठी चाळणी असते.

तिच्यातून जें कांहीं खालीं पडलें तें ठरलें. चाळणींत कायम राहिलें तें निरुपयोगी भुसा म्हणून फेंकून दिलें. संस्कृत भाषा बोलणाऱ्याचा एकच समाज जर असता व भोंवतालचें वातावरण आर्यमयच केवळ असतें, इतर भिन्न संस्कृतींच्या किंवा भाषांच्या समाजाचें वारेंसुद्धा जर नसतें तर प्रकृत मराठींतील यच्चावत गोष्टींचा संबंध संस्कृतशीं सहज लावता आला असता इतर भाषाकडे लक्ष्य द्यावयाचें कारणच पडलें नसतें पण वस्तुत तशी स्थिति नाहीं. आर्य लोक अगोदर जेते म्हणून आपली उच्चतम भाषा व संस्कृति घेऊन आले, व त्याच्या मागून ग्रीक, शुद्देची, शक, यवन, पल्लव, कांबोज, तुर्क, मोंगल, फ्रेंच, डच, पोर्तुगीज, इंग्लिश, वगैरे भिन्न भिन्न भाषाचे व संस्कृतींचे लोक आले. त्याच्याशीं व एतद्देशीय जातींशीं आर्यांचा संबंध आला. संबंध इतका रोमरोमीं भिळून गेला आहे कीं, भाषेंतील स्वकीय कोणतें व परकीय कोणतें हें भाषाशास्त्राशिवाय इतरास सागता येणें अशक्य झालें आहे म्हणून मराठींतील शब्दातच नव्हें, तर त्याच्या प्रत्ययात सुद्धा परकीयत्व कोठें कोठें दिसण्याचा संभव आहे. व्याकरणात वर्णसिद्धि, शब्दसिद्धि व वाक्यसिद्धि हे विषय मुख्य असतात वर्णसिद्धीचीं कारणें वर्णप्रक्रिया प्रकरणात दिलीं आहेत शब्दसिद्धि प्रत्ययानें होत असते. प्रत्ययात सुद्धा दोन तऱ्हा आढळतात एका प्रकारच्या प्रत्ययानें एक निराळ्या स्वतंत्र अशा शब्दाची सिद्धि होते. व दुसऱ्या प्रकारच्या प्रत्ययानें शब्दाचा एकमेकाशीं संबंध दाखविला जातो फारशी प्रत्यय मागें दिलेच आहेत येथें फक्त मराठी प्रत्यय देतों व त्याचें संस्कृत प्राकृत व अपभ्रंश ह्या भाषात न सापडणारें मूळ रूपही देतों —

संस्कृतमध्यें ' क ' म्हणून स्वार्थे प्रत्यय आहे. त्यापासून मराठींत पुष्कळ प्रत्यय उतरले आहेत

१ आ, इ, उ, उदाह साच, साचा, मिठा, राम्या ( संबोधन ). दुर्गी ( इप्रत्यय )

२ टा ठी, उदाह—एवढा,—ढी, तेवढा, तेवढी.
डा, डी, उदाह—मागडा, कुतरडा.

मूळ—संस्कृत " दृश " नाम. सर्वनामांना हा प्रत्यय लागतो. प्राकृत रूप ' दृह् ' उदाह—इदृशम्—( प्राकृत ) एद्दह—( अपभ्रंश ) एवढो, एवढु.

इंग्लिशमधील Like शब्द असाच आहे. त्याचा अपभ्रंश ly होतो. Kinglike, Kingly. वरच्यापैकीं ट्, द् ह्या वर्णांचें रूपांतर र् आणि ल मध्येंही होतें.

३ अइ, आई. उदाह—मिठाई, मलाई, वढाई, वडाई, इत्यादि. हा भाववाचक नामाचा प्रत्यय आहे. ह्याचें मूळ संस्कृत ' ता ' मध्यें आहे.

( संस्कृत ) ता—दा—आ—( प्राकृत. )

अथवा प्राकृत ' आ ' पासून आला असावा आणि हा प्राकृतमधील ' आ ' संस्कृत ' क ' शीं संबद्ध असावा.

४ पण, पणा उदाह. मोठेपण—पणा शहाणपण—पणा.
हाही एक भाववाचक नामें बनविण्याचा प्रत्यय आहे. हा संस्कृत 'त्व' पासून येतो. संस्कृत ' त्व ' वेदांतील ' त्वन् ' पासून आहे. ' त्व ' चें अपभ्रंश मार्गात रूपांतर प्प, प्पण होतें.

५ वंत, वंती, मत मती, } उदाह—धनवंत, मान्यवंत, कृपावंत, रसवती, गुणवती.
मूळ—संस्कृत वत् आणि मत् प्रत्यय हे होत.
दुसरा एक ' आईत ' म्हणून प्रत्यय आहे तो ह्यापासूनच आला असावा भालाईत, भटाईत, लिंगाईत

६ आल, आर, आरु, आलु, उदाह—रेताल, रेताड, तोंडाळ, नाठाळ लाजाळु, कृपाळु प्राकृतमध्यें हाच प्रत्यय ' आल ' आणि ' आलु ' ह्या स्वरूपांत आहे. संस्कृतमध्यें ' रसाल ' मध्यें हाच प्रत्यय आहे.

७ अइल, इल, उल, उदाह—चोंकील, घामोळी, गाठेल, एला प्राकृतमध्यें ' इल्ल ' अथवा ' उल्ल ' असे प्रत्यय आहेत. संस्कृत मध्यें त्यांचें रूप इरु आहे.

८ इ, उदाह—माळी, धोबी, तांबोळी, तेली, इंग्रेजी, मराठी, मुक्ती, हा एक तद्धित प्रत्यय आहे. संस्कृत रूप—इक—तांबोलिक.

९ इ, आइनि, उदाह–डोंगरी, गोळी, ( गोळ ) कुत्री, सोनारीण कुंभारीण.

मूळ—संस्कृत 'इका' 'इनि' प्राकृत इआ.

१० अव, उदाह–पाचवा, विसावा.

मूळ–संस्कृत–मक–मागधी,–अमए,अपभ्रंश–पंचमए.–पंचवएई.

११ स, सर, उदाह—दुसरा, दुसरी, तिसरा, तिसरी, काळासा, काळसर, ल्हानसा.

मूळ–संस्कृत–'सृत.' प्राकृत–अर्धमागधी–सुअ, सलिए सलिअ, सरिअ, सर, स , संस्कृत. सदृशपासून. (रलयोरभेदः)

१२ अर्, आर्, र, उदाह–खोडकर, गावकर, पुणेंकर, इत्यादि–संस्कृत 'कर' पासून. मूळचा अर्थ नाहींसा झाला. हिंदि 'केर.'

१३ आस, उदाह–मिठास ( बोलणें ).

मूळ संस्कृत शब्द वाञ्छा, किंवा आशापासून.

१४ वट, आवट. उदाह–रानवट, बाळवट, चावट.

मूळ संस्कृत. वृत्ति अथवा वृत्त अथवा वार्ता पासून.

आतां नाम, सर्वनाम ह्यांना लागणारे विभक्तीचे प्रत्यय घेऊं. विभक्तींच्या बरोबर येणाऱ्या नामाचें होणारें एक विशिष्ट स्वरूप–सामान्य रूप ह्याचा विचार प्रत्ययानंतर करूं. त्याचप्रमाणें अनेकवचनाबरोबर येणाऱ्या अनुस्वाराची कारणपरंपराही नंतर सांगूं.

प्रथमेस प्रत्यय नाहींत. जुन्या मराठींत नामाची प्रथमा 'उ' कारानें दाखवीत असत. उदाह–भास्करु, कुमरु, एकु, मेरु, द्वेषु ( ज्ञानेश्वरी ). हा 'उ' प्राकृतमधील प्रथमेच्या 'ओ' चें ऱ्हस्व स्वरूप आहे. संस्कृतमध्यें संधीच्या नियमानें प्रथमान्त अन्त्य 'स्' चा 'ओ' होतो. कोंकणी भाषेंत अद्याप 'ओं' कायम आहे. देशी भाषेंत कांहीं शब्दात 'उ' कायम राहिला आहे. उदाह–वाटसरु, आयसु, गणु. द्विवचन मराठींत प्राकृतप्रमाणें नाहींसें झालें आहे. परंतु एकदोन प्रयोगांत त्याचा अवशेष आहेसा दिसतो. ज्ञानेश्वरींत एक रूप सापडतें. " शशिसूर्यांजो प्रकाशु । तो मीची जाण "–ह्या ओळींत " शशिसूर्यां " हें सप्तमीच्या द्विवचनाचें रूप दिसतें. हें राजवाड्यांनीं ज्ञानेश्वरीच्या व्याकरणांत सांगितलें

आहे. मूळ गीतेंतील " प्रभास्मि शशिसूर्ययोः " ह्या प्रतीकाचें तें भाषांतर आहे. त्याचप्रमाणें लौकिक बोलींत " तो पाया पडतो " ह्यात " पाया " हा शब्दही द्विवचनात आहे हें आम्हीं विविधज्ञानविस्ताराच्या एका लेखात दाखविलेंच आहे. मराठींत अनेकवचनात काहीं फरक नाहीं. क्रियापदाच्या रूपावरून व शब्दाच्या सामान्यरूपावरून अनेकवचन हुडकून काढावयाचें असतें.

द्वितीया आणि चतुर्थी ह्या दोन्ही विभक्तींचे प्रत्यय सारखेच आहेत. एक वचन--स, ला, ते, अनेकवचन--स, ला, ना, ते.

' स ' हा षष्ठीच्या ' स्य ' पासून आला आहे. प्राकृत रूप स्स होतें. प्राकृतमध्यें चतुर्थी नाहींशी झाली आहे, त्याचप्रमाणें मराठींतही नाहींशी झाली आहे.

ला—संस्कृत—१ लग्न—लग्ग—लागी—ला

२ लागयति—लागइ—लायइ—लाअ—ला.

३ लाभें—लाहें—लाहिं ( अपभ्रंश भाषा )—ला, अपभ्रंशातील ' हिं ' नाहींसा होतो.

अशा तीन तऱ्हेनें व्युत्पादिता येतो.

ते—संस्कृत तै.—तइ—तहिं अपभ्रंश हिं—लोप.

ना ( १ ) षष्ठीच्या ' नाम् ' पासून प्राकृत ' णं ' देवानाम्—देवाण देवा, देवाना.

( २ ) वरच्या ' ला ' प्रत्ययापासूनच आला असण्याचा संभव आहे.

तृतीया—एकवचन—नें, ए, शीं, अनेकवचन—नीं, हीं, ईं, शीं

नें—दोन प्रकारांनी व्युत्पादिता येईल.

( १ ) नें—ले ह्या प्रत्ययापासून आणि ' ले ' हा लगू धातूपासून 'ला' प्रमाणें.

( २ ) नें ह्या प्रत्ययात जुन्या तृतीयेचा प्रत्यय दुबार आला आहे.

न—संस्कृत एन अथवा एणपासून अपभ्रंश=इण.

एं—हाही एनपासून अपभ्रंश तृतीयाप्रत्यय एं.
उदाह—देवें. हा एं पुन्हा अपभ्रंश अहिं ह्या प्रत्ययापासून आहे.

एं-एनपासून किंवा अपभ्रंश अहिं पासून. हा प्रत्यय जुन्या मराठींत सांपडतो.

शीं-हा प्रत्यय सम ह्या संस्कृत शब्दापासून. द्वितीयेंत असाच एक प्रत्यय आहे. सवें-हा प्रत्यय समपासूनच आहे. जुन्या मराठींत मिळतो सीं.

पंचमी-हून, ऊन हे दोन्ही प्रत्यय एकच आहेत. एकात ' ह् ' चा लोप झाला.

सून—१ हिंतो, सुंतो ह्या प्राकृत पंचमीच्या प्रत्ययांपासून.
२ हून हा प्रत्यय होऊन ह्या मराठी धातुसाधिताचें लहानसें रूप आहे. " मी तेथें होऊन आलों. कचेरींत होऊन जा. " हाच आधार घेऊन हिंतो किंवा हुंतो व सुंतो ह्या प्राकृत प्रत्ययापासून म्हणण्यापेक्षा अनुक्रमें भू आणि अस् धातूंच्या धातुसाधितापासून दोन्ही प्रत्यय निघाले असावेत, हें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें. अपभ्रंश मार्फत होतऊ अर्धमागधींत ' हुनियां ' अशी रूपें सांपडतात.

षष्ठी-चा ची, चें हेच प्रत्यय अनेकवचनाचे आहेत
झा, झी, झें } हे दोन्हीं सर्वनामास लागतात-
ला, ली, लें, }

' च ' व्युत्पादण्याचे तीन प्रकार आहेत.

१ संस्कृत स्य पासून, वैदिक सर्वनाम त्यत् पासून मराठींत च आला आहे. तत्रत्य- तेथचा, अत्रत्यः—एथचा. ( राजवाडे )

२ संस्कृत स्य पासून, दुसरें उदाहरण स्यम्-चिव चिव करणें.

३ संस्कृत सत्क पासून ह्या ' सत्क ' शब्दापासून मराठी आणि हिंदी ह्या दोन भाषांतील षष्ठीचे प्रत्यय आले आहेत ' च ' ' सत् ' पासून आणि हिंदी क ' त्क ' पासून ' सत्क ' हा शब्द जुन्या शिलालेखांत षष्ठ्यर्थी वापरला आहे. ( वैद्य )

ह्यापैकीं भाषाशास्त्रांच्या नियमानें ' च ' ची उत्पत्ति पहिल्यां दोन प्रकारानींच मान्य होईल. तिसरा प्रकार भाषाशास्त्राविरुद्ध आहे. त्यातल्या-त्यातसुद्धा स्य पासूनच ' च ' झाला असला पाहिजे. संस्कृतमध्यें कांहीं नामाची षष्ठी ' स्य ' प्रत्ययानें साधतात व कांहींची नः प्रत्ययानें साधतात उदाह–मधुन', अग्निनः इत्यादि एक प्रकार व रामस्य नृपस्य हा दुसरा प्रकार. ' स्य ' चा प्रकार मराठींत उतरला आहे व दुसरा 'नः' चा प्रकार गुजरार्थीत उतरला आहे. हिंदींतील ' क ' धरपरा केर–कार्य–कृ ह्या मार्गानें कृ धातूकडे लागण्यासारखी आहे. गुजरार्थींतील ' नु ' ची उत्पत्ति कोणी ' तन ' पासून लावतात.

झा, ला हे प्रत्यय सर्वनामाना लागतात. झा–माझा, तुझा इ. ह्याचें पूर्व-रूप मदीय, त्वदीय ह्या शब्दात उघड दिसण्यासारखें आहे. इय–इज्ज ( प्राकृत ) ह्या मार्गानेंच हा ' झा ' प्रत्यय आला आहे. सिंधींतील षष्ठीचा प्रत्यय ' जो ' ह्या इय–इज्ज ( प्राकृत ) प्रत्ययापासून आला आहे. त्या सर्वनामाची दुसरीं रूपें ' मामक, तावक '; हीं रूपें ' माका, तुका ' ह्या कोंकणी भाषात प्रचलीत असलेल्या शब्दात सापडतात.

ला प्रत्यय द्वितीयेच्या ' ला ' प्रत्ययावरूनच आला असावा.

सप्तमी–एकवचन–त, इ, आं. त, इं, आ–अनेकवचन.

त–अन्तः ह्या संस्कृत शब्दापासून अन् आणि विसर्गलोप.

आं–अन्तः ह्याच शब्दापासून. उदाह—गळा माया.

ए.–" माझ्या मतें त्या जावें " तृतीयाच समजावी.

" माझ्या मतीं–मतानें " तृतीयार्थी सप्तमी.

इ–संस्कृत स्मिन्, म्हि पालीमध्यें, हिं अपभ्रंशमध्यें. ' ह ' चा लोप नेहेमीं होतो म्हणून इ.

हे साती विभक्तींचे प्रत्यय झाले. संबोधनात व प्रथमेंत फारसा फरक नाहीं. उच्चार मात्र दीर्घ करावयाचा. ह्या प्रत्ययानीं वाक्यात शब्दाचा इतर शब्दाशीं संबंध दाखविता येतो मराठी प्रत्ययाची उत्पत्ति संस्कृत–प्राकृत–अपभ्रंश ह्या तीन अवस्थात सापडणाऱ्या प्रत्ययापासून लागते व संस्कृत प्रत्ययाची उत्पत्ति सर्वनामापासून लागते. मराठींतील प्रत्ययाचें पूर्वज संस्कृतमधील प्रत्यय दाखवून दिले म्हणजे मराठी प्रत्ययहीं

मूळ सर्वनामापासून निघालें हें ओघानेंच म्हणणें येतें. म्हणून निराळा तोच प्रयोग पुनः करावयास नको. भाषेच्या प्रथम स्थितींत शब्दामधील संबंध दाखविणारे स्वतंत्र शब्द एकमेकापुढें ठेवीत असत. पुढें कालांतरानें संबंध दाखविणारे शब्द परतंत्र बनले. त्यांचा स्वताचा अर्थ नाहींसा झाला; व त्यांना प्रत्ययत्व आलें. ही एक भाषेची स्थिति आहे. पुढें भाषेंत असा एक काळ येतो कीं, प्रत्ययाच्या गवगवाटामुळें त्रास येऊन त्यांतून वाट काढण्याकरतां सर्व विभक्तींसाठीं किंवा कांहीं विभक्तींसाठीं निदान एकाच चागल्या सुटसुटीत अशा विभक्तीचा उपयोग करण्यांत येतो; व त्या विभक्तीच्या साहाय्यानें त्या त्या विभक्तींचा अर्थ पुरा दाखविला जात नसेल त्याच्यासाठीं शब्दयोगी अव्ययें घालून अर्थाची पूर्तता करण्याकडे भाषेंत प्रवृत्ति उत्पन्न होते. म्हणून तिकडील लोक Analytical भाषा असें म्हणतात. इंग्रजी, फ्रेंच, हिंदी, मराठी, इत्यादि भाषा त्या प्रकाराचीं उदाहरणें होत. मराठीमध्यें अशीं अव्ययें आहेत कीं तीं अव्ययें पूर्वीं स्वतंत्र शब्दाप्रमाणें वापरत होतीं. त्याच्या उत्पत्तिसह तीं खालीं देतोंः—

लागीं, लागुनी—संस्कृत लाग्. ' करतां ' कृ—धातु.

साठीं -स्य+अर्थे-स्स+अट्ठहिं-(अपभ्रंश) स+अठाहिं—साठीं. उदाहरण-देवस्य+अर्थे, देवस्स—अट्ठहिं—अट्ठ—देवासाठीं.

वरून—वरें; करून—कृत.

पासीं, पासून—पार्श्व ( संस्कृत. )

कडे, कडून.—कटि, कट संस्कृत.

ठायीं—स्थानें ( संस्कृत,) ठाणहि, ठायीं ( अपभ्रंश )

देवाना स्थानें=देवाण ठाणहिं=देवा ठायीं.

देवा ( अनुस्वार ण चा लोप झाला म्हणून ).

हीं सर्व अव्ययें शब्दाच्या पुढें लागतात व मागील शब्दाची षष्ठी विभक्ति लागते. कधीं षष्ठी घालीत जरी नाहींत तरी तेथें षष्ठी अध्याहृत असतेच. रामाच्या साठीं किंवा रामासाठीं, देवाच्यासाठीं, देवासाठीं. त्याकडे, त्याच्याकडे, पावसामुळें किंवा पावसाच्यामुळें.

हें जें एक रामा, देवा, त्या, पावसा—इत्यादि शब्दांत शब्दाचें

रूप सापडतें झालाच " सामान्यरूप " अशी पारिभाषिक संज्ञा आहे. विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगीअव्यय लावण्यापूर्वी शब्दाचें जें एक प्रत्यय घेण्याला लायक असें रूप होतें त्याला सामान्यरूप म्हणतात. मराठीप्रमाणें बिहारी, गुजराथी, सिंधी, पंजाबी भाषामध्येंही सामान्यरूप होतें. फक्त होत नाहीं तें बंगाली आणि आवढी ह्या दोन भाषात. शब्दाचें सामान्यरूप करण्याची क्रिया बोली उत्पन्न होण्यापूर्वी अपभ्रंश भाषामध्यें व त्याच्याही पूर्वी प्राकृतमध्यें सुरू झाली होती. ' मम ' ही षष्ठी आहे. ह्या षष्ठीच्या रूपालाच प्रत्यय लावीत. उदाहरणार्थ ' ममाइ ' तृतीया, ' ममाहो, ममाहि ' ही पंचमी, ममम्मि सप्तमी, अशीं रूपें होतात. ह्या रूपात ' मम ' ह्या षष्ठीला निरनिराळ्या विभक्तीचे प्रत्यय लावले आहेत. अपभ्रंशप्राकृतात असाच प्रकार आढळतो. उदाह–" हउ झिज्जउ तउ केहिं पिअ तुहु पुण अन्नह रेसि " " मी तुझ्याबद्दल झुरत चाललों आहे, आणि तू तिसऱ्याबद्दल झुरते आहेस. " ह्यामधील " केहिं आणि रेसि " हीं दोन अव्ययें ' तउ ' आणि ' अन्नह ' ह्या दोन षष्ठीच्या रूपांना लावलीं आहेत. मराठींत सामान्यरूप अपभ्रंशद्वाराच आलें आहे.

मराठींत सामान्यरूप साधण्याच्या पाच तऱ्हा आहेत.

१ आ आ;
२ ई ई.
३ ई आं.
४ ऊ ऊं,
५ ए आं

१ पहिला प्रकार —पुल्लिंगी आणि नपुंसकलिंगी अकारान्त नामें घेतात, उदा–पु. अकारान्त–हातास–हाताचा.

पु. आकारान्त—आंब्यास, हिरव्या आंब्यास.
न. एकारान्त—केळ्यास.
न. ईकारान्त—मोत्यास.
पु. ऊकारान्त काहीं नामें—वाटसरा–स.
न. ऊकारान्त—कोंकरास.

२ दुसरा प्रकार —इकारान्त तत्समशब्द–कवि–स, कवि–स
पु. ईकारान्त कांहीं नाम–हत्तीस.
स्त्री. अकारान्त–वेळी स, रीती स.

३ तिसरा प्रकार —स्त्रीलिंगी कांहीं नामें–घोडीस–घोड्या–स
साडी–स साड्यास

४ चौथा प्रकार—ऊकारान्त कांहीं पु. आणि स्त्री.— नामें,
खाऊ–स बाजू स

५ पांचवा प्रकार—स्त्री आकारान्त–जिभे स, जिभास.
,, ऊकारान्त—जळू स–जळवास जळवे–स.

आता ह्या पाची प्रकाराच्या प्रत्ययाचें मूळ काय असावें ? षष्ठीचे प्रत्ययच त्याना कारणीभूत असले पाहिजेत सामान्यरूप म्हणजे षष्ठीच्या प्रत्ययाचें अवशिष्ट रूप

१ हाता स ' हस्त ' हस्तस्य संस्कृत, हत्थह–प्राकृत, हातह–हातअ–हाता–एकवचन

२ अनेकवचन सामान्यरूप हस्तानाम्–संस्कृत हत्थण प्राकृत–हातण–हातअ–हाता. हाता ह्या अनेकवचनी सामान्यरूपात अनुस्वार कसा आला हें पुढें दाखविलें आहे

वरील प्रकारांपैकीं कोणतेंही सामान्यरूप घेतलें तरी त्याची हीच व्युत्पत्ति लागणार.

३ जिह्वा—जिह्वाया संस्कृत–जिब्भाए—प्राकृत जिभे–एकवचनी सामान्यरूप.

४ ,, —जिह्वानाम्–जिब्भाण–जिब्भाअ–जिभा–अनेकवचन.
जिभा मधील अनेकवचनाचा अनुस्वार ' नाम् ' च्या लोपामुळें आहे.

५ श्वश्रू–श्वश्रूणाम्–संस्कृत षष्ठी. सससूण–ससुअ–प्राकृत, सासू, सासवा.

ह्या सामान्यरूपाना—म्हणजे षष्ठीच्या अपभ्रष्ट रूपाना पुन. मराठींत षष्ठीचे प्रत्यय लागतात. सामान्यरूपाचं अग तयार करण्याच्या ह्या पाची प्रकारच्या प्रत्ययात अपभ्रंशप्राकृतचा मराठीवर पडलेला ठसा पूर्णपणें दिसतो सर्व प्राकृतभाषामध्य एक प्रवृत्तीच प्रामुख्यानें

दिसते. ती ही कीं, संस्कृत भाषेमध्यें आढळून येणारें विविधत्व–वारीक सारिक भेद नाहींसे करून भाषेंत सारखेपणा आणावयाचा. प्राकृतानीं सारखेपणा तीन गोष्टींत उत्पन्न केला आहे. संस्कृतमधील विभक्तींचें माहात्म्य व प्राचुर्य नाहींसें किंवा कमी करणें ही पहिली गोष्ट, त्याचप्रमाणें धातूंतील गणाचा व पदाचा भेद नाहींसा करून सर्व धातू एकस्वरूपी बनवणें ही दुसरी गोष्ट, व नामांतील अंत्य सर्व व्यंजनें नाहींशीं करून सर्व नामें स्वरान्त बनवणें ही तिसरी गोष्ट. अशा तीन प्रकारानीं प्राकृतानीं भाषांत एकसारखेपणा साधण्याकडे रोंख ठेवला आहे. विभक्तींचा बाजार कमी करून " षष्ठी पष्ठी " ह्या मताचा पुरस्कार प्राकृत भाषानीं धागलाच केला आहे.

संस्कृतमधील ' स्य ' व ' नाम् ' हेच प्रत्यय प्राकृत प्रत्ययाच्या मुळाशीं आहेत.

१ अस्स, इस्स, उस्स.
आह, इह, उह.

यांच्यापासूनच आस, इस, उस किंवा यास व याह अशीं रूपें होतात.
देवस्य–देवस्स–देवह–देवाह–देवा–अशी परंपरा आहे.
देवाना–देवण–देवअ–देवां–ही अनेकवचनी सामान्यरूपाची परंपरा आहे

सामान्यरूपाच्या अनेकवचनांत अनुस्वार कसा आला ह्याची उपपत्ति वर दिलेल्या उदाहरणावरून कळून येईलच. नाम्–ण–अ–ं अशी अनुस्वाराची परंपरा आहे ' णाम् ' किंवा ' नाम् ' ह्या अनुनासिक प्रत्ययाच्या लोपाचा ध्वनि किंवा अवशेष मराठींतील अनेकवचनी सामान्यरूपावर उठला आहे संस्कृतमधील प्रत्ययांतील ' म् ' चा प्राकृतमध्यें व मराठींत लोप होतो, व लोप होताना तो आपली खूण मागें ठेवतो ह्याचीं उदाहरणें क्रियापदाच्या प्रत्ययांतही पुढें येणार आहेत ह्याच अनुस्वाराच्या उपपत्तीस दुसरी एक बाजू आहे व ती राजवाडे यानीं आपल्या ज्ञानेश्वरीच्या व्याकरणांत पुढें मांडली आहे. ते म्हणतात —" षष्ठी विभक्तींत अनुस्वार आहे म्हणून अनुस्वार चिन्ह आहे असें म्हणावें लागतें हा अनुनासिक कोठून आला ? अपभ्रंश व महाराष्ट्री ह्यांपासून हा अनुस्वार

मराठीनें उचलला हें म्हणणें ठीक नाहीं. कारण अपभ्रंशांत अनुस्वार तृतीया, षष्ठी, सप्तमी, संबोधन ह्या विभक्तींतच तेवढा आहे. चतुर्थी अगदींच उपलब्ध नाहीं. द्वितीया व पंचमी ह्या दोहोंत अनुस्वार नाहीं. महाराष्ट्रींत तृतीया, षष्ठी व सप्तमी ह्याच फक्त विभक्ति सानुनासिक आहेत. चतुर्थी उपलब्ध नाहीं. पंचमींत व संबोधनांत अनुस्वार नाहीं. तेव्हा मराठींत सरसहा अनुस्वार ह्या भाषांपासून आला नाहीं, प्राकृतेतर भाषेपासून आला असावा. पल्हवी व जुनें फारसी ह्या भाषांत आन् प्रत्यय लागून अनेकवचन होतें. उदाहरणार्थ मलिक मलिकान्. संस्कृतमध्यें 'आन्' द्वितीयेच्या अनेकवचनाचा प्रत्यय आहे. 'आम्' प्रत्यय षष्ठीच्या अनेकवचनाचा आहे. मराठींतील अनुस्वाराची परंपरा अशीच असली पाहिजे."

आमच्या मताप्रमाणें आम्ही अनुस्वाराची उपपत्ति संस्कृत 'नाम्' पासून लावतों. प्राकृतमधील इतर निरनुनासिक विभक्तींकडे पहाण्याचें प्रयोजनच काय? षष्ठींत अनुनासिक आहे कीं नाहीं हेंच फक्त आम्ही पाहणार व अनेकवचनी सामान्यरूपाच्या मुळाशीं षष्ठीचा 'नाम्,' 'आम्' किंवा 'साम्' हेच प्रत्यय आहेत. फारशीसारख्या किंवा पल्हवीसारख्या भाषांपासून येणें शक्य नाहीं.

एकच शब्द 'घर' तिन्ही भाषांत घालविला म्हणजे त्याच्या स्वरूपांत कसा फरक पडत गेला हें समजून येईल.

| | संस्कृत | प्राकृत महाराष्ट्री | अपभ्रंश प्राकृत | मराठी |
|---|---|---|---|---|
| प्रथमा | गृहम् | घरम् | घरू | घर |
| चतुर्थी | गृहाय | घरस्स | घराहोस्स | घरास |
| सप्तमी | गृहे | घरम्मि | घरहिं | घरीं |
| षष्ठी किंवा सामान्यरूप | गृहस्य | घरस्स | घरस्स | घरा |

२ सर्वनामें—

सर्वनामांत फारसा फरक नाहीं. पुरुषवाचक, संबंधी, दर्शक, प्रश्नार्थक इत्यादि प्रकार आहेत.

| | एक. | अनेक. | एक. | अनेक. |
|---|---|---|---|---|
| प्रथमा— | मी, | आम्ही | तू, | तुम्ही. |

| | एक. | अनेक. | एक. | अनेक. |
|---|---|---|---|---|
| द्वि. च.— | मला, | आम्हास—ला, | तुला, तुजला, | तुम्हास. तुम्हाला. |
| षष्ठी— | मज, माझा, | आमचा. | तुझा, तुज, | तुमचा. |
| सप्तमी— | माझ्यांत, | आमच्यांत. | तुझ्यांत, | तुमच्यांत. |

ह्याचप्रमाणें तृतीयपुरुषी सर्वनामें.

ह्यामध्ये 'मी' हें प्रथमपुरुष अपभ्रंश प्राकृतातील प्रथम पुरुषी सर्वनामाच्या द्वितीया, तृतीया किंवा पंचमीच्या रूपांवरून आले असावें. तीं रूपें अनुक्रमें मइ, मया, मयि अशीं होतात. म्या ( तृतीया ) हें ह्यावरूनच आलें आहे.

आम्ही—( अपभ्रंश प्राकृत ) अह्मइ—' अस्मके ' संस्कृतपासून

तू— ( अपभ्रंश प्राकृत )तुहु—हूं—त्वंपासून.

तुम्ही—( अपभ्रंश प्राकृत ) तुह्मइं—

जो तो—जुन्या सर्वनामापासून. अग ' ज ' संस्कृत यत्पासून.

हा— १ ( अपभ्रंश ) एहो—एषः—संस्कृतपासून.

२ ( प्राकृत ) आयें—अयम्—संस्कृतपासून.

कोण—( प्राकृत ) कउण—' कः पुनः—' संस्कृतपासून.

३ विशेषण—मराठींत संस्कृतप्रमाणें विशेषणास विभक्तींचे प्रत्यय लागत नाहींत. सामान्यरूप फक्त कांहींच्या बाबतींत सेवदे होतें. इंग्लिशसारखे तुलना, उच्चनीच भाव, तर, तम किंवा अधिक, कमी ह्यासारख्या शब्दांनीं दाखवितात. संख्याविशेषणें व त्याचे आवृत्तिदर्शक क्रमदर्शक इत्यादि सर्व प्रकार संस्कृतपासूनच घेतले आहेत. एक्को ( अर्धमागधी ) दोन्नि, तिण्णि —अर्धमागधी पासून मराठी एक, दोन, तीन, हे शब्द आले आहेत

क्रियापद विचार—

मराठींतील बहुतेक धातु संस्कृतमधील धातूपासून आले आहेत, व ते मराठींत येतांना कांहीं थोडेसे फरक झाले आहेत कांहीं धातूमधील एकादाच वर्ण बदललेला आहे; तर कांहींमध्यें संस्कृत गणाची खूण सामील करून घेतली आहे. सर्वांच्या शेवटीं ' णें ' हा क्रियादर्शक प्रत्यय लावला आहे. हो विषयीं 'अनीय' पासून घेतला आहे. उदाह-चल ह्या संस्कृत धातूपासून

चालणें, चाळणें, चलणें, चळणें, चालवणें चाळवणें, इत्यादि धातु झाले आहेत. भिणें, सिजणें ( स्विद्य ), निपजणें ( निष्पद्य ), नाचणें ( नृत्य ), माजणें ( माद्य ), सुनणें ( श्रुणु ), विनणें ( विनु ), जाणणें ( जाना ), न्हाणें ( स्ना ), जाणें ( या ) इत्यादि धातु संस्कृतमधील आपल्या गणांच्या खुणेसह मराठींत उतरले आहेत. प्राकृतभाषामध्यें संस्कृतचे दहा गण कायम न राहतां दोनच गण पहिला व सहावा असे कायम राहिले. दुसरे आणखी साधितधातूही पुष्कळ आहेत. त्यांचे—नामधातु, द्विधातुसयोग, संयुक्तधातु असे तीन प्रकार आहेत. परस्मैपद व आत्मनेपद यांचीं चिन्हें प्राकृतमध्ये नाहींत. मराठींत कोठें कोठें ह्या दोन्ही पदांचीं चिन्हें डोकें वर काढतातशीं दिसतात तें प्रत्ययाच्या ठिकाणीं दाखवूं.

संस्कृतमधील सर्व काळ व अर्थांपैकीं वर्तमान व भविष्य हे दोन काळ व आज्ञार्थ हे तीन फक्त प्राकृतनीं कायम राखले. ह्या तिन्हींपैकीं मराठीनें फक्त दोनच—वर्तमान व आज्ञार्थ—हेच उचलले. भविष्य निराळा न घेतां वर्तमानकाळांतच सामील केला. वर्तमानकाळाचा कधीं कधीं अगदीं जवळचा निकटचा भविष्यकाळ दाखविण्याकडे उपयोग करतात. ह्या तत्त्वानें वर्तमानकाळाच्या साहाय्यानेंच भविष्यकाळाची कल्पना देतां येऊं लागली व त्यामुळें मूळचा भविष्य निरर्थक ठरून नाहींसा झाला.

१ मराठींत वर्तमानकाळाचीं रूपें खालीलप्रमाणें होतात. तुलनेसाठीं अपभ्रंशमधील वर्तमानाचीं रूपें देतों:—

| | ए. | अने. | ए. | | अने. | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | करीं, | करूं; | हसें, | हसू, | हसउ, | हसहु; ( हसणें ); |
| २ | करीस, | करा; | हसस, | हसा, | हसहिं ( सि )! | हसहु; |
| ३ | करी, | करीत; | हसे, | हसत, | हसइ, | हसहिं; ( हसन्ति ); |

प्रत्यय खालीलप्रमाणें आहेत— अपभ्रंश प्रत्यय.

| | ए. | अने. | ए. | अने. | ए. | अने. |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | इ, | ऊ; | ए, | ऊ; | अमि, अउं, | अहुं, |
| २ | स, | अ; | स, | अ; | आसि, आहि, | अह; |
| ३ | इ, | त; | ए, | त; | अइ, | अहिं; |

त्यांची उत्पत्ति—हे जे दोन प्रकारचे प्रत्यय आहेत त्यांपैकीं पहिले परस्मैपदी सकर्मक धातूंना लागतात. दुसरे आत्मनेपदी अकर्मक धातूंना लागतात.

एकवचन
- ईं—मि पासून. म् चा अनुस्वार झाला.
- स—सि पासून.
- इ—ति पासून.
- ए—हूसे मधील. हा आत्मनेपदी 'ए' च प्रत्यय आहे.

अनेकवचन
- ऊं–आमः–संस्कृत; आमो प्राकृत. हुमु अहुं अपभ्रंश पासून
- अ–अय— ,, अह— ,, अह अहु ,, ,,
- अत अन्ति ,, अन्ति ,, अन्ति अहिं ,, ,,

हा जरी वर्तमानकाळ आहे तरी प्रचलित मराठींत ह्याचा उपयोग रीतीभूतकाळासारखा करतात. वर्तमानकाळानें वर सांगितल्याप्रमाणें जसा भविष्यकाळ नाहींसा केला, तसेंच ह्या वर्तमानकाळाचें वर्तमानत्व नाहींसें झालें. वर्तमानकाळ ज्याप्रमाणें निकटचा भविष्य दाखवितो तसाच तो निकटचा भूतकाळही पण दाखवितो. ऐतिहासिक पुराण्यापुराण्या गोष्टी सांगतांना भूतकाळच्या क्रियेसाठीं वर्तमानकाळ योजला तर चालतो. ह्यामुळेंच ह्या वर्तमानकाळास रीतीभूतकाळाचा अर्थ प्राप्त झाला व खरा वर्तमानकाळ त्या क्रियापदाच्या धातुसाधितापासून तयार करावा लागला. मराठींतील इतर काळ धातुसाधितांपासून व साहाय्यकारी क्रियापदें योजून साधतात.

२ वर्तमानकाळ—धातुसाधितापासून. कर धातु; करत् धातुसाधित.

| | |
|---|---|
| १ करतों | करतों |
| २ करतोस | करता |
| ३ करतो | करतात, करत्यात. |

करत् ह्या धातुसाधितापुढें तृतीय पुरुषाचीं सर्वनामें प्रत्यय म्हणून लावावयाचीं. करत् हें धातुसाधित विशेषण असल्यामुळें नामाप्रमाणें लिंग-वचनांत चाललें पाहिजे.

३ आशार्थ—१ करूं करूं–रों
२ कर–रीं करा
३ करा करोत

प्रत्ययोत्पत्ति—

एकवचन
१ उं=संस्कृत आमि. प्राकृत मु–अउं–अपभ्रंश अनुस्वार मलोपामुळें आला आहे.
२ प्रत्यय नाहीं किंवा अ, इ. } संस्कृत—हि; प्राकृत इ–अहि–असु अपभ्रंश ' अ ' सुद्धां अपभ्रंश 'इ' पासून
३ ए—ओ चा संक्षेप.

अनेकवचन
१ ऊ, ओ–आम–संस्कृत–अमु, अहु–अपभ्रंश
२ अ— त ,, अ अथवा इ–अपभ्रं.
३ ओत, उत–अन्तु ,, अतु ,,

अपभ्रंशांत दोन तऱ्हेचीं आज्ञार्थाचीं रूपें सांपडतात. एक ' इ ' प्रत्ययाचीं. उदाहरणार्थ ' करि, कहि, सुमरि, व दुसरीं ' उ ' प्रत्ययाचीं. ' देसु, संधु, करहु ' इ. ह्याच अर्थाचा जुन्या मराठींत, व काव्यांत एक प्रयोग सांपडतो. उदाह मोगिजे, प्रविष्ट किजे, दिजे, आतां देईजो अवधान इत्यादि. ह्यांतील ' जे ' प्रत्यय प्राकृत ' इज्ज ' प्रत्ययापासून व तोही विध्यर्थी ' या ' पासून किंवा आशीर्लिंगाच्या प्रत्ययापासून असावा.

४ भविष्य—मूळच्या भविष्याला जुन्या वर्तमानानें कसा अर्धचंद्र दिला हें आपण पाहिलें व तो नाहींसा झाला म्हणून मराठी भविष्यकाळाची क्रिया दाखविण्यासाठीं दुसऱ्या मार्गाचा अवलंब करावा लागला. भविष्य तयार करतांना धातूचे दोन भाग पडतात. एका मार्गांतील धातु व्यञ्जनादि प्रत्ययापूर्वी ' इ ' आगम घेतात उदाह–करील, करीन इत्यादि इ. व दुसऱ्या मार्गांतील धातु ' ए ' किंवा ' अ ' हा आगम घेतात. उदाह. शिकेल, धांवेल, शिकल, धावल इत्यादि. ह्याच ' इ ' ला व ' ए ' ला अनुक्रमें परस्मैपद व आत्मनेपद ह्याच्या खुणा कांहीं लोक समजतात.

धातूचा जुना वर्तमान किंवा सध्याच्या दृष्टीनें रीतीभूत तयार करावयाचा व त्याला ' इल ' किंवा ' ल ' हे प्रत्यय लावायचे म्हणजे मराठीत भविष्य तयार होतो. मागें द्वितीयेचीं रूपें स्पष्ट करताना सांगितलेंच आहे कीं, ' ल ' चा कधीं कधीं ' न ' होतो.

पहिला प्रकार—ह्यामध्यें ' इ ' येते.

| | ए. | अ. |
|---|---|---|
| | करीं+ल १ करीन | करू |
| अनुस्वार+ल=न. | | |
| | २ करशील, | कराल |
| | ३ करील | करतील |

दुसरा प्रकार. ह्यामध्यें ' ए ' येतो.

| | एकव. | अनेकव. |
|---|---|---|
| १ | धांवेन | धांवू |
| २ | धांवशील | धांवाल |
| ३ | धांवेल | धांवतील |

ह्यावरून खालीलप्रमाणें भविष्याचे प्रत्यय ठरतात.

| | एकव. | अनेकव. |
|---|---|---|
| १ | एन | ऊं |
| २ | असील | आल |
| ३ | एल | अतील |

धर्शील ( करशील ) ह्यामधील ' स ' पाहिला म्हणजे संस्कृतमधील द्वितीय भविष्यावरून हा काळ आला आहे कीं काय असा संशय येतो. परंतु इतर कोणत्याच रूपामध्ये तो दिसून येत नाहीं. त्या योगानें संशयाचें निराकरणही होतें. ' स ' द्वितीय पुरुषाचा आहे. वर्तमानकाळात असाच ' स ' येतो. गुजराथीमध्ये मात्र हा ' स्य–चिन्हाचा ' भविष्यकाळ आला आहे. तो ' आपीश, आवीश, करीश, करीशु, करशे ' वगैरे रूपांवरून प्रतीत होतो. मराठींत ती पद्धत उतरली नाहीं. जुन्या वर्तमानाप्रमाणेच सर्व प्रत्यय लागतात. त्या प्रत्ययांपैकीं ' ल ' शिवाय बाकीच्या अव-

यवांची उपपत्ति लावलीच आहे. ' ल ' प्रत्यय स्वार्थेच असावा. मुळात त्याचा काहीं अर्थ नसावा. पुढें जुनीं रूपें जसजशीं नाहींशीं झालीं तसा ' ल ' चा अर्थ स्पष्ट करण्यांत आला. भविष्यकाळांत ' ल ' लावण्याची पद्धत बिहारी व राजस्थानी ह्या दोन भाषांत आहे.

५ भूतकाळ—संस्कृतमधील तिन्ही भूतकाळांपैकीं मराठींत एकही आला नाहीं. खुद्द संस्कृतमध्येंच क्रियापदाच्या भूतकाळाच्या रूपापेक्षां भूतभूतकालवाचक धातुसाधितविशेषणावर काम भागवून घेण्याची प्रवृत्ति पुढें पुढें प्रचलित होऊं लागली. मराठीनें तीच प्रवृत्ति पुढें चालविली. भूतकाळ भूतकाळवाचकधातुसाधितानेंच दाखवू लागले. हीं सर्व धातुसाधितें विशेषणें असल्यामुळें कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणे त्याचें लिंगवचन बदलूं लागलें. अकर्मक क्रियापदाच्या भूतकाळाशीं फारशी अडचण नाहीं. कारण तेथें कर्त्याप्रमाणें विशेषण चालणार. पण धातुसाधितांत कर्मणि अर्थ असल्यामुळें सकर्मक धातुसाधितें कर्त्याप्रमाणें न चालतां कर्माप्रमाणें चालली पाहिजेत. त्यामुळें मराठींत कर्तरि प्रयोगाशिवाय दुसरा एक कर्मणि प्रयोग आला आहे. त्यांत कर्ता तृतीयान्त असतो. आणखी एक मराठी भूतकाळाचा विशेष आहे. तो त्यांत दिसणारा ' ल ' होय. ह्या ' ल ' ची उपपत्ति काय ? संस्कृतमधील धातुसाधित आलें तर त्याबरोबर येणाऱ्या ' त ' चें अपभ्रष्ट रूप ' ल ' झालें कीं काय ? महाराष्ट्री व अपभ्रंश प्राकृतांतीलही सर्व धातुसाधितें ' त '-कारान्त नाहींत. महाराष्ट्रींत ' कअ, गअ ' अशीं ' अ '—कारान्त सांपडतात. अपभ्रंशांत "कय, गय, घडिअ, चडिय सुत्त, जाणिय" अशीं सांपडतात. ह्यांपैकीं कोणत्याही अन्त्य वर्णांत ' ल ' उत्पन्न करण्याची पात्रता नाहीं. शौरसेनी प्राकृतांत संस्कृतमधील ' त '—कारान्त धातुसाधित ' द '—कारान्त होतें. ' द ' चा ' ड ' होणें व तदनतर ' ड ' बद्दल ' र ' किंवा ' ल ' येणें साहजिक आहे, हें म्हणणें पटतें. पण ह्या मार्गानें जर मराठी भूतकाळाचा ' ल ' शौरसेनीपासून आला आहे असें म्हणावें तर ह्याच बाबतींत तेवढा शौरसेनी भाषेस मराठीचा कळवळा कसा आला ? आपल्या बहिणीच्या मुलीचा एळा येऊन तेवढेंच बाळलेणें तिनें मराठीवर कसें घातलें ? मराठीनें तरी आपल्या

मातृभगिनीचें नातें दाखविण्यासाठीं दुसऱ्या इतर प्रत्ययाचा स्वीकार कसा केला नाहीं ? तेव्हा मराठी ' ल ' ची शौरसेनी ' द ' पासून उपपत्ति पटत नाहीं. वर दिलेल्या भविष्य काळाचा ' ल ' जसा पुष्कळ दिवस ' स्वार्थे ' प्रत्यय होता तसा हाही भूतकाळाचा ' ल ' मूळ स्वार्थे प्रत्यय म्हणूनच धातुसाधिताना लावला असावा व पुढें कालान्तरानें त्याला भूतकाळाचें चिन्ह मानू लागले. अशी स्वार्थे ' ल ' लावण्याची प्रवृत्ति संस्कृत व अपभ्रंशात होती व तीच मराठीनें उचलली. संस्कृत मध्यें ' वत्स-ल, मास-ल, पांशु-ल, फेनि-ल, कृष्ण-ल हे शब्द आहेत. अपभ्रंशात एकल्ल, नवल्ल, उपरिल्ल, अपुल्ल हे शब्द स्वार्थे ' ल ' चीं उदाहरणें आहेत. जुन्या मराठींतील व काव्यातील भूतकाळाच्या रूपाकडे पाहिले तर ' ल ' चा स्वार्थेपणा विशेष नजरेस येतो. मागें दिलेल्या पाटणच्या लेखात ' मढा दिन्हला ' असा प्रयोग आहे. ' दिन्ह ' हें धातुसाधित आहे व त्याला ' ल ' प्रत्यय लावला आहे, घुत ला, मिन ले, वाढिन्न–ले, धानिन्न–ले, हासिन्न–ला गुत–ला, येई–ला–ह्या उदाहरणातील पहिले भाग भूतकालवाचक धातुसाधितें आहेत व त्यानाच ' ल ' प्रत्यय ' निरर्थक ' लावला आहे. संस्कृत ' त ' पासून प्रास झाला नाहीं. दोनदा त किंवा त ( ल ) असे प्रत्यय लावण्याची काय जरुरी होती ! कालातरानें ' ल ' चें ' निरर्थकत्व ' जाऊन त्याला भूतकाळ दाखविण्याचें स्वातंत्र्य प्राप्त झालें. पुढें एकदा ' ल ' भूतकाळाचा प्रत्यय ठरल्यानंतर धातूचा भूतभूतकाळ साधण्यासाठीं मराठींत दोन ' ल ' लावू लागले. गेलेला, झालेले, शिकलेला इ भूतकाळाचीं रूपें देतों ह्या ' ल ' चें पूर्व स्वरूप प्राकृतमध्यें ' इल्ल ' ह्या शब्दात दिसतें महाराष्ट्री मागधी, अर्धमागधीमध्यें 'इल' सापडतें अपभ्रंशातील उदाहरणें वर दिलीं आहेतच.

१ गेलों–स्यें–लें गेलों.
२ गेलास–लीस–लेंस गेलात.
३ गेला–ली–लें गेले–ल्या–लीं.

६ विध्यर्थ—मराठींत विध्यर्थ दोन रुपानें दिसतो. एक ' करावें बोलावें, जावें ' अशा रुपानें नव्या मराठींत येतो व दुसरा दिजे, देइंजे, जाइंजे, जाणिजे अशा रूपानें जुन्या मराठींत येतो. " तूं काम करावें हें चांगलें व

दे काम करणें चांगलें " हीं दोन्हीं वाक्यें समानार्थीच आहेत. पैकीं करणें हा शब्द 'करणीयम्' ह्या विध्यर्थी धातुसाधितापासून आला आहे. त्याचप्रमाणें 'करावें' हें सुद्धां 'कार्य किंवा कर्तव्य' ह्या विध्यर्थी धातुसाधितापासून असावें. ह्या दोन्हीं रूपांचे दुवे सांधणारीं अपभ्रंशमधील रूपें सांपडतात करिव्वऊ, बोल्लिव्वऊ, जाइव्वऊ अशीं पहिलीं व दिज्जहि, जाइज्जहि, जाणिज्जहि अशीं दुसरीं रूपें सांपडतात वऱ्हाडी मराठींत 'करजो, जाजो' अशीं ह्या अर्थाचींच रूपें सांपडतात गुजराथी भाषेंत लेजो, जाजो, करजो अशीं रूपें सांपडतात. ह्या धातुसाधितांत कधीं भविष्यकाळ दाखविण्याची पात्रता असते—उदाहर—चलावें.

मराठींतील बाकी राहिलेले सर्व काळ व अर्थ धातुसाधितें व साहाय्यकारी क्रियापदें ह्यांच्या मदतीनें तयार होतात. साहाय्यकारी क्रियापदें "आहे, नाहीं, नव्हे, होय, पाहिजे" इत्यादि आहेत. क्रियापदाचें प्रयोजक रूप व त्याचा प्रत्यय 'अव' संस्कृतच्या 'अय' पासून आला आहे. कांहीं वेळेस 'आव' प्रत्यय दिसतो तो संस्कृत 'काम्य' पासून आला आहे. उ० धमकावणें, विचकावणें, भेडसावणें. 'संकेतार्थ' संस्कृतमधील वर्तमानकालवाचक धातुसाधितावरून बनवतात. अपभ्रंशांत व महाराष्ट्रींत तीच तऱ्हा आहे.

'करून, बोलून, चालून' इत्यादि मराठींतील 'ऊन' प्रत्ययान्त धातुसाधितें आहेत. ह्यानाच पूर्वकाळवाचक धातुसाधितें म्हणतात ह्यांची उपपत्ति लौकिक संस्कृतमध्यें जो 'त्वा' प्रत्यय आहे त्यापासून लावतात. वैदिक संस्कृतमध्यें 'त्वान, त्वीन, त्वा' असे त्याच अर्थाचे प्रत्यय आहेत. महाराष्ट्रीमध्यें 'ऊण' प्रत्यय आहे, व हाच प्रत्यय मराठींत बरोबर उतरला असावा किंवा अपभ्रंश मधील 'एविणु' हा उतरला असावा. गुजराथींत 'न' प्रत्यय आहे उदाह—करीने, बोलीन, लईन, सईने इत्यादि.

वर्तमानकालवाचक धातुसाधितें "करीत, धावत, चढत, चढता, चढताना, बोलत, बोलता, बोलताना" इत्यादि इत्यादि हीं संस्कृत मधील अत् व मान किंवा आन ह्या दोहीं प्रत्ययांपासून आलीं आहेत.

संस्कृतमधील तुमन्त प्रमुख हेंही मराठींत उतरलें आहे. करू, चालू, चालूं अशीं रूपें होतात. त्याचा माग प्राकृत— करीउम्, चलिउम्, व संस्कृत कर्तुम्, चलितुम् ह्या रूपामध्यें आहे.

प्रयोग कर्तरि, कर्मणि, भावे, भावकर्तरि, कर्मकर्तरि इत्यादि, आहेत. कर्तरि हा प्रयोग जुनाच आहे. कर्मणि प्रयोगाची उत्पत्ति भूतकाळाच्या ' ल ' वरोवर सांगितलीच आहे. ' भावे ' हें नांव विनाकारण दिलें आहे. क्रियेच्या भावाचा कांहींही संबंध येत नाहीं. भावकर्तरि हें नांव क्रियापदाच्या अर्थावरून ठरविलें आहे. हा प्रयोग कांहीं विशेष क्रियापदांचीच होतो. कर्मकर्तरि म्हणून एक निराळाच प्रकार केला आहे. संस्कृतमध्यें ह्याला कर्मणिप्रयोगच म्हणतात. व त्याचा प्रत्यय ' य ' आहे. कधीं कधीं मराठींत '' य ' प्रत्यय येतो. जुन्या मराठींत कलिपजे, गिळीजे, छेदिजे, लाजिजे, रुसिजे अशीं रूपें सांपडतात. ह्यामधील ' ज ' प्रत्यय संस्कृत ' य ' पासूनच आला आहे. ' येवे, म्हणिवे, ' अशींही रूपें येतात, संस्कृतमध्यें ' य ' हा प्रत्यय, प्राकृतमध्यें ' इज, इज्ज ' हे प्रत्यय आहेत. उदा:—कलिपज्जइ, गिलिज्जइ, छिज्जीइ, लज्जिज्जइ, रुसिज्जइ, इत्यादि. संस्कृतमधील ' य ' या=जाणे ह्या धातूचा संक्षेप असावा वर्तमान मराठींत ' जा ' ( पूर्वरूप संस्कृत या ) धातूचा उपयोग करून कर्मकर्तरि प्रयोग साधतात. ही पद्धत अपभ्रंशांतही चालू होती. उदाहरणार्थ ' त अक्खणइ न जाइ—' ' तें सांगण्यांत येत नाहीं. ' ( हेमचंद्र ) ह्या वाक्यांत ' जा ' ह्या धातूचा उपयोग केलेला दिसतो. प्राकृतमधील ' इज ' प्रत्यय पंजाबी आणि सिंधि ह्या दोन भाषामध्यें उतरले आहेत. उदा—'' मारीए, मारीअव, ''

७ अव्ययें—ज्या अव्ययाची व्युत्पत्ति अगदीं उघड आहे अशीं अव्यये विचारांत घेतलीं नाहींत.

क्रियाविशेषण—कालवाचक, स्थलवाचक, रीतीवाचक असे प्रकार आहेत तृतीया व सप्तमी विभक्त्यन्त नामाचा क्रियाविशेषणाप्रमाणें अर्थ होतो होय, नाहीं ह्या क्रियापदाचाही क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग होतो

की — म्हणून एक अव्यय आहे. खालच्या गांवढळ लोकांच्या

बोलण्यांत येतें; त्याची उत्पत्ति संस्कृतमधील ' जीव ' ह्या शब्दापासून आहे. जीव=आत्मा.

काल—कल्यपासून, आज-अद्य, तेथें-तत्र, इत्यादि.

ही—संस्कृत एव पासून; प्राकृत वेअ किंवा विअ.

वि—अपि-पि संस्कृत.

उभयान्वयी—वरका, कि—यकि ( फारशी ); पण-प्राकृत पुणु-पुनः संस्कृत.

अरें—वरम् ( स ); तर-तर्हि, जर-यदि-जइ प्राकृत. जै-(जुनें मराठी )

मन, मन्या-" चला कीं मन " संस्कृत मन् धातूपासून.

उद्गारवाचक—हायहाय-हा हा बापरे बप्परे इत्यादि.

# वर्णप्रक्रिया परिशिष्ट.

## ( १ ) स्वरप्रक्रिया.

' उदाहरणें अनुक्रमें आद्य, मध्य, अन्त्य अशीं दिलीं आहेत.' फरक जाड टाईपांत दाखविले आहेत.

मराठी अ, संस्कृत अ पासून. अन्तर्कल्प–अटकळ, अध्यास–अघास.
उपयम–उजव, उत्पथ–उपट; अंकन-
ऑंगण. अभिलग–दिलग.

,, ,, ,, आ ,, गाढ-गढणें; आपाद-हृदड; उपघा-ओढ.

,, ,, ,, इ ,, यातिं-यादि-याद.

,, ,, ,, उ ,, आकुल–आकळ, आघूर्ण–आपळ,
अध्यूष्ण-अघण.

,, ,, ,, ऋ ,, कृप-कप, आकृष्टि-आकाढि.

,, ,, ,, ओ ,, काकोल-कावळा, खद्योत-काजवा.

मराठी आ संस्कृत अ ,, अक-आखणें. अर्धमुग्ध-आडमुठ.
उत्तासिल–उतावळा.

,, ,, ,, अं ,, आक्रन्द–आकांत, अमरघ-इंघारा,
अन्तभ्रष्ट–मातबद्दा.

,, ,, ,, आ ,, आसिका–आल्या, आसादय–हासड,
ऋजियान–उजवा

,, ,, ,, ऋ ,, मृप-माप, आहृर-आहार.

,, इ ,, इ ,, स्तिमित चिप, पिपापिस-हिसपिस.

,, ,, ,, उ ,, उत्कुटुक-उकिडवा.

,, ,, ,, ऋ ,, कृमिज-किरमिजी. कृपा-किणव.
घृत–चिरड..

,, ,, ,, ए ,, सेक-शिरक, इलप्रेल–इलेपिले.

,, ,, ,, यि, वि ,, आव्हायिका-आवाई, विलप-इलव-इवळणें.

मराठी ई संस्कृत ए पासून अवेय-अवीट.
,, ,, ,, य ,, अयन्यर्ध-आडनीड.
,, उ ,, उ ,, उदन उदणें, उत्कु-उचक, उदस्त-उलथा, ऋजु-उजु.
,, ,, ,, अ ,, म्हल म्हाल-उमाळा, चाक्मर्य चुकार, व्हलव्हल-हुळहुळ
,, ,, ,, ऋ ,, ऋजु-उजु, कृतुद-कुरतुड.
,, ,, ,, ओ ,, ओप-होक-हुक.
,, ,, ,, अव ,, अवरसद-उपाड, अवगम-उगम.
,, ,, ,, जु ,, जुष्ट-युष्ट-उष्टें.
,, ए ,, अ ,, अक्षर-अखेरी.
,, ,, ,, इ ,, घिण-घेणें, जिरि जेरी, मिंद-मेंदा.
,, ,, ,, ऋ ,, कृपण कृपिल-केविल.
,, ओ ,, अ ,, अन्वक्ष-नोरा, अंजन-ओंगण, मरस्व-मोसड.
,, ,, ,, [illegible] ,, उपघात-ओदव, उद्गारिका-ओकारी, उत्सग-ओसग.
,, ,, ,, ओ ,, ओस्य-ओकें, प्रोच्छ पोंच.
,, ,, ,, औ ,, शौट सोट, यौट जोड.
,, ,, ,, अव ,, अवनम ओणव, अवघर-ओघळ, आरावली-आरोळी.

## ( २ ) व्यंजनप्रक्रिया.

मराठी क संस्कृत क पासून कच-कचर, कल्य काल,
,, ,, ,, ख ,, खद्योत काजवा, ओख्य ओकें, ओप-होक-हुक.
,, ,, ,, ग ,, उद्गारिका-ओकारि. अतिगमय-अइकम-ऐक, स्यग-ठक, भग-सरक.

मराठी क संस्कृत घ पासून शिंघा-शिंक.
" " " घ " सघ्वंध-घटक, शुच्छ-शुक.
" " " प " ओपट-भेकट, शप-साक, चप-चक.
" " " क्ष " क्षिप-किच, संतक्ष-सटकणें-सटकणें.
" " " ह " टह्-डुक.

मराठी ख संस्कृत क पासून अंक=आंखणें, कृष्ट-खरड, कील-खिळणें, कुर्द-खुर्दा.
" " " घ " घृप-खुप. जघट-जखड.
" " " क्ष " क्षंप-खप, क्ष्वेल, खवडा, निरीक्ष-निरख अन्वेक्ष ओरख.
" " " प " कृपकृप-खरखरर, जोप-जोख, पुप-पुरुखा मृप-मारख.
" " " स्क " स्कंभ-खब, स्फुर-खुड, उत्स्कर-उखाड.

मराठी ग संस्कृत क पासून काकदकाय-गागर-गांगर, काकाशिका-अगाशी, तक-तग. हिक्क-हिंडगा.
" " " ग " गुर्द-गुदर. गुडधि-गुडधि, अवगूर्य-उगारणें, उग-उगा, अभिलग-हिलग.
" " " ङ " ङोहूर्य-गोंगाळ, ( गगावति-ज्ञानेश्वरी ).
" " " घ " संघात-सांगड, मंघ-महग-महाग.
" " " ज " अंजन-आंगण, भव्ज-भग, भाज-माग.
" " " ह " जोहुया-जोगवा. दिह्-दीग.

मराठी घ संस्कृत घ पासून घोघूय-घोगाव, घटा-घड, अवघट-अवघड अवघर-ओघळ.
" " " ग " गाहित्वा-घालून ग्रस-घसर.गद्गद-घडघड. आगल्भ-प्रगल्भ=आघळपघळ.
" " " ख्य " संख्यान सांघणें, वल्क-वल्ख-वघणें. अथवा
ख्य प्रख्यान पाघणें.

मराठी च संस्कृत च पासून घति-चपाटि, घृत-घिरड, अच्यव-आचव उदंच-उढच.

,, ,, ,, [illegible] ,, छुरः-चुरा. छर्दन-चढणें, पिच्छ-पिच, छेदन, घेचणें,

,, ,, ,, ज ,, जोल्य-चोळ, जोध-चोज, तर्ज-टोंच, क्षज-टाच

,, ,, ,, त ,, त्यत्-च, तत्रत्यः-तेथचा, उत्कट-उचकट

,, ,, ,, त्स ,, अगत्सर अगचोर, उत्स्कु-उचक. उत्संप्लव उचंबळ.

,, ,, ,, स्त ,, स्तिमित चिंब.

,, ,, ,, य ,, युक्त चुक, दप्य-डच. व्यय-वेच.

,, ,, ,, श ,, श्विद-चिंब, स्पश-चापच.

,, ,, ,, प ,, पृपत्-पृपत पचपचित, व्युप-वोच.

,, ,, ,, स ,, सिट-चिड. स्पश चापस, मस्क मचक-चमक, स्यम चिव.

मराठी छ संस्कृत छ पासून छृद-छद, छुप छुप्यो ( पाणी ).

,, ,, ,, घ , घट्-घटुः-छाछु.

,, ,, ,, श ,, श्राण जाणणें.

मराठी ज संस्कृत ज पासून ज्वालय-जाळ, जेमनी-जेवण, जोहुक्क-झोंड., ऋज-रुज.

,, ,, ,, त ,, अलगत-अलगज.

,, ,, ,, ध्य ,, कुध्य कुज.

,, ,, ,, ध ,, गध गाझ गाज.

,, ,, ,, द्य ,, द्योतिःजोत, माद्य-माज, खद्योत-काजवा.

,, ,, ,, य ,, यौट-जोड.उपयम-उजव. वायय-वाजव.

,, ,, ,, झ ,, झप-जप.

,, ,, ,, य ,, अमियम-मिजव.

मराठी झ संस्कृत च पासून ऋच-रिझ.

,, ,, ,, झ्र ,, झ्रष्ट—झाड.

,, ,, ,, ज ,, जुष झोंक, जभ-झोंप.

,, ,, ,, झ ,, झप झाक, झलाप-झाळ.

,, ,, ,, ध ,, धष घोका-झोका, अयुद्वार-झुगार.

,, ,, ,, स ,, सारय, झाड, स्तंभ-झडप, सुक-सुक-झुरका- झुळुक, सगः—झगा.

,, ,, य सं ,, संरभ-झळम. संलक्ष्य-झळक. संपाट झपाटा.

मराठी ट संस्कृत ट पासून टौक-टाऊक, अपटयल-अवटळ, गुष्ट-उष्टें, कट काट.

,, ,, ,, ष्ट ,, उत्मृष्ट-उमट, अन्तर्मेष्ट-आतवट्टा, उपष्टम ओटा.

,, ,, ,, त ,, तग-टांग. तक्तक-टकटक. तर्ज-टोच. तंबा- टांच, स्वक-सटक.

,, ,, ,, थ ,, उत्पथ उपट, कथ कट, सनाथ-सनाटा, मेथ- मेट.

,, ,, ,, द ,, दुक-टक. कद्दद्—चडपट.

,, ,, ,, त्य ,, त्यज टाक.

,, ,, ,, र ,, उपस्किर-उस्कर-उस्कट.

,, ,, ,, प ,, अवेप-अवीट. चर्प-चाट. इप-वीट.

मराठी ठ संस्कृत ट पासून ताटल्य-ताठळ, दृष्टि-दिठ.

,, ,, ,, ठ ,, वठ उठ, कुठ-कुठ.

,, ,, ,, ढ ,, अर्धमूढ-आडमूठ.

,, ,, ,, त ,, त्रौक-ठोक, तुह-त्रुघ ठोक, उस्तंभ ओठव.

,, ,, ,, थ ,, अर्थव-आठव, पथ पृथ-पाठव, पथय-पाठव

मराठी ठ संस्कृत स्थ पासून स्थगय ठकव, स्थिर ठर, उपस्थित-उठल, उत्थाप-उठाव.

,, ड ,, ट ,, उद्घाट उनाड, अवघट अवघड, हृदय-मोट हिरमोड.

,, ,, ,, ड ,, डुरकरण डुरक, उड्डायक उडाऊ.

,, ,, ,, त ,, कृत-कुरड, चूत चिरड, संघात सांगड.

,, ,, ,, द ,, उदन उडणें, उद्वह उडव, द्रवस-डवच, आसाद-हासड.

,, ,, ,, ल ,, उल्लापय उडाव, पल्पूल पोपाडा, उच्छवल उसवड, उत्फाल उफाड.

,, ,, ,, र ,, ऊर्व उडव, तुर्व तुडव, खोर-खोड.

मराठी ढ संस्कृत ठ ,, पाठ-पाढ.

,, ,, ,, थ ,, क्वाथनिक्वाथ काढानिकाढा.

,, ,, ,, ट ,, दिष्ट ढिग, ट्रेंक ढेकर, दक्ष ठवल.

,, ,, ,, ध ध्व ,, अध्यर्पण-ढापण, ध्वालक-ढालक, उपधाप-ओढव.

,, ,, ,, ह ,, गाह गाढ-गढ.

,, ,, ,, र ,, गुरिका गुडि गुढि.

मराठी ण संस्कृत न पासून अवनम ओणव, अवगाहण-गाहण इ

मराठी त संस्कृत त पासून तुपा तोफ, तुद तोड, ताम्र-तांबरा उपशांति उसत.

,, ,, ,, द ,, आनन्द आकांत

मराठी थ संस्कृत त पासून तयतय थयथय, चोत चोथा, त्राय-थारा, सुत्राण सुथार.

,, ,, ,, स्त ,, अपस्तन-अवथणणें, उस्तव-ओथव, स्तोम-थोम

,, ,, ,, थ ,, कुथ-कुथ-कुथ-कुथ.

मराठी भ संस्कृत म ,, पाम्राम्य–भांवाय, भ्रूस–भुस्सा, भर्ई-भरार उद्धा-उभा.

,, ,, ,, भ ,, भुभुशाय-भुकाव, भंज्ज-भंग, भ्रोपट-भेकड

,, ,, ,, म ,, भ्रेट-भेदर, भेट-भेद, भ्रद–भरड, भिय-भिड.

,, ,, ,, व ,, विभद्दि–भिसद्दि–भिस्त, वस्क-भसक, निर्वाह–निभाव.

मराठी म संस्कृत म ,, मेय-मेज, मर्व-मार, मल-माळ, माय-माज.

मराठी र संस्कृत र पासून रोथय–रोख, अवगूर-भ्रोगर-उगार. घुर–घोर, ओरफ-ओरफड.

,, ,, ,, ल ,, वल्भ वरप, फेल-फेर.

,, ,, ,, ऋ ,, ऋपाय रागाव, ऋज-रूज.

मराठी ल संस्कृत ड पासून उद्दस्त-उडस्यो-उलथा.

,, ,, ,, न ,, उन्न ओले, कृपण-केविल.

,, ,, ,, र ,, रोध लोढ, व्हरि-हुरि–हुलि–हूल.

,, ,, ,, ल ,, लुट–लोट, लुश्चिका–लचका, उल्किल–उकल.

मराठी व संस्कृत स्वर इ उ पासून इज्जा–विजा, एलाय वेडाव, उढ-वढ, उलघ वळघ.

,, ,, ,, क ,, काकोल-कावोळा-कावळा, उत्कुटक-उकिडवा.

,, ,, ,, त ,, खद्योत काजवा.

,, ,, ,, प ,, आत्थापातिक आत्थावाइक, उत्तापक-उतावळा, आतापक-आवा, विलप-इवळ

,, ,, ,, व ,, नमस्त-नवस, जेमनि, जेवणी–आचम-आचव.

,, ,, ,, व, व्य ,, अवनि आवनि. व्याप्टृ–वापर.

,, ,, ,, व चर्व चवा,

मराठी श संस्कृत ह्र पासून ह्रद्य हया, निर्व्हार-निभाव, आह्वा-यिका-आवाई.

,, श ,, ष ,, पिष्टपट-शोल्पट.

,, ,, ,, श ,, शिम-शेपार, शिफा-शिक, आशाय-आशाय.

,, ,, ,, ष ,, षिप-शिक्षा.

,, ,, ,, स ,, स्नेक-शिरक.

मराठी स संस्कृत च पासून चर्पण-सपंण, चिल-सैल, च्योष-सोष, आकुच-आक.

,, ,, ,, छ ,, छोर-सोह, उत्पुच्छ-उपुस.

,, ,, ,, ज ,, तजर तासट.

,, ,, ,, क्ष ,, क्षुरा-सुरा, क्षार-सर.

,, ,, ,, श ,, शोभन-सोनें, श्रयी-सराई, शार्धि-सरदी, मव्याशय- इम्यास.

,, ,, ,, ष ,, उषित-उसाष, कृपणी-किसणी, क्षिप-किस.

,, ,, ,, स ,, म्यूस-मोस, सुपट-सुघड, संस्त-संप, उत्सृष्ट-ओघाट.

,, ,, ,, सं ,, संपक-सपक, संतत-सतत, संख्यान-सांगणें.

मराठी ह संस्कृत स्वरा पासून अघ-हग, अट-हट, ओस-हक, आघाट-हासट.

,, ,, ,, घ ,, धिपपिध-दिसपिस.

,, ,, ,, घ ,, आघाट-आहाट, अवधर-ओहळ.

,, ,, ,, भ,प ,, श्रोष्ट्युकन-कोल्हेहूक, निभालय-न्याहाळ

,, ,, ,, ह ,, ह्रर हावरा, हसित-हसे, हस-हासरा.

मराठी ळ संस्कृत फ ,, उत्तापक-उतावळा.

,, ,, ,, य ,, उत्कथित-उकळीव, उत्कय-उकळ.

मराठी ळ संस्कृत ध पासून आबाधा-आबाळ, वृध-वरढ-वरळ-
" " " ल्भ " आगल्भप्रगल्भ-आधप्पघळ.
" " " र्ण " आघूर्ण-आघळ.
" " " र " शरंभ शळभ, ग्रंथ-गळठ.
" " " ल " ग्लुचट-गुळचट, उन्मूल-उन्मूळ-
धवलल–उजळ, आरतमली–आरोळी.

---

# विषयसूची.

पुढचा आंकडा पृष्ठाचा आहे.


| | पृष्ठ. |
|---|---|
| अकर्मक किंवा Neuter Verbs | ६५ |
| अनुनासिकें | २७ |
| अनुस्वार | २७ |
| अपभ्रंश | १८० |
| अपूर्ण व्यजनें | २८ |
| अव्याप्ति आणि अतिव्याप्ति दोष | ८९ |
| अर्थ | ६१ |
| अर्थवृद्धि | ९६–९७ |
| अर्थसकोच | ९६ |
| अगविक्षेप | २७ |
| आकाशाचें निराट् स्वरूप | ३० |
| आगमप्रधान भाषा | १२३ |
| आदेशप्रधान भाषा | १२६ |
| आदिस्वर | ६८ |
| आद्यव्यंजन | २४ |
| आद्य स्वर, साधे स्वर | २४, २५ |
| अभ्यंतर प्रयत्न ४ प्रकार- १ स्पृष्ट, २ ईषत्स्पृष्ट ३ संवृत, ४ विवृत | २६ |
| ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत | २६ |
| आरोदन अथवा आरटन स्वर | १८ |
| आरोह, अवरोह | ६७ |
| आश्रय–(१) क्रियेचा (२) क्रियेच्या फलाचा | ६६ |
| आसामी भाषा | १४३ |
| आर्यांचें मूळ वसतिस्थान | १२८ |
| आर्यभाषा व तिचे ८ वर्ग | १२० |
| आर्यभाषेच्या खुणा | १२९–१३० |
| आर्यभाषेच्या खुणा— | |
| १ स्वभावानुवृत्ति | १३१ |
| २ व्याकरण | १३२ |
| ३ धातु | १३२ |
| ४ नाम क्रियापद भिन्नत्व | |
| ५ विभक्ति ५–९; | १३३ |
| ६ सख्यावाचक शब्द | १३३ |
| ७ नातीं दाखविणारे शब्द | १३३ |
| आर्यभाषा | १२१ |
| आर्यांचे भाषाशास्त्रीय विचार | ७ |
| इंडो इराणियन | १२८ |

इंडिक भाषावर्ग १३६
इतिहासाचा भाषाशास्त्राशीं संबंध २
इराणिक भाषावर्ग १३७
उणादि प्रातिपदकें ४८
उदाहरण चिनी भाषा २१६
उपसर्जनी भाषा १२३
उत्क्रांतितत्त्व–( भाषेंत ) ११९
एकतानी सुराचे पांच प्रकार १९
एकजिनसी स्वर अथवा तार १७
एस्किमो भाषा ८२
ऐतरेय ब्राह्मण ९
करपल्लवी, नेत्रपल्लवी भाषा ८३
कल्याणीचा लेख १८४
काकलकमणी २४, ३५
कानडी १५१
काळाचे प्रत्यय ५९–६०
काळाचे प्रत्यय व त्याचें मूळ १६३
काळभेदावरून नामभेद १५६
कुत्र्याचे गुरगुरण्याचे प्रकार १८
कृष्णयजुर्वेदांतला भाषाविषयक दाखला ११
केंटम् भाषा १३४
क्रियापदाचीं रूपें ५९
क्रियापदें–सकर्मक
—अकर्मक ६४
खिस्तिधर्ममत १२
गणभाषा २११
गणाचीं चिन्हें १६२
गांवढळ भाषा १०९
गाथासप्तशति १०८
गुजराथी भाषा १४४–४५
गुण आणि वृद्धि
पाणिनी ७७
राजवाडे ७७
गुणे ११
ग्रिम्म ८१
चाळीसगांव येथील शिलालेख १८३
चिकुर्डे येथील ताम्रपत्र १८५
चित्रकलासाधन १०
चिनी भाषेचें स्वरूप ११७
चिनी भाषेतील शब्दांचे प्रकार ४३
जातिजातीच्या ठेवणीचे फरक ७२
ज्योतिष रत्नमाला १८६
ट्युरेनियनभाषा व तिचा प्रदेश १३५
डार्विन १६
Dipthong Ablaut Umlaut ७८
तामीळ १५२

तीन भाषा—
आर्य, सेमिटिक, तुराणी १२७
तुसारी भाषा १३४
तुराणी भाषेचे तीन वर्ग १३७
तुलनात्मक विचार ३
तुर्की भाषेचें उदाहरण १२५
तेलगु १५१
दासबोध ११
द्रविडी भाषा १४७
द्रविडी लोकांचा प्रदेश १४८
१४९—१५०
धातु (१) क्रियावाचक
(२) सार्वनामिक ५७
धातु—स्वर व व्यंजनें ह्या-
प्रमाणें वर्ग ६५—६६
ध्वनीसंबंधी दोन सिद्धांत-
वीचीतरंग—कदंब गोलक ३१
ध्वनि-नित्यत्व, अनित्यत्व ३२
ध्वनीचा उद्गम ८
नमिसाधु १८०
नाद ३२
निरुक्तें व त्यांची प्रवृत्ति ९
नैय्यायिकांचे शब्दांचें प्रकार
वर्णात्मक, अवर्णात्मक ४२
नैरुक्त शाखा ९
पतजली १०, ८०
पाणिनि १०
पाणिनि अष्टाध्यायी ६७, ६९
पाणिनि काल ५२
पाणिनि धातुपाठ ४१
पाश्चात्य मत आणि आमचें
मत ह्यांतील भेद १२४
पुरुषवाचक प्रत्यय
वर्तमानकाळ १६३
पुस्तू भाषा व तिचा
प्रदेश १३८—३९
पुराणवस्तुसंशोधनशास्त्र ५
पूर्णव्यंजनें २८
पोटभाषा व्याख्या १०५
पोटभाषांची कारणें ८२—८३, १०७
पोटभाषा-क्षेत्रमर्यादा ११२ ११३
उदाहरणें
पॉट, मूर्धन्याचा नियम ८१
बंदरपूरचा शिलालेख १८९
प्रकृति—प्रत्यय संबंध ११४, ११५
प्रत्ययांचे दोन प्रकार
अभ्यन्तर, बाह्य २६
प्रत्ययोद्गम ५१
प्रत्ययी भाषा—स्वरूप १२१—१२२
प्रत्ययोद्गम वचन ५४
प्रत्ययांचें काम ११६
प्राकृत भाषाक्रम १७३
प्राकृत बोली होत्या किंवा
कसें ? १७०—१७३
प्रातिशाख्यें—प्रवृत्ति ५२
प्रांतिक भेद १०६
प्राभाकर, कौमारिल-
अन्विताभिधानवादी-

—अभिहितान्वयवादी ४४, ४५, ४६
प्लेटोची जाती ३२
Palatal Law ८१
फरक—बोलण्याच्या गतीमुळें— ७५—७६
—उदाहरण
फारशी पत्र १९८
फारशी प्रत्यय २००
बंगाली भाषा १४२
बालभाषा—इतर १७५
बृहदारण्यकोपनिषत् १३
ब्राह्मण ग्रंथाची प्रवृत्ति ९
ब्राह्मण संस्कृत—
गुण १५७
भाषा अश्वत्थवृक्ष ११०
भाषा आणि पोटभाषा १०४
भाषा—१ प्रत्ययी २ उपसर्गनी ५१
भाषा—सामाजिकसंस्था ८२
भाषेचें आद्यस्वरूप १७
भाषेचें अप्रत्ययी स्वरूप ११६
भाषेच्या जिवंतपणाचीं लक्षणें १०४
भाषांची संख्या १२०
भाषेस समाजाचा आश्रय १०९
भाषांचा तक्ता १५४
भाषेचे प्रकार ११४
भाषेचें स्थैर्य १०८
भाषेचें स्थैर्य—
उदाहरणें ८१—८२
भाषेच्या अवस्था ऋग्वेदमण्डळ ३३
भाषादेवीचा स्वैरसंचार १६
भाषेची गर्भावस्था १८
भाषेचीं दोन स्वरूपें, बाह्य, आंतर ४२
भाषा—भागिरथी ११०
भाषांचा काळ— राजवाडे—मत १७९
भाषा आणि इतिहास ६
भाषा—ईश्वरी देणगी मतांतील अडचणी १४—१५
भाषा—ईश्वर निर्मितत्व १४
भाषेची उत्पत्ति १२
भाषा—उत्पत्ति, चीनच्या बादशहाचा प्रयोग १५
भाषेची उत्पत्ति, धर्मांतील मतें १२
भाषा उत्पत्ति—व्यक्तीची कामगिरी १५
भाषेची उत्पत्ति—साधन —उद्गार प्रधान शब्द २१
भाषा उत्पत्ति—साधन स्वरानुकरण १९
भाषा उत्पत्ति—परिस्थिति १५

भाषेच्या उत्पत्तीची दोन मतें ४७
भाषा उत्पत्ति दोन सिद्धांत व निराकरण १४-१५-१६
भाषेची उत्पत्ति--भावनाप्रेरित शब्द २१
भाषा उत्पत्ति--उत्क्रांति सिद्धांत १६
भाषा उत्पत्ति--समाजाची कामगिरी १५
भाषेच्या उत्पत्तीची कारणें राज्यक्रांति, विचारक्रांति १८९
भाषाचें उत्पत्तिकालाचें कोष्टक १८७
भाषाशास्त्र, इंद्रिय विज्ञानशास्त्र संबंध २९
भाषाशास्त्र धर्मशास्त्राशीं संबंध ५
भाषाशास्त्र पुराणवस्तुसंशोधन शास्त्राशीं संबंध ५
भाषाशास्त्र--मानवशास्त्र ५
भाषाशास्त्र वेदांतशास्त्राशीं तुलना ५
भाषाशास्त्र--समाजशास्त्र ५
भाषाशास्त्र--शास्त्र म्हणून योग्यता ४
भाषाशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र तुलना ३
भाषाशास्त्राच्या अभ्यासाचें स्वारस्य २
भाषाशास्त्र व्याख्या १
भाषाशास्त्र आणि समाजशास्त्र यांचा संबंध १
भाषाशास्त्र आणि इतिहास ७
भाषाशास्त्र हिंदुस्थानात केव्हा आलें ? ६
भाववाचक नामाचा सामान्य नामाप्रमाणें उपयोग १०३
भाषाशास्त्राचा अभ्यास ३
भाषा, राष्ट्राचें जीवनचरित्र २
भाषाशास्त्राची व्याप्ति २
भाषेचा उपयोग ५३
भाण्डारकर ११
भूतकाळाचा आगम १६४
मनुष्याच्या मुखातील यंत्र २३
मनुस्मृति अध्याय १ १३
डॉ. मरे याचे ९ धातु ४९
मराठी ११
मराठीचा उत्पत्तिकाल १८६
मराठीची जन्मदात्री १८८
मराठीची पूर्वपीठिका १५५
मराठीचें व्याकरण २०२

मराठींतील भाषाशास्त्रीय
प्रयत्न ११
मराठी प्रयत्नांतील सार्व-
नामिक मूळ १६०
मराठी भाषा १४६–४७
मराठीवर इतर भाषांचे
परिणाम १९०
मराठी विभक्तिप्रत्यय
व त्यांचें मूळ २०५, २०७
मराठी व्याकरणाचे दोष ११
मल्याळी व इतर
भाषा १५२–५३
महाराष्ट्री प्राकृत खुणा १७६
मातृभाषा १२०
मानवांचीं दोन कर्तव्यें
१ स्ववंशवर्धन
१ स्वशरीरसंरक्षण २१
मीमांसकाची प्रवृत्ति ३१
मीमांसकप्रवृत्ति वाक्य-
परीक्षा, तात्पर्यमीमांसा
दोन–भेद गुरु-
मीमांसक, भट्टमीमांसक ४४
मीमांसकांचा सिद्धांत ३०
मुंजराजा १८०
मेंदूच्या चलबिचलीमुळें
झालेले फरक ७४
मंगळवेढें येथील लेख १८५
यास्काचार्य १०
यास्क–आख्यातजांनि
नामानि–वाद ४८
यास्क—निरुक्त ६९
यास्कांनीं मानलेले प्रकार-
नाम, आख्यात, उप-
सर्ग निपात ४१
युरोपियन पंडितांचा
अभ्यास ३
रषाभ्यां नो णः समानपदे-
प्रक्रिया ७८
—आणखी कांहीं कारणें ७९
रसायनशास्त्राशीं तुलना ४
राजवाडे ११
राजवाडे यांचें मत ११८
रुद्रट काव्यालंकार १८०
रूपप्रक्रिया ३
लकार ६६
लक्षणा २१
लक्षणा–साम्यसंबंध
अर्थसाम्य ९९
लिंगें ५५
तर्क ५६
लिपीचा उपयोग ११०
लॅटिन भाषा ' हि '
धातु ४९
वनस्पतिशास्त्र ३
वर्णमाला संस्कृत, इतर
भाषा, दोष–गुण ३६
वर्णोत्पत्ति २२, ३५

वर्णप्रक्रिया ६७
वाक्याचा तोल ८०
वागभृणी सूक्त ७
वाणी आणि ऋग्वेद
समीकरण १३
वाणीचे चार प्रकार
परा, पश्यन्ती, मध्यमा,
वैखरी ३२
वाणी-कामधेनु १३
वायु-श्वास भाषेचें मूळ ८
विकारप्रधान शब्द २१
विविधत्वांत एकत्व ५
विभक्ति ५६-५७
विभक्तिदृष्ट्या भाषाचा
विचार ६१-६२
विसर्ग २७
वृद्धिरादैच् ७७
वेदांतशास्त्र-भाषाशास्त्राशीं
तुलना ५
वैदिक संस्कृतच्या खुणा १५७
वैदिक संस्कृतमधील
नामाचे प्रत्यय- १५९
क्रियापदाचे प्रत्यय १६१
वैय्याकरणी व अलंकारिक १०
व्याकरणकार-संस्कृत ५२
व्याकरण-आरंभ ५२
व्याकरण-ध्वनिशास्त्र-
वार्तिक ५३
व्याकरण व्याख्या ५१
व्याकरणकार-मराठी ६९
व्याकरणातील आठ प्रका-
रच्या शब्दांचा उत्पत्ति-
क्रम ५८-५९
व्युत्पत्तिशास्त्राशीं संबंध ५
व्यंजनप्रक्रिया ऐतिहासिक
[illegible] ८०
व्यंजन उत्पत्ति २७
व्यंजनाचे वर्ग २८
शब्द—३ प्रकार. रूढ,
यौगिक, योगरूढ-नैय्या-
यिक मत यौगिकरूढ ८५
शब्दाचे तीन प्रकार
1 Substance
words
2 attributive,
words
3 Phenomena
words ४८
शब्द-अनित्य बौद्धमत ८४
शब्द-अर्थ
एकस्वरूप, सम-
स्वरूप, गुणसाम्य ९९
शब्द-अर्थ साहचर्य ८८
शब्द-अर्थ प्रक्रिया ६९-८३
शब्द-वस्तुनिदर्शक
वस्तुसंबंधनिदर्शक
क्रियानिदर्शक ५०
शब्द-वैय्यक्तिक कल्पना,
सामुदायिक कल्पना ४३

शब्दवृत्ति लक्षणा ९०
उदाहरणें
" कुशल–गङ्गायां घोषः " ९०–९१
शब्द–व्याख्या ११५
शब्द–आकाशाचा गुण ३०
शब्द आणि शब्दार्थ–
पतंजली महाभाष्य ८६
शब्दोच्चारापूर्वीची
क्रिया ३९
शब्दोच्चारापूर्वी होणारी
क्रिया ८४
शब्दकोशाची वाढ २२
शब्दकोशाच्या वाढीची
कारणें २२
शब्दाचें महत्त्व ८४
शब्दाशब्दाचे संबंध ४३
शब्दाचे मानसशास्त्र
दृष्ट्या प्रकार
१ वस्तुनिदर्शक
२ वस्तुसंबंधनिदर्शक
व्याकरणदृष्ट्या वाचक,
द्योतक ४०
शब्दाच्या शक्ति १०
शब्दाचे संबंध-योग्यता,
आकांक्षा, संनिधि ५०
शब्द–विशिष्टाद्वैती मत ८५
शब्दवृत्ति व्यंजना–
९९
—इतर वृत्ति ९४–९५
शब्दनिगडित ११८
शब्द सजीव, निर्जीव ५०
शब्द–समाज प्रतिबिंब १०२
शब्दसामर्थ्य-
इतिहासज्ञान ९२
शब्दोत्पत्ति ११
शास्त्रीय भाषा १२६
शास्त्रीय शोध, त्याचा
भाषेवर परिणाम १०१
शिलालेखी प्राकृत १७७
" शोरे पट्टी " ६१
श्रावणबेळगोळ
शिलालेख १८४
षट्चक्र ३१
षट्चक्रें ३४
षट्चक्रभेदन ३४
षडाकृति १०४
समाजशास्त्र
भाषाशास्त्राशीं संबंध ३
सर्वनामोत्पत्ति ६१
सानुनासिक भाषा
कोंकण, फ्रान्स ७०
सामासिक भाषा ११७
सिंधी भाषा २४६
सिंहली भाषा १३८
सेमेटिक अथवा शिमी
हेमेटिक १३४
सेंटम् भाषा १३४

संकेत १६
संयुक्त स्वर २६
संप्रसारण २८,७८
संस्कृत भाषेचें स्वरूप १५६
संस्कृत वाङ्मयांतील शोध ४
संस्कृत बोली होती किंवा कसें ? १३६, १६५–१७०
संस्कृत प्रातिशाख्यें ६९
संस्कृतचा नवीन अभ्यास ७
स्वरागम ७७
स्वर प्रकार— ६७
उदात्त, अनुदात्त, स्वरित
स्वरप्रक्रिया २, ६७,८३
स्वरप्रक्रिया दोन प्रकार—
आंतर, बाह्य ७५
स्वराचे प्रतिध्वनि ३७
स्वार्थे प्रत्यय २०३
स्वरविभागणी-
साधे, संयुक्त ६८
स्वरत्याग ७७
स्वरसत्ता Mandate ७८
स्वरसंधि २६
स्फोट ३२
समाहारद्वंद्व
एकशेषद्वंद्व ३२
हवामानाप्रमाणें पडणारे फरक ७१
हितोपदेशाचें भाषांतर १८५
हिमालयावरील भाषा १३८
हिंदी अखिल हिंदुस्थानची भाषा व्हावी किंवा कसें ? १४१
हिंदी भाषा व तिचे पोटभेद— १३९–१०
हेमचंद्र १७९
क्षेत्र, प्राकृतभाषांचें १०५
ज्ञानेश्वरी १४८

# परिशिष्ट

## वर्ण प्रक्रियेचे नियम.

भाषांच्या तौलनिक अभ्यासानें वर्णप्रक्रियेमध्यें कांहीं सिद्धांत बसविण्यां आले आहेत. संस्कृत, ग्रीक, लॅटिन व कांहीं स्लाव्ह भाषा व जर्मनिक ह्यामधील समानार्थी शब्द घेतले व त्याची वर्णरचना तपासली त्यावेळेस व्यंजनाविषयीं कांहीं ठराविक फरक होताना दिसले.

ग्रिमचा सिद्धांत—

मूळच्या आर्यभाषेतील प्रत्येक वर्गातील पहिलें आणि दुसरें व्यंजन संस्कृत, ग्रीक, लॅटिन, स्लाव्हा भाषेमध्यें कायम राहतें. परंतु जर्मनिक भाषेमध्यें बदलतें.

| कठोर | संस्कृत | ग्रीक | लॅटिन | गॉथिक | जर्मानिक | इंग्लिश |
|---|---|---|---|---|---|---|
| व्यंजनें | पशु | | पेकस | फैहु | व्हेह | फी |
| | नपात् | | नेपांस | | नेफी | नेफ्यु |
| | तृणम् | | | ठॉर्नस | डॉर्न | थॉर्न |
| | वर्तते | | व्हर्टो | वाइर्ठन | वर्डेन | |
| | त्रयः | | ट्रेय | ठ्रेइस | ड्रेइ | थ्री |
| | शुन | शुनाम् | | हुंद्स | हुण्ड | हॉउण्ड |
| | दिशति | | | | त्सीगेन | |
| | कः | | क्वोड | व्हस | वॉस | व्हाट |
| मृदु | दशन् | | डेसम् | टैहून | त्सेन | टेन |
| व्यंजनें | जानु | | | क्नु | क्नुइ | नी |
| | युगम् | | | युक | योक | योक |
| | भरामि | | | बैरान | | बेअर |
| | हस (ह=घ) | | | | ग्यन्स | गूज |

व्हर्नेरचा नियम—

ग्रिमच्या नियमाप्रमाणें पिता शब्द लॅटिन भाषेमध्यें 'पेटर' ह्या स्वरूपात दिसतो. गॉथिकमध्ये 'फाठर' असा झाला पाहिजे परंतु तसा न होता 'फॉदर' असा होतो कारण 'भ्राता' शब्द लॅटिन 'फ्राटर' असा होऊन गॉथिक भाषेत 'ब्रोठर' असा होतो. पिता शब्दाप्रमाणें दुसरे काहीं शब्द आहेत, उ०— सप्त, केतु, श्वश्रू इ० इ.

फ, ठ, छ, शब्दाच्या मध्यें अथवा शेवटीं आले म्हणजे मृदु बनतात. हा सिद्धांत व्हर्नेरनें शोधून काढला.

संस्कृत भाषेमध्ये वर्णांचा 'अभ्यास' करताना 'क' वर्गातील व्यंजनाबद्दल 'च' वर्गातील व्यंजनें येतात.

इ किंवा य ह्याच वर्णांपूर्वी कवर्गाबद्दल चवर्ग मूळ भाषेतून शब्द इतर पाश्चात्य भाषेंत जातांना येत असे ह्यालाच Palatal Law म्हणतात.



भाषावत्यानीं व्यापलेला प्रांत दारववीणारा नकाशा.




POONA LITHO WORKS